# ऐसी हे समर्थ पदवी

*बहुत जनांस चालवी ।*
*नाना मंडळें हालवी ।*
*ऐसी हे समर्थ पदवी ।*
*विवेके होते ।*
*(दा. १८.१०.४६)*

लेखक
**डॉ. अशोक प्रभाकर कामत**
एम्.ए., पीएच्.डी. (हिंदी, मराठी)
प्राध्यापक व प्रमुख
संत नामदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ



गोकुळ मासिक प्रकाशन, पुणे.

समर्थ वाङ्मय आणि कार्याचा ध्यास
घेऊन श्रीरामकोशाचा प्रपंच करणारे
ज्येष्ठ संपादक पं. अमरेन्द्र गाडगीळ
यांना सविनय सादर

# प्रकाशकीय

गेल्या दोन वर्षात, पुणे विद्यापीठाच्या संत नामदेव अध्यासनात अभ्यासाच्या निमित्ताने वारंवार जाण्याचा योग आला. अध्यासनाचे प्रमुख आणि माझे मार्गदर्शक डॉ. अशोक कामत यांच्याशी या निमित्ताने अनेक विषयांवर चर्चा झाल्या. या चर्चांमधूनच समर्थ रामदासांवर एखादे पुस्तक काढावे असा विचार दृढमूल झाला. सर्व प्रकारचे अभिनिवेश हिरीरीनं मांडले जाणाऱ्या आजच्या काळात 'साधू दिसती वेगळाले। परि ते स्वरुपीं मिळाले ॥' या समर्थोक्तीचा पुनरुच्चार जोरकसपणाने करणे आम्हाला आवश्यक वाटले. या विशिष्ट सामाजिक आवश्यकतेचे भान ठेवूनच आम्ही हे पुस्तक प्रकाशित करत आहोत. डॉ. कामतांचे लेखन सर्वस्पर्शी, समन्वयात्मक आहे. यात समर्थकालीन सामाजिक, राजकीय अन् सांस्कृतिक परिस्थितीचे आणि त्याला अनुसरून समर्थ रामदास आणि अन्य संत सत्पुरुषांच्या कार्याचे स्पष्ट चित्र आपल्याला दिसेल. रामदास आणि अन्य संतांच्या कार्याचे एकरुपत्त्वही प्रत्ययाला येईल.

लेखकाने येथे जी संप्रदाय - समन्वयाची भूमिका घेतलेली आहे, ती प्रशंसनीय आणि अभ्यसकीय आहे, तसेच अनुकरणीयही आहे. याचा सूत्रपात इतिहासकाळापर्यंत मागे जात असला तरी अलीकडील काळात त्या दृष्टीने ज्या थोर पुरुषांनी प्रयत्न केले, त्यात पुढील तीन नावे अवश्य घालावी लागतील. ती म्हणजे राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, स्व. सोनोपंत दांडेकर आणि वंदनीय धुंडामहाराज देगलूरकर. या परंपरेतील आणखी एक नाव उल्लेखिण्यासारखे म्हणजे स्व. संत दासगणू महाराज यांचे. त्यांची परंपरा चालवणारे त्यांचे मानसपुत्र वंदनीय अनंतराव आठवले यांचाही समावेश यात होतो.

लेखकाने प्रस्तुत पुस्तकात केलेली सर्व विधाने आणि त्यावरील निष्कर्ष सर्वच अभ्यासकांना पटावेत अशी अपेक्षा अर्थातच नाही. तथापी त्यांचे समन्वयात्मक विश्लेषण अभ्यासकांना अधिक संशोधनास प्रवृत्त करेल असे वाटते.

•

सौ. प्राची चिकटे

# जागरण

श्रीरामदासस्वामींना आपण 'समर्थ' म्हणतो, परंतु स्वत: समर्थ रामदास हे श्रीरामालाच 'समर्थ' म्हणतात. प्रभू रामचंद्र हेच त्यांचे उपास्यदैवत. तेच त्यांचे गुरु आणि रामभक्ती हेच त्यांच्या कार्यशक्तीचे साधन. तत्कालीन परिस्थितीत परदास्य निर्मूलनासाठी समर्थ रामदासांनी, समर्थ रामरायाचाच आदर्श शिवाजीच्या रुपाने लोकांपुढे मांडला. समर्थांच्या या सामर्थ्याचा मोठ्या औचित्यपूर्ण शब्दात लेखकाने गौरव केला आहे. ''ते आपल्या सज्जनपणासह शिवकार्यामागे उभे राहिले. सज्जनांचे सामर्थ्य आणि समर्थांचे सज्जनपण एकत्र आले. त्यातून महाराष्ट्रभूमीचा उज्ज्वल इतिहास शिवकाळात घडला असे म्हणता येईल. समर्थ ऐहिकताही जाणतात आणि पारमार्थिकताही अनुभवतात. ऐहिकता त्यांना मान्य आहे, राजकारण ही त्यांना मान्य आहे. हे दोन्ही 'अखंडपणे सर्वविषयी सावधपण' ठेवून करावे असे ते म्हणतात.''

समर्थांचे असे सर्वांगीण दर्शन घडले तरच समर्थ रामदास आणि त्यांचे कार्य समग्रपणे जाणून घेता येईल. केवळ समर्थ संप्रदायाचा विचार न करता, समर्थांच्या शिकवणुकीचे महाराष्ट्राच्या जनमानसावर त्यावेळी घडलेले परिणाम आणि आजवर टिकून असलेले त्यांचे पडसाद, त्याचे समग्र विवरण करणारा एक प्रचंड ग्रंथ, अद्ययावत झालेल्या सर्व संशोधनासह लिहिला जाणे आज अत्यावश्यक आहे. नुसतेच त्यांचे साहित्य किंवा त्यांच्या संप्रदायाचा एकांगी विचार करून चालणार नाही. 'जय जय रघुवीर समर्थ' ही त्यांची एकच घोषणा त्यांचे चरित्र आणि कार्य उलगडून दाखवण्यास पुरेशी समर्थ आहे. बलाढ्य रावणी शक्तीला आव्हान देऊन, तिचा नि:पात करून, रामराज्याची स्थापना करणारा कोदंडधारी 'राम' समर्थांच्या चरित्रात आणि कार्यात पुरून उरलेला आहे. तोच राम सद्य:स्थितीत हिंदुस्थानच्या अस्तित्त्वालाच आव्हान देणाऱ्या शक्तीशी लढण्याकरिता उपयोगी पडण्यासारखा आहे. परंतु त्याचा उपयोग विवेकाने केला पाहिजे ''विवेकामध्ये सापडेना। ऐसें तों काहीच असेना॥'' हे लक्षात ठेवून, समर्थांनी त्यांच्या काळी दिलेली हाक आजही जागविता येईल.

''देशकालवर्तमान । सर्वही अवेवधान ।
कोणते विधिविधान । सावधान, सावधान ॥

समर्थ रामदास क्रांतदर्शी होते, द्रष्टे होते, त्यांच्या ध्यानी, मनी, स्वप्नी 'बळावलेले हिंदुस्थान' होते. त्यांना पडलेले आनंदवनभुवनाचे स्वप्न केवळ स्वप्न नव्हते, तर तो त्यांच्या भविष्यकाळात घडलेला म्हणजेच शिवसमर्थांनी घडविलेला साक्षात इतिहास होता.

प्रस्तुत पुस्तकात समर्थांचे ते स्वप्न कसे साकार झाले ते अनेक संदर्भासह आणि तुलनात्मक अभ्यासासह नवीन पिढीसमोर मांडण्याची मोठी महत्त्वाची कामगिरी लेखकाने मोठ्या यशस्वीपणे केली आहे. तसेच प्रस्तुत पुस्तक या संधीकाळात प्रकाशित करण्यात प्रकाशकांनीही मोठे औचित्य दाखवले आहे. त्याचा उपयोग करणे हे अर्थात वाचकांच्या हाती आहे. तसा तो त्यांनी करावा असे मन:पूर्वक आवाहन मी करत आहे.

भारतीय

# भूमिका

भावार्थ दीपिकेच्या रुपाने भक्ती, ज्ञान आणि कर्म अशा तिन्ही मार्गांचे महत्त्व कथन करून महाराष्ट्रात भागवत धर्माचा पाया सुदृढ करणारे योगीराज ज्ञानदेव, त्यांच्या उदात्त वैश्विक विचार-वैभवाची पताका पंढरी पासून पंजाबापर्यंत मिरवीत नेणारे, सद्धर्मप्रसारक संत नामदेव, मुसलमानी राजवटीच्या स्थैर्यकाळात पुन्हा एकदा महाराष्ट्र महोदयाचा समन्वयशील प्रयत्न मांडणारे महात्मा एकनाथ आणि हिंदवी स्वराज्याची मुहूर्तमेढ पुन्हा एकदा रोविणाऱ्या नीतिमान शिवरायांना घडविणारे, त्यांच्या स्वातंत्र्यलढ्याला बळकटी आणून देणारे तुकाराम, रामदास हे पाच महासंत महाराष्ट्र धर्माचे प्रमुख प्रणेते आहेत. मराठी भक्तिआंदोलनाचे पंचप्राण आहेत.

ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम हे चार सत्पुरुष तळागाळापर्यंत पोहोचलेल्या विठ्ठलभक्त वारकरी संप्रदायाचे मानबिंदू आहेत, तर समर्थ रामदास देशनिष्ठ व्यक्ति शक्तींना विशेष प्रेरक वाटणारे एक कालजयी महामानव आहेत. सर्वच संतांच्या काव्यापेक्षा त्यांचे कार्य अधिक महत्त्वाचे ठरले आहे. त्यांच्या काव्यात हरिकथानिरुपणाला पहिला क्रम असून, सामाजिक उत्थानाला तेवढेच महत्त्व मिळाले आहे. कोणत्याही संतांनी संन्यासाचा, निवृत्तिमार्गाचा पुरस्कार केलेला नाही, उलट प्रपंचात राहून परमार्थ कसा करता येईल, याचा स्वतः शोध घेत, समाजबांधवांना बोध दिलेला आहे. एकही संत राजाश्रयाने राहिला नाही की त्याने लोकाश्रयाचा कधी अवमान केला नाही. राजकारणी आले आणि गेले, संत अविचल राहिले. त्यांनी सत्यशोध सुरू ठेवला. सकळ जनांना शहाणे करण्याचा प्रयत्न मनोभावे करीत राहिले.

संतांची चळवळ विशिष्ट प्रांताची, पंथाची वा भाषेतील नाही. ती एकप्रकारे बहुजनांची आहे. 'अवघे धरू सुपंथ' अशा जिद्दीचीच आहे. सर्वच संतांनी संकुचिततेवर मात केली आणि काळावर विजय मिळवून आजही ते दीपस्तंभासारखे उभे आहेत. अलिकडे संतांविषयींचा प्रीतिभाव अधिक जोमाने व्यक्त होतो असे दिसते, पण तो प्रीतिभाव आहे की अभिनिवेश ?

ज्या संतांनी जातिजमाती मोडल्या, त्यांचे अनुयायी आपापल्या ज्ञातीचे म्हणून त्या त्या संतांकडे आज पाहतात. याज्ञवल्क्य शाखेच्या ब्राह्मणांना ज्ञानदेव जवळचे, देशस्थ ऋग्वेदी जनांना एकनाथ जवळचे, शिंपी मंडळींना नामदेव तर सुवर्णकारांना नरहरी सोनार, नाभिकांना सेना, चर्मकारांना रविदास. ही स्थिती खचितच स्पृहणीय म्हणता येणार नाही. भाषावार प्रांतरचनेनंतर तर कर्नाटकाचे बसवेश्वर, उत्तरप्रदेशाचे तुलसी-कबीर, अमके-तमके असेही अभिनिवेश दृढ झाले आहेत स्वार्थपरायण नेत्यांनी हेतुपूर्वक जोपासलेली पंथीय कट्टरता तर प्रथमपासूनच आहे यातूनच मंडळी संतांची तुलना करतात. त्यांच्यातील साधर्म्य शोधण्यापरीस त्यांना आपापले आग्रह चिकटवितात.

ऐतिहासिक घटनाक्रम नि एकूण स्थितिगतीचा संदर्भ ध्यानी घेऊनच आपण संतांचा विचार करायला हवा. संत काव्याबरोबरच संतकार्याचा शोध-बोध घ्यायला हवा. ज्या बहुजनांनी संतसाहित्य टिकविले, श्रद्धापूर्वक जोपासले त्यांच्या भावनांना, जाणीवपूर्वक, धक्का न लावता, आपापले सत्य शोधून सर्वांसमोर ठेवायला हरकत नाही. पण हे करीत असतांनाही दृष्टी विधायकच हवी. समकालीन समस्यांचे भान सुटू नये. तसेच संतकाळातील कालमानाच्या मर्यादांचा देखील विसर पडू देऊ नये.

प्रस्तुत पुस्तकाचे लेखन करतांना दृष्टी विधायक ठेवण्याचा यथामती प्रयत्न केला आहे.

ज्यांनी आपले सारे जीवन समर्थ-कार्यासाठी वेचले त्या श्रद्धेय पं. अमरेंद्र गाडगीळांना हे पुस्तक अर्पण करतांना मनात कृतज्ञ भाव आहे. त्यांच्या आशीर्वादांची कामना आहे.

निकटवर्तीयांच्या स्नेहानुरागात रहायचे असते म्हणून आभाराचे उपचार उचित ठरणारे नसतात. तरीही सन्माननीय श्री. बापूसाहेब जोशी आणि सौ. प्राची प्रदीप चिकटे, ओमश्रीश दत्तोपासक, सौ. पद्मावती श्रोत्रिय , गणेश कारकर या अभ्यासक मित्रांच्या प्रेमळ सोबतीचा निर्देश करावासा वाटतो.

अशोक प्रभाकर कामत

१७ मार्च १९९१, गुढीपाडवा
संतनामदेव अध्यासन
पुणे विद्यापीठ.

# अनुक्रमणिका

# रामदासस्वामींचे विचार-विश्व १

समर्थ रामदासांनी शिवछत्रपतींच्या विराट कर्तृत्वाचे गुणगायन केले आहे. रामराज्याचे दिव्य स्वप्नही रंगविले आहे. रामवरदायिनी भवानी आणि मर्यादापुरुषोत्तम प्रभू रामचंद्राच्या समर्थतेचे प्रेरक वर्णन करण्यात आणि मराठ्यांची अस्मिता जागी करण्यात ते रंगले आहेत. स्वातंत्र्याच्या प्रकाशाचे स्वागत करण्यासाठी त्यांनी आपली स्फूर्तिप्रद लेखणी उचलली आहे. झोपी गेलेल्या मराठी पौरुषाला जागृत करण्यात ते दंग झाले आहेत.

पण हे झाले त्यांच्या काळासाठी त्यांचे कविकर्तृत्व. समर्थांचे काव्य अमूप आहे. त्यात केवळ तत्कालीन स्थितिगतीचे चित्रण वा भाष्यटीकाच आहे असे नाही, त्यातील शाश्वत आहे ती सुखी संसार करावा कसा याची शिकवण! आजच्या चालू जमान्यामध्येही ती शिकवण ताजी वाटावी अशी आहे. त्या शिकवणुकीचे मर्म जाणून घेण्याचा प्रयत्न करणारा हा निबंध आहे.

---

### समर्थांची जीवनयात्रा

समर्थ रामदास मराठवाड्याचे. परतुडजवळच्या जांब गावचे कुळकर्णपण करणारे, सूर्याजीपंत ठोसर यांचे धाकटे चिरंजीव. घर सारे सूर्योपासक. कर्मधर्मनिष्ठ. शके १५३० च्या चैत्र शुद्ध नवमीला रामजन्माच्या वेळीच त्यांचा जन्म झालेला. म्हणजे जन्मकाळापासूनच अद्भुत योगायोगास आरंभ झालेला.

समर्थांचे बंधू गंगाधरपंत कवी. त्यांची बरीच कविता उपलब्धही आहे. खुद्द सूर्याजीपंतांनीच गंगाधरपंतांना अनुग्रह दिला. पुढे नारायण ऊर्फ समर्थ रामदास यांच्यावर मात्र गंगाधरपंतांचा अनुग्रह झाला नाही आणि 'चिंता करितो विश्वाचि' असे बालपणापासूनच म्हणणारे समर्थ रामदासही घरसंसारात गुरफटले नाहीत. ते आपल्या विवाहसमयी बोहल्यावरूनच पळाले.

नाशकाजवळच्या टाकळी येथे सतत बारा वर्षं पुरश्चरण करणारे नारायण, समर्थ रामदास झाले. हृदयस्थ रामाचे उपासक, विलक्षण निश्चयी बनले. अद्भुत कल्पना आणि स्वप्ने पाहणारे आणि ती प्रत्यक्षात उतरविण्याची जिद्द आणू म्हणणारे, त्यासाठी सगळे आयुष्य पणाला लावणारे. त्यांच्यासारखा कर्मयोगी संत, हिंदी किंवा मराठी संतमंडळात दुसरा दाखविता येणार नाही.

समर्थांच्या जीवनात प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष असा कोणी मानवी गुरु त्यांना मिळाला नाही. त्यांनी सारी साधना अनुसरली ती स्वयंशासनाच्या बळावर. विवेक हीच त्यांची प्रेरणा. ''जिथे दिसती विशेष गुण। ते सद्गुरुचे अधिष्ठान'' अशी त्यांची भावना होती.

समर्थांचे जीवन सुमारे त्र्याहत्तर वर्षांचे. शके १६०३ मध्ये त्यांना रामाज्ञा झाली. सारे आयुष्य त्यांनी समाजसेवेसाठी वेचले. सुदृढ संघटना उभारण्यात, सज्जनांना उत्तम पौरुषाचे आवाहन करण्यात, जनतेला वास्तवाचे आणि आदर्शाचे प्रेरक भान घडविण्यात त्यांनी आपली सारी हयात खर्च केली. त्यासाठी 'जोगी रमता भला' या न्यायाने सतत त्यांनी भ्रमंती केली. पण ती गिरीकंदरी नाही तर जनमानसात केली. जनमनाशी एकरूप होऊन केली. या त्या भ्रमंतीचा अर्थ लावणे मोठे प्रेरक आहे, उद्बोधक आहे.

**छत्रपती शिवराय आणि समर्थ**

समर्थांच्या काळात महाराष्ट्रावर परचक्र आलेले होते. आणि शिवाजीराजांच्या रुपाने 'राम' ही अवतरला होता. समर्थांनी स्वधर्माला घातक झालेल्या परचक्राबद्दल कडक शब्दांत समाचार घेतलेला दिसतो. शिवरायांच्या स्वराज्य प्रयत्नांचेही त्यांनी भरघोस कौतुक केले आहे. हेच समर्थांचे वेगळेपण आहे. समर्थ ऐहिकताही जाणतात आणि पारमार्थिकताही अनुभवतात. हरिकथा त्यांना मान्य आहे. पण राजकारणही मान्य आहे. हे दोन्ही 'अखंडपणे सर्वविषयी सावधपण' ठेवून करावे असे ते म्हणतात. धर्मासाठी जगणे मरणे शिवरायांना अभिप्रेत होते म्हणून समर्थांना शिवराय ''जाणता राजा'' वाटला आहे.

समर्थांना चळवळीचे सामर्थ्य जाणवत होते. त्या दृष्टीने त्यांनी तत्कालीन राजकारणाचे महत्त्वही अचूकपणे ओळखले आणि शिवाजी महाराजांचे सामर्थ्य हा त्यांना अभिमानाचा विषय वाटला.

शिवाजी महाराजांचे उदात्त-चारित्र्य, अपरिमित पराक्रम आणि अद्भुत द्रष्टेपण जाणून ते उचित शब्दात प्रकट करणारे समर्थ हे आपल्या सज्जनपणासह शिवकार्यामागे उभे राहिले. सज्जनांचे सामर्थ्य आणि समर्थांचे सज्जनपण एकत्र आले. त्यातून महाराष्ट्र भूमीचा उज्ज्वल इतिहास शिवकाळात घडला असे म्हणता येईल.

समर्थांना राजकारणी संत असे म्हटले गेले आहे. त्यांनी प्रत्यक्ष राजकारण केले नाही पण राजकारणाचे महत्त्व मानले. समकालीन राजकारणाचा विचार केला. त्यावर आपल्या परीने परखड लिहिले. त्यांचे वचन प्रसिद्ध आहे :

*मुख्य ते हरिकथा-निरूपण।*
*दुसरे ते राजकारण॥*
*तिसरे ते सावधपण॥*
*सर्व विषयीं॥*

समर्थ निवृत्ती आणि प्रवृत्ती यांचा मेळ घालणारे संत होते. हरिकथा निरूपणाबरोबर येणारा निवृत्तिवाद त्या काळातील आव्हाने पेलण्यासाठी त्यांना पुरेसा वाटला नाही. म्हणूनच

त्यांनी प्रवृत्तीचा पुरस्कार केला.

समर्थांनी आपल्या काळातील नैसर्गिक आपत्ती आणि परचक्रामुळे आलेल्या गुलामगिरीतील यातना यांचे वास्तव चित्रण केले आहे. 'अस्मानी-सुलतानी' असे सार्थ नावही त्यांनी या काव्यरचनेला दिले आहे. समर्थांचे वेगळेपण असे की, त्यांनी नुसते हे चित्रण केले नाही तर त्यातून समकालीन समाजबांधवांना प्रयत्नवाद शिकविला. त्यांचा विवेक जागा करण्याचा प्रयत्न केला. समर्थ सांगतात, परमार्थाचे ध्यान विवेकपूर्ण असावे. कारण,

*प्रपंच सोडून परमार्थ कराल ।*
*तेणे तुम्ही कष्टी व्हाल ॥*

समर्थांना शिवछत्रपतींचे गुरुपद द्यावयाचे किंवा नाही याबद्दल मतभेद असतील; पण त्यांनी राजधर्म, क्षात्रधर्म विवरून सांगितला याबद्दल मतभेद होणार नाही. राम-वरदायिनीची त्यांनी केलेली अर्चना आणि आनंदवनभुवनाचे त्यांनी रंगविलेले स्वप्न प्रस्तुत संदर्भात बोलके आहे. संभाजीराजांना पत्र पाठवून, त्यांनी, मागील चुका ध्यानी न घेता, अनुभवी सहकाऱ्यांना अंतर देऊ नये, एकत्वाने गनिमांचे निर्दालन करावे, उग्र स्थिती सोडून शांत चित्ताने वागावे असा परखड उपदेश केला आणि त्यात शिवरायांचे जे आदर्श चरित्र सांगितले ते समर्थांच्या राजकारणी आणि शिवनिष्ठ व्यक्तिमत्त्वाचे द्योतक म्हटले पाहिजे.

धर्म आणि राजकारण यांच्यात संतुलन असावे आणि त्यासाठी हरिकथा कीर्तने करावीत अशी क्रांतदर्शी वृत्ती प्रकट करणारे समर्थ हे पहिलेच संत आहेत.

**'एक व्हा!' हा संदेश**

समाजात सारी माणसे एक झाली की बळकटी येते. शत्रू आक्रमण करीत नाही. गरिबी, बेकारी, रोगराई अशा कितीतरी इतर शत्रूंवर विजय मिळविण्यासाठीही अशी संघटनेची शक्तीच उपयोगी पडते. म्हणून मराठी माणसाला घरीदारी सुखी समाधानी करण्यासाठी समर्थ रामदासांनी 'एक व्हा' म्हणून सांगितले. रामवरदायिनी तुळजाभवानीला साकडं घालून ते म्हणाले,

*एक जाती दोन जाती पावला ।*
*तो कैसा म्हणावा भला ।*
*तुम्हा सकळांस कोप आला ।*
*तरी क्षमा केली पाहिजे ।*
*विवेक विचार सावधपणे ।*
*दीर्घ प्रयत्न केलाचि करणे ।*
*तुळजावराचेंनि गुणे ।*
*रामे रावण मारिला ।*

महंतांनी 'बहुतांचे समाधान राखावे', 'बहुतां मानेल ते करावे' असे समर्थ सांगतात. जो सर्वांना निववितो, समाधानी करू शकतो तो खरा 'जाणता गुणी' माणूस असे त्यांना

वाटते.

'समुदाय' म्हणजे समाजाचे संघटन साधायचे असेल तर 'बहुत जनांना' शहाणे करून सोडायला हवे. त्याकरिता प्रथम 'जितुके काही आपणासी ठावे। तितुके हळूहळू सर्वांना शिकवावे' असा त्यांचा प्रस्ताव आहे. समर्थांच्या साध्या साध्या वचनामागे केवढीतरी मोठी विचारांची बैठक आहे!

**भारतभ्रमण आणि समाजदर्शन**

अभूतपूर्व आत्मविश्वासाची आरोळी सह्यगिरीच्या कडेकपारी घुमवीत आणि 'जय जय रघुवीर समर्थ' म्हणून 'समर्थ' देवाविषयीचा श्रद्धाभाव जागवीत भ्रमंती करणाऱ्या रामदास्वामींनी बारा वर्षे सारा भारत हिंडून प्रत्यक्ष पाहिला होता. दुष्काळासारखी अस्मानी संकटे आणि सुलतानी आक्रमणासारखी आपत्ती त्यांनी अनुभवली. मठ-मंदिरांचा विध्वंस, ज्ञान ग्रंथाचा नायनाट, जुलमी कर लादून केलेला येथील बहुजनांचा अवमानही त्यांनी अनुभवला. शेकडो गावांची माणसं त्यांनी जवळून न्याहाळली होती आणि त्यांची गरिबी, हालअपेष्टा पाहून 'चिंतेने ऊर फाटतो' असा तळमळीचा उद्‌गार त्यांनी काढला होता. ते सांगतात,

*धान्य महाग महाग । तैसेहि मिळेना ।*
*कैसे होईल, होईल । होईल कळेना ।*
*काय होणार होणार । होणार टळेना ॥*

**''समर्थ'' शिष्य**

समर्थांची योजकता मोठी. त्यांनी महाराष्ट्राच्या गावोगावी आपले महंत आणि शिष्य निश्चित केले. समर्थ-शिष्यांमध्ये केवळ ब्राह्मण नव्हते. अठरापगड ज्ञातींचे लोक होते. परमार्थाच्या क्षेत्रात समर्थांनी वर्णभेद किंवा व्यवसायांचा भेद मानला नाही, असे त्यांच्या चरित्रकार्यातून दिसून येते. 'समर्थ प्रताप' या गिरिधरस्वामींच्या ग्रंथात समर्थांच्या त्र्याऐंशी महंतांचा गावनिशीवार उल्लेख आहे, अगदी अयोध्या, मथुरा, काशी, सुरत, रामेश्वर अशा दूरवरच्या गावी देखील मंडळी राहिली. समर्थांच्या बत्तीस मुख्य शिष्य लोकांत स्त्रियाही होत्या. गिरिधरस्वामी सांगतात,

*कित्येक शिष्य राज्याधिकारी*
*कित्येक शिष्य राज्यधारी*
*कित्येक देशाधिकारी*
*नाना पर्वतदुर्गी, भूमिदुर्गी, सिंधुदुर्गी शिष्य केले.*

मराठी संतपरंपरेतील इतर संतांच्या तुलनेने समर्थांचा स्त्रीविषयक दृष्टिकोण उदार वाटतो. त्यांनी स्त्रियांना शिष्यत्त्व तर दिलेच परंतु आपल्या मठव्यवस्थांची जबाबदारीही त्यांच्याकडे विश्वासपूर्वक सोपविली. मिरजेचा समर्थमठ वेणाबाईंनी चालविला. चाफळ येथील समर्थांचा महत्त्वाचा मठ आक्काबाईंच्या नेतृत्त्वाने चालला.

## समर्थांचे हिंदी काव्य

महाराष्ट्रातील बहुतेक सर्व संतांनी मराठीबरोबर हिंदीतूनही आपले विचार मांडले. महानुभाव कवी आचार्य दामोदर पंडित आणि संत नामदेव यांच्यापासून हिंदी कवितेची महाराष्ट्रीय परंपरा दाखविता येते.

नामदेव, एकनाथ आणि समर्थ यांनी उत्तर भारतात दीर्घ प्रवास केले. जनस्थितीचे अवलोकन केले. त्यामुळेच त्यांना उत्तर भारतीयांच्या भाषेची, परिस्थितीची आणि संस्कृतीचीही ओळख झाली असावी. समर्थांच्या हिंदी कवितेतून या वास्तवाचा चांगला प्रत्यय येऊ शकतो.

समर्थांनी एरवी कथन केलेली राष्ट्रधर्माची उदात्त शिकवण त्यांच्या हिंदी कवनात आढळून येत नाही. परंतु समर्थकालीन हिंदी काव्याचे अतिशृंगारिक वळण पाहता त्यांच्या हिंदी रचनेचे महत्त्व जाणवते. जीवनव्यवहाराचा प्रवृत्तिपर विचार जरी त्यांनी हिंदीत मांडला नाही, तरी सगुणाकडून निर्गुणाकडे जाण्याची आणि यायोगे वैश्विक अनुभव अभिव्यक्त करण्याची त्यांची पद्धती तेथेही विशेषत्वाने प्रकट होते. [१]

## व्यापक ईश्वरानुभूती

जनकल्याण हेच संतमंडळाच्या कार्याचे अंतिम साध्य होते. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ आणि तुकाराम या महाराष्ट्र-धर्माच्या थोर प्रणेत्यांप्रमाणे रामदासांनीही विश्वाच्या सौख्याची सद्भावना सतत व्यक्त केली. जो जे वांछील तो ते लाभो - दुरिताचे तिमिर जावो, सारे जग सुखमय होवो, ही ज्ञानदेवांची आपल्या पसायदानातली मागणी होती. आपण मीतूपणा विसरून हे जग सारे विठ्ठल-रुक्मिणीमय आहे हे ध्यानी घ्यावे आणि "साऱ्या जगतात ज्ञानदीप तेवावे, त्यासाठी आपण कीर्तनरंगी नाचावे", अशी नामदेवांची, प्रतिज्ञा होती. आनंदाने तिहीं लोक भरावे, जगाचे कल्याण घडवावे, म्हणून संतांच्या विभूती तुमच्या आमच्या मध्ये वावरतात, अशी तुकाराम महाराजांची भावना होती. 'संत सज्जनांच्या सत्संगापरते' श्रेष्ठ साधन दुसरे नाही, अशी एकनाथांचीही ग्वाही आहे. समर्थांनी तर आपल्या साऱ्या कवितेचा प्रपंचच संघटनेचा महामंत्र गाण्यासाठी केला. 'पृथ्वीमध्ये जितुकी शरीरे तितुकी भगवंताची घरे' अशी त्यांची व्यापक ईश्वरानुभूती असे. 'ब्राह्मणांचे ब्रह्म सोवळे। शूद्रांचे वोवळे।। असे वेगळे असेचिना' [१] अशी त्यांची एक उक्ती आहे. जनांना सन्मार्ग दाविणाऱ्या भल्यांचा महिमा कथन करतांना 'चालती बोलती देउळे। त्यामध्ये राहिले राउळे' अशी उदात्त कल्पना ते सहजी वर्णन करतात. समर्थांची अशी वचने उपेक्षित राहतात. हे संतसाहित्य आंदोलनाचे दुर्भाग्य आहे.

जातपात मानू नये. ब्राह्मण, धेड, महार, चांभार हे सारे कर्माप्रमाणे वेगवेगळे वाटले तरी त्यांच्या अंतरी एकच ईश्वर आहे. जो निरंतर नामस्मरण करतो त्याचे शरीरही पुण्य मानावे, नामाचा अधिकार चहू वर्णाचा आहे, त्यात लहानमोठा भेद नाही, इतकेच नव्हे, तर जो रामनामी रंगेल त्या कोणत्याही जाती-जमातीच्या व्यक्तीला आपण चरणस्पर्श करू असे ते म्हणतात :

*रामी भिनले ते असो नीच याती ।*
*त्यांच्या चरणांची नांदी माती ॥*

सर्वांनी सर्वांचे अंतर अथवा मन राखावे. असे करणे म्हणजेच भगवद्भजन अशी क्रांतिकारक कल्पनाही समर्थांना अगदी सहज सुचलेली आहे :

*कोणी येक भेटे नर ।*
*धेड, महार चांभार ।*
*राखावे तयाचे अंतर ।*
*त्या नाव भजन ॥*

जनसमाजाचे सामर्थ्य वाढून, ईश्वरनिष्ठांची मांदियाळी जर सर्वत्र सुखी व्हावयाची असेल तर, प्रभुरामाच्या किंवा विठोबारायाच्या भक्तांनी भजनाचा हाच अर्थ ध्यानी ठेवायला हवा. ज्या सज्जनांनी असा अर्थ आचरला त्यांचे समर्थपण समाजाने सदैव मानलेही आहे.

जनांना सज्जन करण्यासाठीच समर्थांचा सारा खटाटोप होता. त्यासाठीच त्यांनी फकिरी बाणा पत्करला. राम-कृष्णांच्या लीलागानापेक्षा प्रभूच्या प्रेरक पराक्रमाचा उद्घोष केला.

**समाज-जागरणाचा पद्धतशीर प्रयत्न**

स्वामींनी जनताजनार्दनाची जागृती करण्याची ही जी मोठी तयारी केली त्यामागची देखील भावना पाहण्यासारखी आहे. 'जनता' हा शब्द फसवा आहे हे स्वामींना ठाऊक होते. कारण सामान्य माणूस भाबडा असतो, साधा असतो, त्याला गर्जना करायला लावली की तो भोळेपणानं कुठल्याही चळवळीला बळी पडतो. अशी जनतेची स्थिती होऊ नये म्हणून समर्थ सांगतात :

*जनीं जनार्दन आहे ।*
*परि तो सज्जनीं वसे ।*
*जना आणि सज्जनाला ।*
*एकचि करता न ये ॥*

सर्वांभूती ईश्वर आहे, तसाच जनता जनार्दन आहे. पण वाटेल तसं बोलणाऱ्या, वागणाऱ्या, मस्तवाल मंडळीत जनार्दन कसा राहील? तो असतो, सज्जनांच्या घरी! म्हणून समाजात सज्जनांचा मान वाढायला हवा. 'जग तिकडे जगन्नायक' हे तर खरेच, पण त्याहीपेक्षा 'कळला पाहिजे विवेक' हे अधिक खरे. समर्थांचा संदेश मग सारखा विवेकाला, मनाला जागा करणारा दिसतो.

रामदास्वामींचे मनाचे श्लोक हा मानवसमाजाला मिळालेला मोठा ठेवाच आहे. या श्लोकातून समर्थांनी मनाला केलेला उपदेश हा वस्तुत: जनाला केलेला आहे. तो समाजाच्या सर्व थरातील आणि परिस्थितीतील स्त्री-पुरुषांना मार्गदर्शक आहे. मन हेच मानवाच्या बंधनांचे किंवा मोक्षाचे मुख्य तारण आणि कारण आहे. मनाला सुयोग्य वळण लावल्याविना कोणालाच कल्याण साधता येणार नाही. "मीपणा नष्ट करावा, आचार-उच्चार आणि विचार शुद्ध

असावेत. नामस्मरणात तल्लीन राहावे'' - हे मनाच्या श्लोकांचे सार आहे.

**जनजागरणासाठी कीर्तन**

जनजागरणासाठी कीर्तनाची चळवळ महाराष्ट्रात यादवकाळापासून सुरू होती. ज्ञानदेवांनी कीर्तनाचा महिमा वर्णिला होता. भीवरेच्या वाळवंटातील वारकरी भक्तजनांसमोर नामदेवरायांची कीर्तने रंगत असत. पुढे पंढरीपासून देशबांधवांचे प्रबोधन करण्यासाठी नामदेवांनी मुख्यत: कीर्तनकलेचाच आश्रय घेतला. महाराष्ट्र महोदयाचे पुनरुत्थान घडविण्याचा प्रयत्न करणाऱ्या पैठणच्या नाथांनी कीर्तनाद्वारे संतसत्पुरुषांची 'सगुणचरित्रे' सादर केली. बहुजनांना त्यांनी भारुडाद्वारे जागविले.

तुकाराम महाराजांच्या कीर्तनांतूनच त्यांची अभंगवाणी अमर ठरली. समर्थांनीही आपल्या देशकार्यासाठी कीर्तनाचे साधन महत्त्वाचे मानले. अखंड सावधानता, यत्न, कष्ट, साक्षेप असे काही समर्थांचे आवडीचे शब्द आहेत. त्यांचा पुन:पुन्हा उच्चार करून त्यांनी प्रयत्नवाद ठसविला आहे. हरिकथा त्यांनी महत्त्वाची मानली, पण ती कर्मयोगाबरोबर असावी असा आग्रह ठेवून :

*बहुत करावे पाठान्तर ।*
*कंठी धरावे ग्रंथान्तर ।*
*भगवत् कथा निरन्तर ।*
*करीत जावी ॥*

अशी त्यांची कीर्तनविषयक धारणा आहे. तालसुराचे ज्ञान हवे. संस्कृत सुभाषिते, वेदान्त, पुराण, इतिहास, काव्य असे सर्व ठाऊक असावे. बहुश्रुतपणे कीर्तन करावे.

समर्थांनी याबद्दलच्या बारीकसारीक सूचना आपल्या अनुयायी महंतांना दिल्या होत्या. सज्जनगडावर कीर्तन-संमेलने होत असत अशी भीमस्वामी शहापूरकरांच्या समर्थ-चरित्रात नोंद मिळते.

समर्थांनी स्वत:ची अशी खास कीर्तनपद्धती सुरू केली. नमनाच्या श्लोकानंतर लगेच निरूपण, नंतर नामघोष, पुढे आख्यान आणि अखेर समर्थ-कथा, असे या कीर्तनाचे वैशिष्ट्यपूर्ण स्वरूप आहे.

**सुखी जीवनासाठी शिकवण**

'मना सज्जना भक्तिपंथेचि जावे' म्हणतानाच समर्थ, 'तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावे' हे बजावयाला विसरत नाहीत. 'जनी वंद्य ते सर्व स्वीकारावे', 'स्वये सर्वदा नम्र वाचे वदावे' हेही त्यांचे सारखे समजावणे आहे. 'जगी सर्व सुखी असा कोण आहे । विचारें मना तूंची शोधून पाहे' असे विनवून ते म्हणतात,

*मना त्वांचि रे पूर्वसंचीत केले ।*
*तयासारिखे भोगणे प्राप्त झाले ॥*

असे होऊ नये यासाठी सत्य सोडू नये, मिथ्या भांडू नये, खोट्याची तरफदारी करू

नये, खऱ्याकडे काणाडोळा करू नये, असे मनाला सुचवून ते आश्वासन देतात,

*समर्थाचिया सेवका वक्र पाहे।*
*असा सर्व भूमंडळी कोण आहे?*

मनाचे श्लोक ही नीतिमय जीवनाचे आदर्श समजावून सांगणारी मोठी जीवनदृष्टी आहे. मोठे होण्यासाठी सोप्या आणि प्रेमाच्या भाषेत सांगणारी शिकवण आहे.

**उत्तम पुरुषाची लक्षणे**

स्वामीजी प्रपंचाचा विचारसुद्धा अगदी बारीकसारीक करतात. "आपण यथेष्ट जेवावे । उरले ते अन्न वाटावे, वाया दवडणे हे बरे नव्हे" इथंपासून ते 'शरीर' परोपकारासाठी लावावे, बहुतांचे काम करावे, प्राणिमात्रांशी जुळवून-मिळवून घ्यावे, कदापि रागात येऊ नये; मरणाचे स्मरण असावे, हरिभक्तीस सादर व्हावे - इथंपर्यंत उत्तम पुरुषांची कितीतरी लक्षणे समर्थ सतत सांगतात.

*उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा। शब्द निवडून बोलावा॥*
*सावधपणे करीत जावा। संसार आपला॥*
*आपणास चिमोठा घेतला। तेणे कासावीस जाला।*
*आपणावरून दुसऱ्याला। राखत जावे॥*
*पेरिलें ते उगवतें। बोलिल्यासारिखें उत्तर येते।*
*तरी मग कर्कश बोलावें तें। कायें निमित्य॥*

संसार सुखासमाधानाचा करण्याचा उत्तम पुरुषाचा हा मार्ग आजही मननीय आहे. स्वामींच्या कवितेवर केवळ सांप्रदायिक ठसा पाहणाऱ्या टीकाकारांनी त्यांचे उत्तम पुरुष लक्षणे सांगणारे आणि सज्जनांची महती कथन करणारे कवन जर मुळातून वाचले तर त्यांचे काही अपसमज दूर झाल्याविना रहाणार नाहीत.

**प्रपंच करावा नेटका**

समर्थांची लेखनसंपत्ती पुष्कळच आहे. पण त्यात 'दासबोध' हा ग्रंथराज. त्याची भाषा जोरकस आणि शिवाय साधीसोपी. प्रपंच नेटाने करावा. नेटकाही करावा. परमार्थ ज़रूर साधावा. पण प्रपंचाकडे पाठ फिरवून नाही किंवा फक्त प्रपंचास पत्करून नाही. जसा परमार्थात विवेक आवश्यक असतो तसाच प्रपंचातही तो हवा असतो. किंबहुना विवेकयुक्त प्रपंच केला तरच परमार्थ साधता येतो असे समर्थांचे प्रतिपादन आहे. अशा तऱ्हेने अन्य संतांहून वेगळे परमार्थ विवरण हाच समर्थांचा मोठा विशेष होय. प्रपंचाबरोबर परमार्थ आणि परमार्थाबरोबर प्रपंच अशी उत्तम सांगड कशी करायची याचा बोध म्हणजे 'दासबोध'. आम्हाला रोजच्या व्यवहारात उपयोगी पडणारे सारे काही त्यात आहे. समर्थांच्याच शब्दात म्हणायचे तर 'आत्माराम दासबोध । माझे स्वरुप स्वत:सिद्ध' असे या महाग्रंथाचे महत्त्व आहे. दासबोध हा कोणत्याही संस्कृत ग्रंथावर आधारित नाही. ती एक संपूर्ण स्वतंत्र वैचारिक कृती आहे.

जुन्या मराठीतील काव्यभांडारात 'दासबोधा' सारखा व्यावहारिक उपदेशाचा दुसरा ग्रंथ दाखविता येणार नाही. अशा ग्रंथाचे जर आपण वाचन केले तर 'जीवनबोध' झाल्याखेरीज राहणार नाही. आज परमार्थाचा व्यावसायिक पसारा मांडून आपल्या महात्मतेचे देव्हारे माजविणारे स्वार्थपरायण व्याख्याते आणि केवळ त्यांच्याच खऱ्याखोट्या कृपाप्रसादाने सारा प्रपंच सुखाचा होईल अशी भोंगळ आशा बाळगणारे अविवेकी अनुयायी यांना 'दासबोध' सन्मार्ग दाखवू शकेल. संतांच्या साहित्यात टाळकुटेपणा आहे किंवा कालबाह्य विचारच भरलेले आहेत, असा भ्रमयुक्त पूर्वग्रह असल्यामुळे संतसाहित्याची टवाळी करणाऱ्यांनाही 'दासबोधा' मध्येच प्रत्युत्तर मिळण्यासारखे आहे.

*मीपणापासून सुटला। तोचि एक मुक्त जाला।*
*मुका अथवा बोलिला। तरी तो मुक्त॥*
*जया अंतरी भगवंत। अचळ राहिला निवांत।*
*तो स्वभावे जे बोलत। ते ब्रह्मनिरुपण॥*

अशी दासबोधाची महती आहे.

**समन्वयशीलता**

सामान्यत: समर्थ हे केवळ रामभक्तच होते अशी समजूत आहे. 'रामदास्य' समर्थांनी सर्वोपरी मानले हे खरे, पण त्यांची उपासना एकांडी होती किंवा अन्य देवीदैवतांविषयी त्यांच्या मनात श्रद्धाच नव्हती असे म्हणता येणार नाही. समर्थांचा मर्यादापुरुषोत्तम श्रीराम हा महाविष्णूचा अवतार आहे. तो प्रभू आहे आणि निगुर्णनिराकार परब्रह्मस्वरूपही आहे. डॉ. यू.म. पठाण यांनी म्हटल्याप्रमाणे 'समाजाभिमुखता आणि समाजविन्मुखता, प्रवृत्ती आणि निवृत्ती, महाराष्ट्रधर्म आणि विश्वधर्म, राम आणि आत्माराम' यांचा जो समन्वय समर्थांनी साधला आहे तो महाराष्ट्राच्या इतिहासात तरी अपूर्वच म्हणायला हवा. [२]

समर्थपूर्व काळात समन्वयशील वृत्तीच्या एकनाथांनी श्रीकृष्ण भक्ती, विठ्ठलभक्ती आणि रामभक्ती यांच्यातील भेद आपल्या आचरणाने आणि काव्यरचनेने सर्वांसमोर ठेविला होता. नाथांचे भागवत आणि भावार्थरामायण दोन्ही प्रसिद्ध आहेत. समर्थही समन्वयी होते. प्रभू रामचंद्र आणि भक्त हनुमंत यांच्याबरोबर शिव, शक्ती, गणेश, कृष्ण, नरसिंह, सूर्य, शारदा, खंडोबा, भैरव, व्यंकटेश, विठ्ठल अशा विविध देवीदेवतांची अर्चना समर्थांनी केलेली आहे.

गणरायाच्या पूजेसाठी आज आपण म्हणतो ती "सुखकर्ता दु:खहर्ता वार्ता विघ्नाची। नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची" ही सर्वांगसुंदर आरती समर्थांनी रचलेली आहे.

समर्थ अगदी सहज लिहून जातात,

*"राम अयोध्येचा वासी। तोचि नांदे द्वारकेसी॥"*

विष्णू आणि शिव यांचे ऐक्य सगुणसाकार करणाऱ्या पंढरीच्या नाथाबद्दल त्यांचा उत्कट उद्गार आहे :

*रामदास म्हणे धरा भक्तिभाव । कृपाळू राघव पांडुरंग ।।*

'पंढरी ऐसे तिन्हीं ताळीं । क्षेत्र नाही भूमंडळी' असे त्यांनी श्रीविठ्ठलाच्या नगरीचे वर्णन केले आहे.

समर्थ सामर्थ्याचे आग्रही उपासकही होते. आणि समन्वयाचे महत्त्व त्यांना पुरेपुर ठाऊक होते. आपल्या सर्व रचनेत संघटनेवरच त्यांनी भर दिला. लौकिक आणि अलौकिक यांचा मेळ घालून देश कसा समर्थ बनेल ही त्यांची चिंता होती. दुर्दैवाने त्यांची ही चिंता पुढील काळातही शिल्लक राहिली.

...बहुजनसमाजात सर्वत्र पोचलेला वारकरी संप्रदाय आणि स्वधर्माच्या रक्षणासाठी देवांचा कैपक्ष घेणारा राजा असावा लागतो असे म्हणणारा समर्थ संप्रदाय या दोहोंचे हात एकमेकांत गुंतले गेले असते तर?

तर भारताचा आणि महाराष्ट्राचा इतिहासच बदलला असता!

~

१. अशोक कामत 'मराठी संतांची हिंदी रचना', प्रसाद, पुणे, एप्रिल, १९८६.

२. "रामदासांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व" श्री. स. वा. मंदिर धुळे, स्मरणिका १९८६. पृ. ६

~~

# गुरु गोरखनाथ आणि समर्थ रामदास एक तुलनात्मक आकलन

# २

---

**भारतीय वाङ्मयेतिहासात संतभक्त सत्पुरुषांची कामगिरी फार मोठी आहे. देशाच्या प्रत्येक भागात, वेळोवेळी जे संत-महात्मे झाले, त्यांची जात-जमात, प्रांत-पंथ, भाषा-बोली, उपास्य-संप्रदाय भिन्न वाटले तरी त्यांच्यातील एकताही तशीच विस्मयकारक आहे. तुकडोजी महाराजांच्या शब्दात सांगायचे झाले तर...**

*संत देहाने भिन्न असती । परि ध्येय धोरणाने अभिन्न स्थिति ।*
*साधने जरी नाना दिसती । तरी सिद्धान्तमति सारखी ॥* [१]

**खरे तर साधू-संत विचाराने नि आचाराने केवळ ''भारतीय'' होते. जे जे भारतीय ते ते त्यांना मनापासून आवडले. त्याचाच त्यांनी कालौघात उचित अनुचित पाहून प्रचार प्रसार केला. पुरस्कार केला. संतमहात्म्यांच्या आंतरिक ऐक्याविषयी समर्थ रामदासही सांगून गेले आहेत :**

*साधू दिसती वेगळाले । परि ते स्वरूपीं मिळाले ॥*
*अवघे मिळाने जाले । देहातीत वस्तू ॥* [२]

**या दृष्टीने गुरु गोरखनाथ आणि समर्थ रामदास यांची तुलना करण्यासारखी आहे.**

---

### दोन थोर समाजपुरुष

मध्ययुगीन भारतीय साधनेचे अखिल भारतीय पातळीवर उत्थान घडविण्याचे श्रेय गुरु गोरखनाथांना द्यावे लागते. त्यांची प्रज्ञा असामान्य होती. त्यांचे विचार क्रांतिकारी होते. त्यांनी साऱ्या भारतात संचार करून प्रांतोप्रांती अनेक अनुयायी निर्माण केले. भारतभर त्यांच्या प्रवासाची स्मृतिचिन्हे आढळतात. सर्व भारतीय भाषांतून त्यांच्याविषयीच्या कथागाथा मिळतात. ग्रंथही आहेत.

निस्सीम गुरुभक्त मत्स्येंद्रशिष्य गोरखनाथ, महान योगीराज होते. त्यांनी आजन्म ब्रह्मचर्यव्रताचे पालन करून विषयवासनेवर विजय मिळविला होता. ज्ञानेश्वरांनी त्यांना ''विषयविध्वंसैकवीर'' या विशेषणाने गौरविले आहे. [३]

निष्कलंक चारित्र्य, प्रभावी व्यक्तिमत्त्व आणि तशीच हृदयस्पर्शी वाणी गोरखनाथांना

लाभली होती. जनताजनार्दनाच्या कल्याणाची त्यांना कमालीची ओढ लागून राहिली होती. त्यांची संघटनशक्ती अपूर्व होती. कुशाग्र बुद्धी, धवल चारित्र्य, अद्‌भुत सत्यनिष्ठा, विलक्षण निग्रह इत्यादी गुणसंपदेने गोरखनाथांनी अंधरूढी नि बाह्यावडंबरावर कठोर प्रहार केले. योगमार्ग अथवा कायासाधनेला सुव्यवस्थित स्वरूप देऊन तत्कालीन साधनेमध्ये आलेल्या विकृती दूर केल्या. यासाठी लोकभाषा नि लोकसरणी अनुसरीत त्यांनी पुढीलांना समाजहितैषी जीवनसाधनेसाठी प्रभावी प्रेरणा प्रदान केली.

नवनारायणापैकी हरिनारायणाचा अवतार, असे गोरक्षवर्णन पुराणग्रंथ आणि लोकसाहित्य यांतून मिळते. नगर जिल्ह्यातील मढीचा कान्होबा हेच गोरखनाथाचे समाधिस्थळ होय, असे काही महाराष्ट्रीय विद्वानांनी साधार स्पष्ट केले आहे. [४]

गुरु गोरक्षनाथांच्या काळापासून शिवयुगाच्या अखेरीपर्यंत महाराष्ट्रात निवृत्ति, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादी अगणित संतसत्पुरुषांची जी मांदियाळी निर्माण झाली त्या मांदियाळीतील अखेरचे महापुरुष समर्थ रामदास होते. त्यांनी आजीवन मर्यादापुरुषोत्तमाचे ''रामदास्य'' आचरले. परमार्थमार्गावर त्यांनी केलेल्या सफल वाटचालीवर त्यांना कोणी मानवी गुरू मिळाला नाही, म्हणून त्यांची साधना एकप्रकारे स्वयंशासित आहे. जिथे जिथे गुणविशेष आढळतील, तिथे तिथे सद्‌गुरूचे अधिष्ठान मानून ते निरंतर कार्यरत राहिले. नंतर सकळ जनांस शहाणे करून सोडण्याच्या ईर्ष्येने त्यांनी आपल्या काळात असामान्य संघटना उभ्या केल्या. चळवळीचे सामर्थ्य चेतविले. ते राजकारणाचे महत्त्व मानणारे संत होते. पण धर्मकारण आणि समाजकारणासाठी राजकारण, अशी त्यांची भूमिका होती. म्हणूनच शिवाजीसारख्या सज्जन समर्थांशी त्यांची जवळीक झाली, असे म्हणता येईल.

हिंदू धर्माला ग्लानी आलेल्या काळात गुरु गोरखनाथांनी पुन्हा एकदा विशुद्ध धर्मभावना समाजात जागविली. समर्थांनी सज्जन आणि समर्थ दोहोंत ''रामदास्य'' कसे निर्माण होईल आणि बलवंत होऊन पाप आणि पापी दोहोंचे निखंदन कसे करता येईल याची चिंता वाहिली.

दोघेही समाजपुरुष ब्रह्मचर्यव्रती होते. दोहोंनी योगबळाने शारीरिक तेज आणि मनोबल आत्मसात केले होते. दोहोंचा भर विद्या नि विवेक यांवर होता. दोहोंनी भारतयात्रा करीत आपल्या शिष्य-समाजाचे प्रभावीपणे संघटन केले.

### तपस्याभूमीचे साधर्म्य

नाथपंथीय सिद्धयोग्यांची मूळ भूमी कोणती हा एक विवाद्य विषय आहे. हिमाचलाच्या कुशीतील अनेक प्रदेशांपासून पंजाब, उत्तरप्रदेश, बिहार, बंगाल आणि महाराष्ट्रापर्यंत नाथसिद्धांच्या प्रभावखुणा दाखविल्या जातात. यांपैकी नगर-नाशिक परिसरातील खाणाखुणा आजही विशेष महत्त्वाच्या मानाव्यात अशा आहेत.

नाशिकनजिक सप्तशृंगगडावर देवीप्रमाणेच नाथसिद्धांची ठाणीं आहेत. दक्षिणगंगा गोदावरीच्या उगमस्थानी त्र्यंबकेश्वरला प्रख्यात ब्रह्मगिरी आहे. निवृत्तिगुरु गहिनीनाथांची

समाधीगुंफा याच ठिकाणी विद्यमान आहे. दर बारा वर्षांनी या ठिकाणी कुंभमेळा साजरा होतो. त्यासाठी तमाम भारतवर्षांतून अनेक नाथपंथीय संन्यासी-गोसावी येथे जमतात. नाथांच्या अनेक आखाड्यांचाही या परिसरात नित्य संचार राहातो.

समर्थांनी जांब उस्मानाबादकडे अवतार ग्रहण केला आणि वयाच्या अवघ्या बाराव्या वर्षी ते परिभ्रमण करीत या नाथसिद्धांच्या भूमीकडे आले. माघ शुद्ध ७ शके १५४२ ते १५५४ या काळात त्यांनी टाकळीला गोदातटाकी गायत्री पुरश्चरण केले. या काळात समर्थांना अनेक नाथसिद्ध सहज भेटले असतील. साऱ्या देशातून नासिक-त्र्यंबकेश्वरला आकर्षिले जाणारे नाथयोगी त्यांनी जवळून अनुभवले असतील.

स्वतः समर्थ रामदास एक श्रेष्ठ योगीराज होते हे त्यांची साधी प्रचलित प्रतिमा जरी पाहिली, तरी ध्यानी येते. समर्थ चरित्रकारांनी तर त्यांच्या योगसामर्थ्याच्या काही चमत्कारकथाही रंगविलेल्या आहेत.

शके १५५४ नंतर सुमारे बारा वर्षे समर्थांनी उत्तरभारतात दीर्घ पदयात्रा केली. या काळात त्यांनी हिमालयात अनेक योग्यांची तपस्या अनुभवली. ज्या नेपाळात माता तुळजाभवानीची उपासना चालते आणि गुरु गोरखनाथांना साक्षात पशुपतिनाथाचा अवतार मानण्यात येते, त्याही भागात समर्थांचा संचार झाला होता.

उत्तराखण्डातील पवित्र हिंदू क्षेत्रांच्या दर्शनानंतर समर्थ द्वारकेकडे आले. ते बराच काळ सौराष्ट्र, कच्छ, गिरनार प्रदेशात वावरले. त्या ठिकाणी चौदाव्या शतकातील गोरखशिष्य धर्मनाथ यांचा फार मोठा प्रभाव आजही आहे. समर्थांनी या ठिकाणीही संघटित आणि गुरुभक्त नाथपंथियांचे अवलोकन केले असले पाहिजे.

**प्रत्ययासाठी भ्रमण**

गुरु गोरक्षनाथ आणि समर्थ रामदास हे दोघेही मळलेल्या वाटेने जाणारे अध्यात्मसाधक नव्हते. दोघांपाशी प्रयोगशीलता होती. प्रखर ज्ञानसाधना दोघांनीही केली. पण त्यांचे मन ग्रंथशरण नव्हते. वाचले ते प्रत्ययाला आल्याशिवाय घ्यायचे नाही अशी दोहोंची प्रवृत्ती होती. दोघांना तपाचरण प्रिय होते. समर्थांनी टाकळी-जवळच्या गुंफेत प्रथम आपला पारमार्थिक प्रपंच थाटला. पुढे शिवथरघळ हीच त्यांची जीवनसंगिनी बनली. गुरु गोरक्षही गुंफाप्रिय होते. त्यांच्या पुनीत वास्तव्याच्या कितीतरी प्रभावखुणा आज गुंफारूपानेच भारतात अनेक ठिकाणी दाखविल्या जातात.

दोघेही महात्मे परिभ्रमणप्रिय होते. ईश्वराची सृष्टी प्रत्यक्ष पाहावी - ''जें वडिलीं निर्माण केले। तें पाहिजें पाहिलें'' अशी त्यांची जिद्द असावी.

गुरु गोरक्ष यःकश्चित् ठिकाणी अवतीर्ण झाले आणि मत्स्येंद्रकृपेने कायासाधना करीत देशभर भ्रमण करीत राहिले. समर्थ जांबसारख्या आडगावी जन्मले. शैशवानंतर बारा वर्ष दक्षिणगंगेच्या तटावर तपाचरण आणि पुढे बारा वर्ष देशभर प्रवास - असे त्यांचे अर्धे जीवन केवळ साधना करण्यात गेले. ही साधना जशी वैयक्तिक होती तशी काही प्रमाणात

ती कायासाधनाही होती. या साधनेमागे चिंतन आणि जनमन जाणून घेण्याचीही दृष्टी आहे. गोरक्षांचा देखील जीवनप्रवास असाच असला पाहिजे. दोघांनीही आपापल्या काळी समाजाला स्वार्थत्याग, स्वाभिमान आणि प्रयत्नशीलता सांगितली. संघटनेचा मंत्र दिला. प्रत्यक्ष आचरणाने दिला.

**योग आणि विवेक**

या साधुपुरुषांच्या विचारात, वाणीत आणि समाजप्रबोधन पद्धतीत एक साम्याचा विलक्षण धागा आहे. डॉ. इंदू लिमये यांनी म्हटल्याप्रमाणे :

"काळाप्रमाणे काही विचारांच्या संदर्भात थोडाफार वेगळेपणा आढळेल, परंतु दोघांचीही तांत्रिक बैठक उच्च आहे. ती जीवनधारणेसाठी आहे. समाजाच्या उद्धारासाठी आहे. उपास्यदैवत भिन्न असले तरी विचारधारा सारखीच आहे. तो औपनिषदिक वारसा आहे. जीवन जगायचे, जगायला सांगायचे, ते प्रारब्धावर विश्वास ठेवून, कंटाळवाणेपणाने नाही. त्याचबरोबर विलासी, भोगी, आत्मकेंद्रित, स्वार्थी, विकारी या स्वरूपाचे नाहीच. आत्मानुशासनाचा खरा अर्थ या महात्म्यांनी प्रत्यक्षात आणला."[५]

विवेक हाच दोहोंचा परवलीचा शब्द आहे. समर्थ तर विवेकयुक्त वैराग्य हीच मोठी "योगसाधना" मानतात. विचार, ज्ञान आणि कार्य यात सुसंगती साधावी म्हणून असा योग आचरण्याचा ते उपदेश करतात :

*म्हणौनि विवेक आणि वैराग्य*
*तेचि जाणिजे महद्भाग्य ।*
*रामदास म्हणे योग्य ।*
*साधू जाणता ॥*

(दा. १२.४.२०)

साधक, साधू आणि आत्मज्ञानी सत्पुरुष असा क्रम सांगून समर्थांनी मोठ्या मार्मिक रीतीने योगाचारात विवेकाचे महत्त्वपूर्ण स्थान सांगितले आहे :

*तैसा साधू आत्मज्ञानी ।*
*बोधे पूर्ण समाधानी ।*
*विवेके आत्मनिवेदनी ।*
*आत्मरूपीं ।*

(दा. ९.३.३२)

एका स्फुट अभंगातही समर्थांनी वीतरागी, निरंहकारी, ज्ञानी आणि विवेकी योग्याचे सुरेख शब्दचित्र रेखाटलेले आहे. ते म्हणतात :

*जाणावा तो योगी सदा वीतरागी ।*
*अहंभाव त्यागी अंतरीचा ॥*
*स्वजन, स्वदेश, सोडुनी उदास ।*

*तेणे आशापाश तोडियले ॥*
*दया, सरस्वती वैभव, व्युत्पत्ती ।*
*ज्ञानबळे चित्तीं चाड नाही ॥*
*विषयांचा श्रम तुच्छ केला ।*
*विवेकाचे बळ जाहले प्रबळ ॥*
*बाह्य मायाजळ त्यागियेले ।*
*धन्य धन्य दास संसारी उदास ।*
*तया रामदास मानीतसे ॥*

### संघटनेचा सर्वांगीण प्रयत्न

गुरु गोरखनाथ आणि त्यांचे निकट वारसदार संत नामदेव यांच्या हिंदी काव्यात "हिंदू पूजै देहुरा मुसलमाणु मसीत।" अशा तऱ्हेची हिंदू-मुसलमान समन्वयाची दृष्टी दिसून येते. समर्थ रामदासांच्या नावावर उपलब्ध असलेल्या हिंदी काव्यातही "अजब अलामिया रे।", "हिंदु मुसलमान चामके पुतले", "रे भाई काहेकू लडते, लडते सब पडते" असे उदार विचारांचे उद्‌गार आढळून येतात. एक पद पाहा :

*घट घट सांही या रे ।*
*अजब अलामिया रे ॥*
*ये हिंदु मुसलमाना दोन्हो चलावे ।*
*पछानी सो भावे ॥*
*सुरजिनहार बडा करता है ।*
*कोइ एक जाने पार ॥* [६]

यावरून "मराठा तितुका मेळवावा" ही समर्थांची सांगी प्रसंगी किती व्यापक होते हेच दिसून येत नाही काय ?

नाथांचा नि समर्थांचा सदैव सामाजिक संघटनकार्यावर भर होता. दोहोंनी त्यासाठी जीवन वाहिले. गुरु गोरक्षनाथांनी भारतभर प्रवास करून मठस्थापना केली. अनेक मठपती लोकनायक तयार केले. त्यांनी त्या त्या भागात फार मोठी जनजागृती केली. सांप्रदायिक संघटना बांधली. समर्थांची मठ-महंत कल्पना बहुधा त्यांनी गोरक्षांकडून स्वीकारली असावी.

नाथांचा मार्ग नि समर्थांचा पंथ हे दोन्हीही "गुरुत्र सन्मार्गदर्शनशील" म्हणून "निगुरा न रहिबा" (हे साधका, तू गुरुहीन राहू नयेस!) असा सिद्धांत सांगणारे आहेत. गुरु गोरक्षनाथ हे आपल्या गुरुमाउलीच्या भक्तीत निरंतर रंगून गेलेले आहेत. समर्थ सांप्रदायिक गुरु समर्थांच्या भक्तीत रंगून गेलेले असतात.

नाथ आणि समर्थ यात एक मात्र फरक मोठाच आहे. "गुरुहीन" नसावे असे म्हणताना गुरू हीनकुलीन असणे नसणे हे नाथ संप्रदायात महत्त्वाचे मानले गेले नाही. साधनामार्गात गुरू अनिवार्य. तो श्रेष्ठ अधिकारी असावा आणि गुरू वा शिष्य दोहोंनी जातजमात आदी

संकुचित विचारसरणीवर मात करावी असा नाथांचा कटाक्ष दिसतो.

**समर्थकृत गोरक्षप्रशंसा**

नामदेवादी वारकरी संतांनी समकालीनांबद्दल अतिशय आत्मीयतेने लिहिले आहे. पुढे एकनाथ-तुकारामांनीही वारकरी परंपरेतील सत्पुरुषांबद्दल फार जिव्हाळ्याने आणि कृतज्ञतेने गौरवाचे उद्‌गार काढले आहेत. समर्थ रामदासांनी मात्र वारकरी संत-सज्जनांच्या विराट कार्याबद्दल आणि काव्याविषयी मौन राखलेले दिसते. पण आपला वारसा कथन करताना ते गुरु गोरक्षनाथांना मात्र विसरलेले नाहीत.

समर्थांच्या मनात नाथसांप्रदायाचे अध्वर्यू आणि मध्यकालीन भारतीय धर्मसाधनेचे शुद्धीकरण करणारे थोर योगी सत्पुरुष म्हणून गुरु गोरक्षनाथ यांच्याविषयी नितांत आदराची भावना वसत होती.

*असो पूर्वी थोर थोर । जेणें ज्ञाने पैलपार ।*
*पावले ते साचार । ऐक आता ॥*
*वामदेवादिक योगेश्वर । वाल्मीक अत्रि ऋषेश्वर ।*
*शौनिकादि अध्यात्मसार । वेदांतमतें ॥*
*सनकादिक मुख्य करूनी । आदिनाथ मीन गोरक्षमुनी ।*
*आणीक बोलतां वचनीं । अगाध असती ॥*

(दासबोध / ५-६. २२,२४,२५)

अशा प्रकारे समर्थ ऐतिहासिक काळातील ज्ञात व्यक्तींऐवजी पौराणिक युगातील ऋषीमुनींच्या बरोबरीने समर्थ गुरु गोरक्षनाथांचा विचार करतात, हे ध्यानात घेण्यासारखे आहे. गुरु गोरक्षांच्या अगाध ज्ञानाचा नि कार्याचा उच्चार करून आपल्या शिष्यमहंतांना भिक्षेचा आदर्श सांगतांनाही ते दत्त-गोरक्षनाथांचा कित्ता कसा सांगतात, हे देखील पाहण्यासारखे आहे :

*दत्त गोरक्ष आदि करुनी । सिद्ध भिक्षा मागती जनीं ।*
*निस्पृहता भिक्षेपासुनी । प्रगट होये ॥*

(दासबोध १४.२.५)

दत्तात्रेयमुनींच्या आणि गुरु गोरक्षनाथांच्या संवादात्मक उपदेशाचा म्हणून नाथसांप्रदायात प्रतिष्ठा पावलेल्या "अवधूतगीता" या ज्ञानमार्गी ग्रंथाचा समर्थांनी स्वाध्यायासाठी उपयुक्त ग्रंथ म्हणून निर्देश केलेला आहे.

*अवधूतगीता केली । गोरक्षांस निरोपिली ।*
*ते अवधूतगीता बोलिली । ज्ञानमार्ग ॥*

(दासबोध ७.७.३४)

याशिवाय दासबोधरचनेसाठी ज्या बारा गीताग्रंथांचा आधार समर्थांनी घेतला त्यातही त्यांनी अवधूतगीतेचा उल्लेख केला आहे. (दासबोध १.१.१८)

### गोरक्ष - आदर्शांचे स्मरण

शुकासारिखे पूर्ण वैराग्य अंगी बाणविणारे समर्थ हे योगबळाचे उपासक होते. त्यांचा योगी-जनांशी, योगमार्गाशी चांगला परिचय होता. गोरक्षनाथांच्या नंतर नामदेव, एकनाथ इत्यादी वारकरी व अनेक महानुभाव कवींनी हिंदी कविता लिहून मराठीतर भाषिकांसमोर आपले विचार मांडले. दक्षिणेत दखिनी व उर्दू काव्याचीही मोठी परंपरा होती. समर्थांनी या परंपरेचे अनुसरण केले असे म्हणता येईल.

ही सारी पार्श्वभूमी ध्यानात घेतली की समर्थांच्या हिंदी कवनात जी गोरक्षप्रशंसा येते त्याचे रहस्य उलगडते. याच ठिकाणी हे ध्यानात घ्यायला हवे की गुरु गोरक्षनाथ हे हिंदीतील आदिकवींपैकी एक असून त्यांचा वाङ्मयीन परंपरेने पाहता दृढ संबंध महाराष्ट्रातील वारकरीपंथीय ज्ञानदेव-नामदेवादी संतांशी आहे.

समर्थांचे गोरक्षस्तुतिपर हिंदी पद असे आहे :

*आलेख जागे आलेख जागे सब काउ कहे ।*
*आलेख आलेख सो न्यारा, जैसी कहिणी वैसी रहणी ।*
*सोई नाथ प्यारा, आलेख जागे ।*
*गोरख गोरख सब कोउ कहे,*
*गोरख न बुझे कोहे ।*
*जोगींद्रकु जो कोउ रखे,*
*सोई गोरख होये ॥*

*(समर्थांचा गाथा. २६८)*

या पदात समर्थकालीन नाथ-योग्यांची जी अवनत अवस्था झालेली होती, त्याचा सूचक उल्लेख आहे. गुरु गोरक्षनाथांच्या मूळच्या श्रेष्ठ तपस्वी स्वरुपाबद्दलही समर्थांनी आपली भावना व्यक्त केलेली आहेच.

### लोकभाषेचा पुरस्कार

गुरु गोरक्षनाथांना संस्कृत भाषेचे उत्तम ज्ञान होते. त्यांचे अवधूतगीता, अमनस्क महायोग, गोरक्षकल्प, गोरक्षकौमुदी, गोरक्षगीता, गोरक्षशतक, योगसिद्धासनपद्धति, सिद्धसिद्धान्तपद्धति इत्यादी सुमारे अठ्ठावीस संस्कृत ग्रंथ सांगितले जातात. या बहुतेक ग्रंथांतून गोरक्षवचनांचे संकलन आहे. त्यांचे जनप्रिय ग्रंथ मात्र लोकभाषेत आहेत. त्यांचीही संख्या चाळीस भरते. यापैकी सबदी, आत्मबोध, ग्यानतिलक, सिष्यादरसन, अभैमात्रा जोग, मच्छींद्र गोरखबोध हे काही प्रमुख हिंदी ग्रंथ आहेत.

समर्थ रामदासांनाही संस्कृत भाषेचे चांगले ज्ञान होते. आपल्या स्वाध्यायासाठी त्यांनी अनेक संस्कृत ग्रंथांचे स्वहस्ताक्षरात लेखन केले. आज धुळ्याच्या समर्थ वाग्देवता मंदिरात उपलब्ध असलेले त्यांचे हस्ताक्षर हे संस्कृत वाल्मीकि रामायणाच्या प्रतिलिपीचे आहे.

समर्थांनी जनहितासाठी लोकभाषेतून लेखन केले. "दिसामाजी काहीतरी ते लिहावे."

अशा प्रतिज्ञेने त्यांनी प्रचंड रचना केली. ही सर्व रचना म्हणजे प्रपंच कसा नेटका करावा, परमार्थ आणि राजकारण यांचा मेळ कसा घालावा याचा जणू लोकभाषेतील आद्य व्यावाहारिक ज्ञानकोषच आहे.

**उपसंहार**

गुरु गोरक्षनाथांनी भारतीय धर्मसाधनेचे शुद्धीकरण केले. समर्थ रामदासही परंपरा आणि अर्वाचीन काळातील समस्या यांचा डोळसपणाने विचार करणाऱ्या समाजपुरुषात एक महत्त्वाचा दुवा ठरले आहेत. रामदासांनी केवळ पारमार्थिकाचा विचार न करता प्रवृत्तीमार्ग कथन केला. माणसाने लौकिक आणि पारलौकिक आनंद मिळविताना माणूसपणाही उन्नत करावा, अशी दोहोंची अपेक्षा होती.

गोरक्ष-रामदास दोहोंचाही भर प्रत्यक्ष अनुभवावर आहे.

परखड बुद्धिवादी अभिव्यक्ती हाही गोरक्ष-रामदासांचा एक समान विशेष होय. प्रखर आत्मविश्वास, ठामपणा, वाचक-श्रोत्यांशी जवळीक दोघांनीही प्रकट केली. दोघांकडे नव्या पिढीला आकर्षित करण्याची कला होती.

हे सारे ध्यानी घेऊन नाथसांप्रदायिक सत्पुरुषांच्या आणि समर्थांच्या काव्यकार्याचा विचार एकत्रितपणे करण्यासारखा आहे. नव्हे, तसे करणेच औचित्याचे आहे.



१. ग्रामगीता अ. २४/३६

२. दासबोध ७.२

३. ज्ञानेश्वरी : अ. १८.१७५६

४. श्रीज्ञानेश्वर दर्शन (सं) (न.बा. देशमुख) लेख : सरदार ना. य. मिरीकर : ''ज्ञानेश्वरांचा नाथपंथ'' अहमदनगर. १९३४ पृ. ९०

५. ''गोरखनाथ आणि रामदास यांची जीवनाभिमुखता'', ''प्रसाद'', ऑगस्ट १९८४.

६. अनंतदास रामदासी (सं.) ''श्रीसमर्थांचा गाथा'', श्रीसमर्थ गोसेवा मठ, वाई. (प्रं.सं.)



# समर्थांची विठ्ठलभक्ती आणि नामदेवांची रामभक्ती

# ३

ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास हे मराठी माणसाचे संत-पंचायतन! तेराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत या थोर सत्पुरुषांनी महाराष्ट्रधर्माचे प्रणयन केले. हे सारेच ईश्वरावर श्रद्धा ठेवणारे होते. ईश्वराचे विविधरूपत्व त्यांना मान्य होते. म्हणून या महाराष्ट्रधर्माच्या प्रणेत्यांच्या भक्तांनी वा अनुयायांनी त्यांचेपासून समन्वयाची दृष्टी घ्यायला हवी-जी आजच्या घडीची फार मोठी गरज आहे.

प्रस्तुत लेखात समर्थांच्या विठ्ठलोपासनेची आणि संत नामदेवांच्या रामभक्तीची ओळख समन्वयनिष्ठ मराठी संतपरंपरेच्या संदर्भात करून दिली आहे.

---

**''पंढरी ऐसे क्षेत्र नाही भूमंडळी''**

समर्थ रामदास जरी श्रीरामाचे अनन्य उपासक असले तरी ते पंढरीरायाच्या दर्शनाला गेले होते असे दिसते. श्रीविठ्ठलमंदिराचा दुरून कळस जरी पाहिला तरी अहंभाव संपतो, चंद्रभागास्नानाने सर्वश्रेष्ठ अशी सायुज्य मुक्ती मिळते या जाणिवेने समर्थांनी विठ्ठलाचे पायी मिठी घातल्याचे वर्णन त्यांच्या काव्यात उपलब्ध आहे:

*पंढरी ऐसे तिन्हीं ताळी । क्षेत्र नाही भूमंडळी ॥*
*दुरुनि देखत कळस । होय अहंकाराचा नाश ॥*
*होता संताचिया भेटी । जन्म मरणा पडे तुटी ॥*
*चंद्रभागेमाजी न्हाता । मुक्ति लाभे सायुज्यता ॥*
*दृष्टी न पडे ब्रह्मादिका । प्राप्त झाले ते भाविका ॥*
*रामदासा झाली भेटी । विठ्ठलपायी दिधली मिठी ॥*

*(अनंतदास रामदासी : समर्थांचा गाथा पृ. २६)*

पंढरीच्या क्षेत्राचा असा महिमा समर्थांनी गायिला असला तरी ''पंढरी नव्हे एक देशी। विठ्ठल सर्वत्र निवासी'' असा त्यांचा परमानुभवही त्यांनी प्रकट केला आहे. कधी नरदेह हीच पंढरी आणि आत्मा हाच पंढरीचा राणा आहे असे म्हणून या परमतत्त्वाचा महोत्सव

आपण सदासर्वकाळ अनुभवावा असे ते सांगून जातात.

**''माउली भक्तालागी उभी''**

एका अभंगात तर समर्थांनी श्रीविठ्ठलाला माउली म्हणूनही हाकारल्याचे दिसते.

भक्तांना कटिखांद्यावर घेण्यासाठी ''विठाईजननी वैकुंठीहून पुंडलिकपुरीत पातली'' असून ती ''आजानुबाहु श्रीरामासारखी भक्ता आलिंगन द्यावया आसुसली'' आहे, असे वर्णन करीत ते गातात :

*मुकुटी मयूरपत्रे त्रिदली । विटे नीट असे ठाकली ॥*
*रामदासाची माउली । भक्तालागीं उभी असे ॥*

(*ह.अ. भावे : श्रीरामदासांचे समग्रग्रंथ पृ. ५०५*)

एके ठिकाणी तर ''विठोबा'' आपले कुलदैवतच असल्याचेही समर्थ म्हणतात. हे शरणागत वर्णन त्यांचे की संत नामदेवांचे असा संभ्रम पडावा, अशी ही उत्कट रचना आहे :

*विठोबा तू आमुचे कुलदैवत । आम्ही अनन्य शरणागत ॥*
*तुझे पायी असे चित्त । जीवीं आर्त भेटीचे ॥*
*धावे धावे विठो माये । उडी घाली लवलाहे ॥*
*भेटावया जीव फुटो पाहे । खंती देही न समाये ॥*
*रामदास बाहे करुणावचनी । धावे बाह्या पसरोनी ॥*
*अश्रू दाटले लोचनी । अलिंगनी पातली ॥*

(*समर्थांचा गाथा पृ. २५*)

**''आम्ही देखिला विठोबा''**

कधी समर्थ विठोबा-रखुमाईच्या दर्शनासाठी पंढरीच्या क्षेत्री दाटलेल्या वारकऱ्यांच्या आनंदात सहभागी होत, छोटासा अभंग रचतात :

*आम्ही देखिला विठोबा । आनंदे विटेवरी उभा ॥*
*तेथे दृश्याची जे दाटी । तेचि रुक्मिणी गोमटी ॥*
*रामीरामदास म्हणे ॥ जो ओळखे तोचि धन्य ॥*

(*श्रीरामदासांचे समग्र ग्रंथ पृ. ५८०*)

वारकरी संतांच्या श्रीविठ्ठलप्रीतीशी अशा प्रकारचे विलक्षण नाते व्यक्त करणाऱ्या समर्थरचनेचे काही पुरावे देऊन न्या. रा.के. रानडे यांनी म्हटले आहे : ''भागवत-धर्म मंदिराच्या गाभाऱ्यात तुकोबाने मूर्तीची स्थापना केली व रामदास हे त्या मंदिराचे कळस झाले.'' पुढे तर बहिणाबाईच्या भागवतधर्मी संतपरंपरेचे वर्णन करणाऱ्या प्रसिद्ध अभंगाला अशी पुस्ती जोडण्याचाही त्यांना अनावर मोह झाला आहे :

*देव रामकृष्ण हरी । तुका बैसवी गाभारी ॥*
*समर्थ झाले कळस । राम वंदे त्या सर्वांस ॥* [१]

न्यायमूर्तींचे हे म्हणणे फारच अतिशयोक्तीचे वाटते. एक तर 'रामकृष्णहरी' हा वारकरी सांप्रदायाचा समन्वयशील मंत्र आहे. वेगळी मूर्ती नव्हे. ते श्रीविठ्ठलाचेच वर्णन आहे. तुकोबारायांच्या आधीपासून ही समन्वयाची बैठक वारकरी पंथाला लाभलेली आहे. त्यामुळे गाभारी देव पुन्हा प्रतिष्ठित करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. शिव-विष्णूचे ऐक्यच श्रीविठ्ठल आहे. समर्थ भागवतधर्ममंदिराचे कळस झाले आणि रामाने सर्वांना वंदन केले हे म्हणणेही तुकाराम महाराजांप्रमाणे " स अवकाश भजन करावे नि प्रभु स्मरणात रमावे" या मूळ उक्तीच्या मानाने निरर्थक वाटते.

**''राघवरूप श्रीविठ्ठल''**

वस्तुत:

*राम अयोध्येचा वासी । तोचि नांदे द्वारकेसी ॥*
*आता भक्ताचियासाठी । उभा चंद्रभागे तटी ॥*
*राम तोचि विठ्ठल जाला । राम रामदासी भेटला ॥*

-असा अभेदाचा अनुभव समर्थांनी घेतलेला आहे. म्हणूनच राम हाच साकार विठ्ठल असू शकतो, हे त्यांना मान्य आहे. निराकाराची एकरूपता जाणून घेणे नि भक्तिभाव नित्य जागा ठेवणे हे महत्त्वाचे, असे त्यांचे प्रतिपादन आहे :

*राम कृपाकर विठ्ठल साकार । दोघे निराकार एकरूप ॥*
*आमुचिये घरीं वस्ती निरंतरी । हृदयीं एकाकारी राहियेले ॥*
*रामदास म्हणे धरा भक्तिभाव । कृपाळू राघव पांडुरंग ॥*

(श्रीरा. स. ग्रं. पृ. ५०४)

अशा राघवरूप श्रीविठ्ठलाच्या दिव्य दर्शनाचा सोहळाही ते वर्णन करताना रंगून जातात.

*सहज बरवा सहज बरवा ।*
*सहज बरवा विठोबा माझा ॥*
*सहज सांवळा दिगंबर ।*
*सहज कटी कर ठेऊनिया उभा ॥*
*रामी रामदास म्हणे ।*
*सहज अनुभव तोचि जाणे ॥*

(श्रीरा. स. ग्रं. पृ. ५०४)

**''दृष्टी विठ्ठलीं जडली''**

रामभक्त समर्थांची समन्वयशील दृष्टी श्रीविठ्ठलाला पाहता क्षणी तिथे स्थिर होऊन बसते, जडते आणि लांचावते. विठ्ठलमय होऊन जाते. दृष्टी, दृश्य आणि दर्शन ही त्रिपुटी मग राहात नाही. अवनी नि आकाशही हरवते. अस्त नि उदय संपतात. त्रैलोक्य हर्षमय होऊन निजबोध होतो. अशा सोनियाच्या दिवसाला रामदास उत्फुल्ल मनाने शब्दरूप देतात :

*भाग्यें पंढरी पाहिली । दृष्टी विठ्ठलीं जडली ॥*

*निपटचि लांचावली । विठ्ठल जालीसे आपण ॥*
*नवल देखावया साक्षात्कार । पहाट फुटली अनिवार ॥*
*कोंदाटला विठ्ठल वीर । अवनी अंबर हारपलें ॥*
*आणि निजबोध सोनियाचा झाला । अस्त उदय अस्ता गेला ॥*
*रामीरामदास विनटला । हर्षे भरला त्रैलोक्य ॥*

(समर्थांचा गाथा. पृ. ३४४)

पण त्याचवेळी पंढरीनाथाचे "कर कटीवरी ठेवुनी" उभे असणारे "तुळसीहार गळा कासे पितांबर" असे सुंदर ध्यान रामदासांना न जाणवता पंढरीराणाच प्रभु राम कसा होईल, याची चिंता लागते. आणि मग ते म्हणतात :

*येथे उभा कां श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा ।*
*चाप बाण काय केले । कर कटावरी ठेविले ॥*
*का बा धरीला अबोला । दिसे वेष पालटला ॥*
*काय जाली अयोध्यापुरी । येथे वसविली पंढरी ॥*
*शरयु गंगा काय केली । कैंची भीमा मेळविली ॥*
*किल्किलाट वानरांचे । थवे न दिसती तयांचे ॥*
*दिसे हनुमंत एकला । हा का सैन्यातुनि फुटला ॥*
*काय जाली सीता सती । येथे बहुत जन दिसती ॥*
*रामदासी सद्‌भाव जाला । राम जाला पंढरी राणा ॥*

(श्री.रा.सं.ग्रं. पृ. ५०४)

या अभंगाचा हवाला देऊन समर्थवाङ्मयाचे अभ्यासक श्री.पु.पां. गोखले यांनी लिहिले आहे : समर्थांनी आपल्या वारकरी संप्रदायाच्या प्रचारास पंढरपूर येथेच आरंभ केला. समर्थांनी स्वत: पंढरीची वारी बरीच वर्षे केली असेही ते म्हणतात. त्यांचे अनुमान विचार करण्यासारखे आहे :

"भारतात बद्धमूल झालेल्या यावनी सत्तेला महाराष्ट्रीयांनी यशस्वी आव्हान दिले. ती कामगिरी साधत असतांना पंढरीला दरसाल जमणाऱ्या भक्तांच्यात मिसळून जनतेमध्ये उठाव करण्यात कसे चुकतील? भागवत धर्माच्या आपल्या अगोदरपासून चालत असलेल्या पाणलोटात समर्थ पहिल्यापासून पोहले." [२]

### "विठ्ठल, ब्रह्मा विष्णु आणि हर"

'येथे उभा का श्रीरामा' या अभंगात उल्लेखिलेले जुने हनुमानमंदिर पंढरपूरच्या श्रीविठ्ठलमंदिरात आजही आहे. विठ्ठलासमोर हात जोडून उभ्या असलेल्या हनुमंताच्या दर्शनास समर्थ निश्चितच गेले असतील. त्यानंतर त्यांना श्रीविठ्ठलही रामरूपात भेटणे त्यांच्या अत्युत्कट रामनिष्ठेमुळे अस्वाभाविक वाटत नाही.

श्रीराम जसे श्यामल अंगी तसाच श्रीकृष्णरूप विठ्ठलही सावळ्या तनूचा. प्रभु रामचंद्राला

वानरांचे साहाय्य तर कृष्णविठ्ठलाभोवती गोपाळांचा मेळा. राम धनुर्धारी तर कृष्ण चक्रधारी. दोघेही युद्धकुशल. समाजसंघटक. म्हणूनच समर्थ "राम विठ्ठल एकरूप। पुन्हा विठ्ठल स्वरूप" असा आपला भक्तिमय अनुभव परोपरीने व्यक्त करतात:

*नाम विठ्ठल सुंदर। ब्रह्मा विष्णु आणि हर ॥*
*गुणातीत निर्विकार। शुकादिकी गायिला ॥*
*चंद्रभागा रम्य तीर। तेथे उभा कटीकर ॥*
*दिंड्या पताका अपार। यात्राघोष जाहला ॥*
*येथे येता रामदास। दृढ रामीं विश्वास ॥*
*रूप पालटोनी त्यास। रामरूपीं भेटला ॥*
*पुन्हा विठ्ठल स्वरूप। रामविठ्ठल एकरूप ॥*
*पूर्वपुण्य अमूप। लक्ष पायीं ठेविला ॥*

(रामदासी संशोधन : खण्ड दुसरा पृ. ३८८)

"रामरूपीं नित्य रंगलेल्या" रामदासांना अशा प्रकारे "रूप पालटोन" श्रीविठ्ठल भेटला आणि त्याने "रामविठ्ठल एकरूप" असल्याची प्रचीती "पूर्वपुण्याईमुळे" त्यांना आणून दिली. हे सारे रामदासांनी प्रांजळपणे निवेदन केले ही अतिशय लक्षणीय बाब म्हणता येईल.

समर्थांच्या विठ्ठल रूप रामवर्णनातील काही उद्गार विलक्षण उत्कट वाटतात. "आपण व्यक्तिगत सुखासाठी काही मागत नाही. केवळ कृपाशीर्वाद हवा तो जनकल्याणासाठी!" असे समर्थ म्हणतात:

*काही बोल रे विठ्ठला। मौन वेष कां धरिला ॥*
*काय मागतो गांठोडी। बोलसीना धरिली गुडी ॥*
*आशा वैभवाची नाही। भिऊ नको वद काही ॥*
*न लगे मज धन दारा। वेगे लोचन उघडा ॥*
*दास म्हणे वर पाहे। कृपा करून भेटावे ॥*

(श्री.रा.स.ग्रं. पृ. ५०४)

### "पुंडलिकाचे दैवत त्रिलोकीचे"

समर्थांची ही चित्रमय विठ्ठलवर्णने प्रत्यक्ष पंढरीरायाच्या दर्शनातूनच साकारलेली आहेत. खालील पदातील भावोत्कट वर्णन हे कोणत्याही वारकरी संताने करावे असेच प्रत्ययकारी उतरले आहे:

*लांचावोनि भक्तिलोभा। असे वाळंवटी उभा ॥*
*पदकी इंद्रनील शोभा। प्रभे शोभा उजळती ॥*
*भक्त पुंडलिकें गाविला। जाऊं नेदी भांबाविला ॥*
*विटे नीट असे ठाकिला। भीमातीर वाळुवंटीं ॥*
*भाग्य पुंडलिकाचें। उभें दैवत त्रिलोकींचें ॥*

*कीं जे तारूं भवसागरीं । भीमातीरीं विनटलें ॥*
*एकें पुंडलिके करूनी जोडी । आम्हांसी दिधली कल्पकोडी ॥*
*तुटली संसार सांकडी । रामदास म्हणतसे ॥*

*(श्री.रा.स.ग्रं.पृ. ५८०)*

भक्त पुंडलिकाच्या पुरीचे नि त्याच्या परमप्रिय आराध्याचे हे विनम्र यशवर्णन उत्कट भक्तिभावाचे तर आहेच, पण त्याचबरोबर ते समर्थांनी उदार भागवतधर्मीय वारसाही कसा डावलला नाही हे स्पष्ट करणारे आहे.

राम, कृष्ण आदि देवावतारातील अभेदानुभव, रामरंगी रंगलेले रामदास देखिल सहजपणे व्यक्त करतात. हे आज आपापल्या संप्रदायाचा नि आराध्याचा अभिनिवेश वेळीअवेळी व्यक्त करतांना आपण ध्यानी ठेवायला हवे.

आता नामदेवांच्या रामभक्तीचा विचार करू.

*संत देहाने भिन्न असती ।*
*परि ध्येय धोरणाने अभिन्न स्थिति ।*
*साधने जरी नाना दिसती ।*
*तरी सिद्धान्तमति सारखी ॥*

*(ग्रामगीता / २४.३६)*

- अशी राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांची अर्थपूर्ण उक्ती आहे. समर्थ रामदासही म्हणाले होते: "साधु दिसती वेगळाले। परि ते स्वरूपीं मिळाले!" आपल्या मराठी संत-परंपरेत ही समन्वयशीलता ठाई ठाई दिसून येते. सतराव्या शतकातील श्रेष्ठ रामकवी समर्थ रामदास पंढरीच्या श्रीविठ्ठलाची अथवा मोरगावच्या मयूरेश्वर गजाननाची आराधना उत्कटतेने करताना आढळतात. तर तेराव्या शतकातील श्रेष्ठ विठ्ठलभक्त संत नामदेव तशाच भक्तिभावनेने मर्यादापुरुषोत्तमाची अर्चना करताना दिसून येतात. अशी आपली ऐतिहासिक परंपरा पाहिली, अभ्यासली की आजचे सांप्रदायिक अभिनिवेश फारच करंटेपणाचे आहेत, हे जाणवू लागते.

**संतांची जनहितकारी दृष्टी**

अलिकडच्या काळातील मध्ययुगात असत्य, अन्याय आणि आक्रमकता यांचा प्रतिकार करण्याची भावना जनात जागी करून, स्वत्व आणि स्वधर्म यांचे संरक्षण करण्यासाठी, कोदण्डधारी मर्यादापुरुषोत्तम प्रभू रामचंद्राचा भव्योदात्त आदर्श प्रभावी पद्धतीने प्रथम गोस्वामी तुलसीदासांनी उत्तरभारतात निर्माण केला असे दिसून येते. महाराष्ट्र महोदयाचे अग्रदूत असणारे महात्मा एकनाथ आणि गोस्वामी तुलसीदास हे समकालीन. प्रतिष्ठान-पैठणच्या ब्रह्मवृंदाने भागवती टीकेबद्दल जेव्हा नाथांविरुद्ध काहूर माजविले तेव्हा त्यांना वाराणसीच्या पंडितांच्या समोर परीक्षेसाठी स्वत:स सादर करावे लागले. नाथ वाराणसीत तीन वर्ष होते. त्याच काळी तुलसीदासही तेथे होते आणि त्यांच्या रामचरितमानसाची किर्ती सर्वत्र झालेली होती.

उत्तरेतून पुन्हा महाराष्ट्रात एकनाथ परतले ते प्रभू रामचंद्राच्या आदर्श चरित्राचा मंत्र घेऊन!

त्यांनी आपल्या विराट भावार्थ रामायणाद्वारे मराठी मुलखात प्रेरक रामोपासना मांडली. पुढे समर्थ रामदासांनी नाथांच्या रामकार्याला प्रत्यक्ष संघटनासामर्थ्याची उत्तम जोड प्राप्त करून दिली आणि सह्याद्रीच्या कडेकपारीतून आरोळी दिली: "समर्थांचिया सेवका वक्र पाहे, असा सर्व भूमंडळी कोण आहे?" यातून रामोपासनेचा राष्ट्रवादी संप्रदायच उभा ठाकला. त्यायोगे जनहिताची आणि मराठा तितुका मेळवून महाराष्ट्रधर्म जागविण्याची एक पद्धतशीर चळवळ सुरू झाली. परंतु ही लोकहितकारी दृष्टी ज्ञानदेव-नामदेवांच्या काळापासूनच महाराष्ट्रात दिसून येते.

**धर्मरक्षण : वाईटाचा प्रतिकार**

यादवयुगात आणि पुढे मध्यकाळातही समाजकारण, राजकारण आणि साहित्यकारणही धर्माधिष्ठित होते. त्यामुळे ज्ञानदेव-नामदेवांनीही समाजाचा, राजकीय आव्हानांचा जो विचार केला, तो धर्माच्या चौकटीत राहून गेला.

सामान्य माणसांची भाषा त्यांनी आपली म्हटली. समकालीन सन्मान्य वा प्रतिष्ठितांची कोणतीही मिरासदारी ज्ञानाच्या वा भक्तीच्या क्षेत्रात त्यांनी मान्य केली नाही. सद्धर्माची कास धरून वारकरी संतांनी सर्वसामान्यांवर कुणीच अत्याचार करू नयेत, जात-जमात-उच्चनीच अशा कोणत्याच स्वार्थसाधू कारणाने माणसामाणसात अंतर राहू नये, याचा विनम्र आग्रह धरला.

ज्ञानदेवांनी उत्तरेतील दास्य पाहिले होते. त्यांनी ज्ञानेश्वरीच्या रूपाने दक्षिणेत धर्मसंकीर्तन केले. त्यांची "एकेक ओवी प्रत्यक्ष अनुभवीत" नामदेवांनी उत्तरेत भरारी मारून "ज्ञानदीप जगीं तेवत ठेवून" आक्रमणाचा प्रतिकार करण्याचा शाश्वत मार्ग शोधला. एकनाथांच्या काळात परिस्थितीची आव्हाने बदलली, तेव्हा त्यांनी समन्वयावर भर देत अत्याचारांचा प्रतिकार केला. रामदासांच्या काळी सामान्यांचे राज्यच निर्माण झाले, तेव्हा त्यांनी आव्हानात्मक भाषेत "बुडाला औरंग्या पापी" म्हणून प्रखरपणे वैचारिक प्रतिकार केला. गावोगावी आपले महंत पाठवून त्यांनी ज्ञानसाधना, चारित्र्य, बलोपासना आणि स्वाभिमान यांचा जनांना उपदेश केला. शिवराज्य हे रामराज्य व्हावे यासाठी त्यामागे त्याग-बलिदानाची प्रेरणा निर्माण करण्याचा प्रयत्न मांडला.

मराठी संतकाव्यात ज्ञानेदवांपासून रामदासांपर्यंत अशा प्रकारचे एक अंत:सूत्र आहे. ते परस्पर अनुबंधाचे आहे. एकमेकाला पूरक वर्तनाचे आहे. प्रत्यक्ष कार्याचे आहे. उक्ती-कृतीतील ऐक्याचे आहे.

**रामभक्त नामदेव**

एकीकडे भगवान श्रीकृष्णाची श्रीविठ्ठलाच्या रूपात वारकरी भक्त-भागवतांनी सगुणोपासना केली, पण "रामकृष्ण हरी" हा आपला मूलमंत्र मानला. हा मंत्रच मुळी सर्वधर्मसांप्रदायिक समभावाचा आहे. श्रीराम, श्रीकृष्ण आणि महादेव शिव, यांचे ऐक्य सांगणारा आहे.

संत नामदेव हे श्रेष्ठ कीर्तनकार अभंग-गायक. त्यांनी प्रसंगपरत्वे रामचरित्राचे गायन आपल्या स्फुट मराठी-हिंदी अभंगपदांतून केले आहे. त्यांच्या रामकथेत रामजन्म, रामचरित्र, सीताशुद्धी यांचे स्फुट आख्यान येते. कवित्व आणि भक्तितत्त्व, कथानिवेदन आणि तत्त्वबोध यांचा कीर्तनोपयोगी संगम त्यांच्या या रचनेतून दिसून येतो.

श्रीरामाच्या जीवनचरित्रातील काही निवडक ठळक प्रसंगाची नोंद करून व्यक्तिवर्णन करीत अखेरीस ''रामनाम'' हे कसे श्रेष्ठ आहे, अशा भगवद्भक्ताच्या भूमिकेत ते येतात. दाशरथी रामापेक्षा अवतारी रामाची उपासनाच त्यांना प्रिय आहे. त्यातही श्रीरामाची ''नामभक्ती'' त्यांनी श्रेष्ठ मानली आहे.

वारकरी सांप्रदायिकांची प्रतिवर्षी श्रीरामनवमी उत्सव साजरा करण्याची प्रथा आहे. या उत्सवाला जोडून जे कीर्तन केले जाते त्यासाठी संत नामदेवकृत रामविषयक अभंगच घेण्याची सांप्रदायिक पद्धती आहे.

नामदेवांच्या हिंदी पदावलीत आणि शिखांच्या गुरुग्रंथसाहेबातील त्यांच्या ''मुखबानी'' त रामनाम जपाचा नित्य उल्लेख येतो. ''अखण्ड मुखीं रामनाम। धन्य तयाचाचि जन्म'' किंवा ''म्हणा श्रीराम जय जय राम। भवसिंधु तारक नाम'' असा उद्घोष त्यांच्या मराठी अभंग-वाणीतही मिळतो. ''पवित्र श्रीरामाचे चरित्र। उद्धरिसी गोत्र पूर्वजेंसी'' अशी त्यांची सुस्पष्ट भूमिका दिसून येते.

**राम-विठ्ठलमय जगाचा अनुभव**

''तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल। देव विठ्ठल देवपूजा विठ्ठल'' हा सदा सर्वत्र निरंतर विठ्ठल अनुभवणारा नामदेवांचा अभंग प्रसिद्ध आहे. सर्वांठायीं भरून राहिला विश्वंभर विठ्ठल भेटल्यामुळेच ''कळिकाळा पाड नाही'', अर्थात कळिकाळाचे भय त्यांना उरलेले नाही. नामदेव असेच ''सीताराममय जग''ही अनुभवतात. म्हणतात :

*राम पिता सीता माता। लक्ष्मण सोयरा चुलता॥*
*तयासी भेटो जाऊ आता। चित्रकुटीच्या पर्वता॥*
*नामा म्हणे माझे गोत। चित्रकुटीं असे नांदत॥*

एका दुसऱ्या अभंगात ते ''चित्रकुटीं जाऊ। राम दशरथा पाहू॥ अयोध्ये केला अवतारू। राम नामयाचा दातारू॥'' असा रामरायाचा गौरवही गातात. कधी बिभीषणापेक्षाही आपण ''राममय'' होऊन गेल्याचा ते दाखला देतात :

*म्हणती बिभीषण शाहणा। परी तो महामूर्ख जाणा॥*
*काय तो रामासी भेटला। अवघा रामचि नाहीं झाला॥*
*नामया स्वामीते जाणोन। अवघा रामचि होईन॥*

''नाम तेचि रूप रूप तेचि नाम'' हा नामदेवांचा भक्तिसिद्धान्तच होता. नामस्मरण हे परमेश्वराचे रूप आणि रूप हेच ध्यान अर्थात देवाचे नामरूप कसे अभिन्न आहे, हे समजावून देताना ''श्रीराम सोयरा'' आपल्या ''घरा आला'', त्याने चित्तीं थारा दिला, त्यामुळे मन

आनंदात न्हाऊन निघाले, म्हणून ध्यानधारणेची वेगळी आवश्यकताच उरली नाही, असा ते निर्वाळा देतात :

*श्रीराम सोयरा आला माझ्या घरा ।*
*दिधला म्या थारा हृदयीं माझ्या ॥*
*पावलो विश्रांती धाले माझे मन ।*
*नलगे आतां ध्यान शिकावया ॥*
*नाम तेचि रूप रूप तेचि ध्यान ।*
*नाम रूपा भिन्न नाहीं ध्यान ॥*
*नामा म्हणे ज्ञान केशव केवळ ।*
*जाणती प्रेमळ भले भले ॥*

असे अभंग आपण पाहिले की जाणवते, संत नामदेव हे श्रीविठ्ठलाबरोबरच श्रीरामप्रभूंचेही उत्कट भक्त होते, किंबहुना श्रीविठ्ठल आणि श्रीराम त्यांना एकरूपच दिसत होते.

**''सब घटि राम समाना रे ।''**

संत नामदेवांच्या हिंदी पदावलीतील निम्म्याहून अधिक पदात रामनामाची महती मिळते. कधी ते ''रामनाम खेती रामनाम बारी'' - अर्थात शेतीभाती सारीराममय होऊन गेल्याचे सांगतात, तर कधी आपल्याच मनाला प्रश्न विचारतात : ज्याच्यापाशी रामनामाची धनदौलत आहे, त्याला कशाचे बरे भय राहील ?

*''रामसो धन ताको कहा अब थोरो।''*

कधी अवतीभवतीचं सारं विश्वच कसं रामस्पर्शित आहे, त्याचा घेतलेला प्रत्यय ते पदात साकार करतात :

*राम बोले राम बोले, राम बिना को बोले रे भाई ?*
*ऐकल माटी कुंजर चींटी भाजन है बहु नाना रे ।*
*थावर जंगम कीट पतंगा सब घटि राम समाना रे ॥*

- जळी स्थळी काष्ठी पाषाणी सर्वत्र प्रभू श्रीराम आहे. तो चराचर वस्तूंना व्यापून राहिलेला आहे, म्हणूनच तर सारे जग चाललेले आहे. विश्वातील मूळ वस्तू ''राममय'' आहे. हत्ती काय नि मुंगी काय सर्व प्राणिमात्रामध्ये तो आहेच आहे.

कधी नामदेवराय जातीपातीचा विचार सोडावा हा उपदेश देतांना रामनाममाहात्म्य वर्णन करतात :

*का करौ जाती का करौ पाती ।*
*राजाराम सेऊं दिन राती ॥*
*मन मेरी गज, जिभ्या मेरी काती ।*
*राम रमे काटौ जमकी फासी ॥*

''मैं बउरी मेरो राम भ्रतारु''

नामदेवांची मूळ प्रकृती मातृभाव भक्तीची आहे. पण प्रभू रामचंद्राच्या आणि भगवान श्रीकृष्णाच्या लीलाभूमीत वावरताना त्यांना तेथे मधुराभक्ती जनप्रिय असल्याचे जाणवले असावे. त्यामुळे भावभक्तीचा धागा कायम ठेवून ते अशी रमणीय रामकविताही सहजपणे लिहून जातात :

*मैं बउरी मेरो राम भ्रतारु।*
*रचि रचि ताकउ करउ सिंगारु ॥*
*भले निंदउ भले निंदउ भले निंदउ लोगु।*
*तनु मनु रामु पिआरे जोगु ॥*

अर्थात् रामनामाचे रसायन हीच खरी साधना होय. भक्तीच्या क्षेत्रात वादविवाद, खण्डनमण्डन यांना स्थान नाही. तनामनाने ईश्वराशी तदाकार होऊन राहायचे म्हणजे भक्ती होय. जगराहाटीकडे लक्ष न देता राममय जीवन जगायचे, याचे दुसरे नाव भक्ती!

संत नामदेव अशा भक्तिमय अंत:करणाने पंढरीहून निघाले. गावोगाव जात, तिथल्या जनमनाशी संवाद साधीत पंचनद्यांच्या प्रदेशापर्यंत आले. भाषा, प्रांत, संप्रदाय इत्यादी साऱ्या गोष्टींच्या पलिकडे ते पोहोचले. त्यांनी जनात ''रामत्व'' जागे केले. स्वत्वाचा उत्साह निर्माण केला, आणि सत्वशीलतेची महतीही पटवून दिली. म्हणूनच आज सात शतके लोटून गेली तरी महाराष्ट्राबाहेरचे अनेक ज्ञातिपंथाचे लोक त्यांना आदरपूर्वक आठवतात. त्यांचे विनम्रपणे स्मरण करतात.

~

१. न्या.रा.के. रानडे : ''राम विठ्ठल एकरूप'', सज्जनगड, मार्च १९८५
२. श्री.पु.पां. गोखले : ''समर्थांनी चालविलेला वारकरी वारसा'', सज्जनगड, ऑक्टो. १९८४ पृ. २१

~ ~

# संत नामदेव आणि समर्थ रामदास यांचा मनोबोध ४

**संत सत्पुरुष जसा चांगल्याचा सातत्याने पुरस्कार करतात तसाच ते एकमेकांच्या चांगल्याचा नेहमीच मुक्त मनाने स्वीकारही करतात. तुलनात्मक अभ्यासातून आपल्या हे ध्यानी येते. म्हणून सांप्रदायिक अभिनिवेश थोडे बाजूला सारून आपण या परस्पर प्रभावांचा शोध घ्यायला हवा. आणि समर्थांच्या उक्तीचाच आधार घेऊन बोलायचे झाले तर ''स्वरुपीं मिळालेल्या साधुसंतांचे जे अनुकरण करतात, जे जे ज्यांच्याकडून घेण्यासारखे ते घेत आपले नि पर्यायाने समाजाचे भले करण्याचा प्रयत्न करतात, ते संप्रदाय आणि अनुयायीच मोठे होतात. इतिहासावर चांगला ठसा ठेवतात.**

**संत नामदेव आणि समर्थ रामदास या दोन भिन्न काळातील, भिन्न प्रकृतीच्या सत्पुरुषांच्या मनोबोधाचा तुलनात्मक विचार करतांना हे सारे मनात सहज येऊन जाते.**

---

## नामदेव आणि समर्थ

महाराष्ट्रातील वारकरी भक्तिपंथाचे आद्य संवर्धक आणि विस्तारक संत नामदेव यांचे अभंग काव्य बहुकक्ष आहे. मराठीच्या आदिकाळातच त्यांनी अनेकविध वाङ्मयविधांचा आरंभ केलेला आहे. ज्ञानदेवादी भावंडांची चरित्रे आणि समकालीन सावता, विसोबा, गोरोबा, चोखोबा, जनाबाई इत्यादी अन्य संतांची शब्दचित्रे त्यांनी सादर केली. अतिशय महत्त्वाचे असे ऐतिहासिक लेखन केले. आपले स्वत:चे लौकिक जीवनाचे अनुभवही कथन केले. पारलौकिक साधना प्रवासातील दिव्य अनुभूतीही सांगितल्या. हे त्यांचे अभंग मराठीतील आद्य अलौकिक आत्मचरित्रच सिद्ध करणारे आहेत. नामदेवांची कूट कविताही मिळते. वासुदेव, पांगूळ इत्यादी लोकसंस्कृतीच्या उपासकांची भूमिका घेऊन नामदेवांनी लोककाव्यही रचले आणि भीष्मप्रतिज्ञा, दशावतार, प्रल्हादकथा आदी पौराणिक आख्याने घेऊन त्यांनी पंडिती वळणाची कीर्तनोपयोगी कविताही तयार केली. आरत्या, भूपाळ्याही भक्तिभावाने लिहिल्या. तीर्थावळी ही एकप्रकारे त्यांची प्रवासवर्णनपर रचना मानता येईल.

नामदेवांचे भक्तिसाहित्य असे बहुढंगी आहे. समर्थ रामदासांनीही पेशवाईच्या पूर्वकाळात अशीच बहढंगी पद्यरचना केली. त्यांचा व्यासंग दांडगा होता. अध्ययन वाचनाचे महत्त्व

त्यांच्याइतके अन्य कुण्या सत्पुरुषाने वर्णिलेले नसेल. समर्थांनी निश्चितच नामदेवांची अभंगवाणी वाचली ऐकली असेल. हे दोन्ही संत महाराष्ट्र धर्माचे प्रणेते होते. प्रसारक होते. समर्थांच्या लेखनात "दासबोध" आणि "मनोबोध" विशेष महत्त्वाचा मानला जातो. "मनोबोध" ही एकप्रकारे दासबोधाचे सारकथन करणारीही रचना आहे.

मनोबोधाचे अभंग नामदेवरायांनीही रचलेले दिसतात. त्यांच्या नि समर्थांच्या मनोबोधपर रचनेची तुलना करण्यासारखी आहे.

**नामदेव : आद्य मनोबोधकार**

संत नामदेव हे प्रापंचिक संत होते पण श्रीविठ्ठलाच्या भक्तीच्या प्रपंचात त्यांचे मन अधिक रंगून राहिलेले होते. समर्थ रामदास तर "शुभमंगल आणि सावधान" हे दोन शब्द ऐकूनच हा मार्ग आपला नव्हे, म्हणून भक्तिपंथाकडे वळले. कदाचित वैयक्तिक शुभमंगलापेक्षा जीवन व्यवहारात अखण्ड सावधानता बाळगावी म्हणून विश्वचिंतेत ते बुडून गेले. प्रपंच कसा नेटका करावा याची शिकवण सांगण्यास मात्र ते विसरले नाहीत. यासाठी त्यांनी मनाला उपदेश केला. त्यांचे मनाचे श्लोक अथवा मनोबोध प्रसिद्ध आहे. नामदेवांनीही हे मनोबोधाचे महत्त्व अचूकपणे ओळखलेले होते. कदाचित मनोबोधाची कल्पनाच मूळ नामदेवांची असावी.

नामदेव हे मराठीतील आद्य अभंगगायक, कीर्तनकार, आद्य चरित्रकार, आत्मचरित्रकार, आद्य आख्यानकवी ठरतात. त्याचप्रमाणे ते आद्य मनोबोधकार देखिल म्हणायला हवेत.

हरिभक्तीचा मार्ग विशद करण्यासाठी संत नामदेव आणि समर्थ रामदास दोहोंनी मनाला उद्देशून अभंग-ओव्या लिहिल्या आहेत. सांप्रदायिक नामदेवगाथेत "मनास उपदेश" अशा शीर्षकानेच सुमारे पंचेचाळीस अभंग आलेले आहेत.

**समर्थांचा मनोबोध**

समर्थांनी रचलेले मनाचे श्लोक अथवा मनोबोधाचे छंद दोनशे पाच आहेत. ही रचना बहुधा समर्थांनी सिद्धावस्थेत केलेली आहे. तपाचरणाचे तेज अंगी बाणल्यानंतर आणि देशाटनामुळे उदण्ड अनुभवांची शिदोरी जवळ साठल्यानंतर त्यांनी हे मनोपनिषद तयार केले असावे. त्याची रचना एखाद्या प्रबंधासारखीच आहे.

एकप्रकारे समर्थांचा मनोबोध हा त्यांच्या दासबोध ग्रंथाचा सारसंक्षेप आहे. मुळात जो तत्वविषय समर्थांनी विस्ताराने सांगितला तोच त्यांनी सारांश म्हणून मनाच्या श्लोकात चपखल शब्दात आणला आहे.

**नामदेवांची कळवळ**

समर्थांच्या तुलनेत नामदेवांचा मनोपदेश हा प्रकट चिंतनासारखा आहे. त्यात समाजहिताची विलक्षण कळकळ दिसून येते. त्यांच्यातील साक्षात्कारी सत्पुरुष प्रापंचिकाला समजावून सांगतो :

*अरे अलगटा माझिया तूं मना ।*

*किती रानोराना हिंडवीसी ।।*
*रे विठोबाचे पायीं दृढ घाल मिठी ।*
*कां होसी हिंपुटी वायांविण ।।*
*क्रिया कर्म धर्म तुज काय चाड ।*
*जवळी असतां गोड प्रेमसुख ।।*
*संकल्प विकल्प सांडी तूं समूळ ।*
*राहे रे निश्चळ क्षणभरी ।।*

(२००४ / ७६०)

मनाने क्षणभर का होईना निश्चळ राहावे, अचल राहावे म्हणून नामदेव विनवीत आहेत. चंचल मन माणसाला नाना प्रकारे भटकंती करावयास भाग पाडते. निराश करते. अभावाबद्दल रुखरुख करते. देवाठाई भाव स्थिर करू देत नाही. केवळ त्या मनावर नियंत्रण मिळविणे साध्य झाले तरच परमानुभवाचे प्रेमसुख लाभू शकेल. कोणत्याही स्वरुपाचे व्यावहारिक चिंताक्लेश उरणार नाहीत.

**समर्थांची भूमिका अध्यापकीय**

समर्थांच्या लेखनामध्ये प्रपंचाचे शास्त्र विशद करण्याची ठाम भूमिका आहे. एखाद्या अध्यापकाने आपला मुद्दा सोदाहरण स्पष्ट करावा तसे ते करतात. आपले म्हणणे श्रोत्यावर ठसावे असे संगतवार मांडतात. एकाच कल्पनेसाठी वेगवेगळे शब्द योजीत जातात. जाणीवपूर्वक आवृत्ती करून आपले म्हणणे वक्तृत्वशैलीने प्रभावी करतात. उदाहरणार्थ :

जे लोचनांनी दिसते ते कल्पनेच्या विश्वातही असत नाही. जर तसे आकाराला आले तर मोडायला वेळ लागत नाही. कल्पनेचे सोडा, वास्तवातही असेच आहे. याठिकाणी "मना संत आनंत शोधूनि पाहे।" असे म्हणून समर्थ जागवितात : ते अनंताचे रुप आचळ, अढळ अविनाशी म्हणून "फुटेना, तुटेना, चळेना, ढळेना." पण "मीपणामुळे ते कळेना." पुढे समर्थांनी मनाला जागविले आहे : "तया एकरुपासि दूजें न साहे। मना संत आनंत शोधूनि पाहे ।" इतके अनंताचे रुप स्पष्ट केल्यानंतर एक सुबोध आणि अर्थगर्भ श्लोक पुन्हा येतो, एखाद्या ध्रुपदासारखा :

*निराकार आधार ब्रह्मादिकांचा ।*
*जया सांगता सीणली वेदवाचा ।*
*विवेकें तदाकार होऊनि राहें ।*
*मना संत आनंत शोधूनि पाहें ।।*

यापुढेही दोन श्लोक हाच आशय अधिक रमणीय रीतीने ठसविण्यासाठी - "जगीं पाहतां पाहणे जात आहे। मना संत आनंत शोधूनि पाहे ।।" - अशी सुंदर शब्दकळा घेऊन येतात.

समर्थांच्या मनोबोधातील अशी "श्लोकपंचके" एकेक विषय तर्कशुद्ध रीतीने मांडणारी म्हणून वेधक वाटतात.

नामदेव भक्त-कार्यकर्ते

नामदेवांची मांडणी अशी ठाशीव, तर्कपूर्ण नाही. पण उत्कट खचितच आहे. सदैव बहुजनांच्या सुखदु:खात सहभागी होऊन प्रत्यक्ष सामाजिक कार्याचा वसा घेतलेल्या विठ्ठलभक्त नामदेवांना वासनिक वा कांचनिक भक्ती करणाऱ्या मंडळींच्या मनाचे खेळ चांगलेच ठाऊक होते. केवळ अनिष्ट इच्छाआकांक्षा आणि विषयलालसा यामुळे अशा लोकांचे मनरंग सतत बदलत राहतात, याबद्दल नामदेव सांगतात: निर्गुणनिराकार आनंदमग्न परब्रह्माला सुद्धा वासनेमुळे चौऱ्याऐंशी लाख सोंगे वठवावी वाटली.

*वासनेची करणी ऐके तूं रे मना।*
*या केली रचना ब्रह्मण्डांची ॥*
*निर्गुण चैतन्य सदा सुखरासी।*
*त्यां दिलीं चौऱ्यांऐंशी लक्ष सोंगें ॥*

यानंतर मानवी मनाचे लाघवी चाळे करण्याची दुर्बळांची सवय कशी, त्याचे नामदेव सविस्तर वर्णन करतात:

*क्षण एक चंचळ क्षण एक निश्चळ।*
*क्षण एक विफळ सावध करी ॥*
*क्षण एक कृपाळ क्षण एक निष्ठुर।*
*क्षण एक उदार कृपण करी ॥*

(२०१० / ७६३)

क्षणात स्थिरचित्त तर क्षणात चंचल, क्षणभर अपयशामुळे कष्टी तर क्षणभरात पुढल्या प्रवासासाठी तयार, क्षणात कृपावंत तर दुसऱ्या क्षणी निर्दय कृपण, कधी सत्वशील तर कधी राजसी-तामसी, केव्हा प्रवृत्तींच्या मार्गाने तर केव्हा निवृत्तीच्या दिशेने, कधी शांतनिवांत तर कधी क्रुद्धसंतप्त, क्षणाला एखादी गोष्ट भावणारी तर पुढच्या क्षणाला नावडणारी, आता दु:खी तर पुढे लगेच सुखी - अशी हरघडीला अदलबदल करणारी मानवी मन:स्थिती असते. वासनेचे सारे खेळ तिच्या आवडीचे. यावर मात करायची ती मनोयोगानेच करणे शक्य होते. नामदेव म्हणतात:

*ऐसी हे लाघवी पाहतां क्षणभंगुर। ब्रह्मादि हरिहर ठकले जेणें॥*
*नामा म्हणे तरीच इचा संग तुटे। दैवयोगें भेटे संतसंग ॥*

दैवयोगाने संत सहवास घडावा तरच मनावर ताबा शक्य व्हावा. ब्रह्मादिकांना सुद्धा मन-नियंत्रण अवघड झाले तर मग माणसाच्या क्षणभंगुर मनाची काय कथा?



# महात्मा कबीरदास आणि समर्थ रामदास ५

---

**गोरक्ष-नामदेव-एकनाथ-रामदास असा तर पारंपारिक धागा आहेच. पण भारतीय पातळीवर नामदेव-रामानंद-कबीर-गुरुनानक-रामदास अशीही एक संगती लावता येईल. क्षणभर हे बाजूला ठेवले तर कबीर-तुकारामांप्रमाणेच कबीर रामदास असाही तुलनात्मक विचार करता येईल. या दोहोत प्रत्यक्ष भाषिक रचनेचे साम्य कमी असले तरी विचारांचे साधर्म्य मोठे आहे.**

---

## उपोद्‌घात

मराठी संतपरंपरेचे फार मोठे वैशिष्ट्य तिच्या द्वैभाषिकतेमध्ये दिसून येते. महानुभाव आचार्य दामोदर पण्डित आणि वारकरी भक्तश्रेष्ठ नामदेव यांचेपासून सातत्याने मराठी रचनाकारांनी मायमराठीबरोबर भारतवाणी हिंदीसही आपल्या विचारांच्या अभिव्यक्तीचे माध्यम मानले आहे.

नामदेवांचा गुरुपरंपरेने गोरक्षनाथांशी अनुबंध असल्यामुळे त्यांच्या हिंदी वाणीवर गोरक्षवाणीचा प्रभाव दिसून येतो. दामोदर पंडितांची चौपदी हिंदी रचना तर उघड उघड नाथमत खंडनासाठीच करण्यात आलेली आहे.

नामदेवांनंतर बहुतेक सर्व वारकरी संत भक्तांनी एकमेकाकडून प्रभाव स्वीकारला. जनता जनार्दनाशी जवळीक करीत, प्रसंगी यात्रावृत्ती स्वीकारून आपले भक्तिनीतिविषयक चिंतन मराठी बरोबरच राष्ट्रभाषेच्या माध्यमातून प्रकट केले.

समर्थ रामदास प्रत्यक्ष या परंपरेत नसले तरी त्यांच्यावर हा लोकभाषा प्रीतीचा दृढ प्रभाव आहेच. एक तर ते भारतयात्री होते. त्यांना राष्ट्र जागरणाचा ध्यासही होता. त्यामुळे त्यांनी स्वतः समर्थपणे राष्ट्रबोलीतून आपले विचार व्यक्त केले. समर्थांची हिंदी कविता अतिशय लक्षणीय आहे. [१]

## मराठी-हिंदी संत परंपरा

महाराष्ट्र धर्माचे पंचप्राण असणाऱ्या पाच महासंतांच्या नावात एक खास वैशिष्ट्य आहे. ज्ञानदेव हे ज्ञानाचे देव आहेत. भागवत धर्म मंदिराला ज्ञानदेवीचे भक्कम अधिष्ठान देणारे,

त्याची पायाभरणी करणारे संतराज आहेत.

नामदेव हे नामाचे देव आहेत. मुक्ती पेक्षा भक्ती हवी म्हणणारे नि नामभक्तीला पाचवा वेद मानणाऱ्या भक्तिपंथाचे समर्थ प्रसारक, वैष्णवांचे कुलपुरुष आहेत.

एकनाथ हे शिवपूर्वकालातील महाराष्ट्र महोदयाचे अग्रदूत. विद्वत्ता नि व्यवहार यांची सांगड घालणारे समन्वयशील समाजपुरुष.

तुकाराम महाराज भागवतांच्या भक्तिमंदिराचे शिरोमणी ठरले. ज्ञान, कर्म नि भक्ती यांचा मेळ घालणाऱ्या वारकरी परंपरेला तळागाळातील जनसामान्यापर्यंत नेऊन सर्वांमध्ये आत्मविश्वास उत्पन्न करणारे महासंत झाले.

दोघांच्या नावात देव. एकात नाथ. दोघांत राम आणि समर्थ रामदास सामर्थ्याचे पुरस्कर्ते तरी त्यांचे नाव मात्र ''दास'' पदान्त.

मराठी भक्तिसाहित्याच्या इतिहासात असे ''दास'' पदान्त नाव अन्य श्रेष्ठ संताचे नाही. उत्तर भारतीय भक्तिपरंपरेमध्ये मात्र बहुतेक सर्व थोर संत, तुलसीदास, सूरदास, रविदास, कबीरदास असे ''दास'' आहेत. पण कबीर दास्य भक्ती करणारे नव्हेत. कबीरदास तर निर्गुणनिराकाराचे उपासक आणि ''राम'' नामाचेही महत्त्व सर्वोपरी मानणारे!

**कबीरदास आणि रामदास**

मर्यादापुरुषोत्तम प्रभु रामचंद्राची उपासना करून आत्मबळ मिळविणारे समर्थ स्वामी रामदास आणि दाशरथि रामाच्या कथेपेक्षा त्याच्या प्रेरक नामोच्चारालाच साधनेच्या क्षेत्रात महत्त्व देणारे समाजमनस्क महात्मा कबीरदास यांचा काळ भिन्न. कबीर इसवीसन १३९८ ते १५१८ असे एकशेवीस वर्षांचे सुदीर्घ जीवन जगणारे तर समर्थ तुकोबारायांच्याबरोबर १६०८ मध्ये जन्मलेले आणि छत्रपती शिवरायानंतर वर्षभरात १६८१ साली निवर्तलेले. दोघांच्या वेळची सामाजिक, राजकीय अन् धार्मिक स्थिती यांतही पुष्कळ तफावत. कबीर काळात उत्तर भारतावर मुस्लिम आक्रमकांचे सर्वत्र अधिराज्य तर समर्थांचे जीवन शिवस्वराज्यात बहुतेक व्यतीत झालेले.

एक व्युत्पन्न पंडित. बलोपासक. आनंदवनभुवनाच्या अथवा स्वधर्मराज्याच्या परमसंतोषाचे धनी, मठ-स्थापना करीत महंतव्रताचा नि चळवळीच्या सामर्थ्याचा प्रसार करणारे.

दुसरे अक्षरशत्रू. ग्रांथिक ज्ञानापासून दूर. केवळ अनुभव ज्ञानावर समर्थ झालेले. भेदाभेदांनी भरून गेलेल्या दु:खीकष्टी समाजाचे जागरण घडवीत त्याला ज्ञानाचे सामर्थ्य सांगणारे, समतेचा नि मानवतेचा संदेश देणारे.

पण दोहोंची तुलना विधायक दृष्टी ठेवून ''साधू दिसती वेगळाले। परि ते स्वरुपीं मिळाले॥'' या समर्थ न्यायानेच करण्यासारखी आहे.

**हे तो प्रचीतीचे बोलणे!**

समर्थांनी ही तुकोबारायांप्रमाणेच ''बोले तैसा चाले'' ची महती सांगितली. ''स्वयें करुनि

बोलिले'' पाहिजे अन्यथा जन मानीत नाही, असे ते म्हणत.

*हे प्रचीतीचें बोलिलें। आधी केले मग सांगितलें।*
*मानेल तरी पाहिजे घेतलें। कोणी येकें॥*

कबीरदासांनीही असाच अनुभव साधनेवर सातत्याने भर दिलेला आहे.

*मैं कहता आँखिनकी देखी।*
*तू कहता कागजकी लेखी।*
*मेरा तेरा मनुआ कैसे इक होई रे।*

असा परखड सवाल कबीरदासांनी पोथीनिष्ठांना विचारला. आणि केवळ पोथ्यापुराणांच्या आधारे काही सांगणे हे पांडित्याचे ठरत नाही तर ज्याने प्रीती आणि उत्कट भावाने काही म्हटले त्याला पंडितांपेक्षा अधिक प्रतिष्ठा मिळावी अशी घोषणा त्यांनी केली :

*पोथी पढि पढि जग मुआ पण्डित भया न कोय।*
*ढाई आछर पीव का पढे सु पण्डित होय॥*

**वैश्विक प्रपंचाची चिंता**

''प्रपंच करावा नेटका'' ही परमार्थप्रिय समर्थांची कळकळीची सांगी होती. त्यांनी स्वत: मात्र सांसारिक जीवनाचा स्वीकार केला नव्हता. ''सावधान'' उच्चाराबरोबर बोहल्यावरून निघून जाऊन ''विश्वप्रपंचाची चिंता'' वाहात त्यांनी विलक्षण संन्यस्त जीवनक्रम आचरला होता.

संत कबीरांनी सांसारिक जीवनाचा, त्याबरोबर आलेल्या उपाधींचा अस्वीकार केला असे काही दिसत नाही. पण स्त्री विषयीची त्यांची दृष्टी मात्र अशी होती :

*नारी तो हम भी करी, जाना नाहिं विचार।*
*जब जाना तब परिहरि, नारी बडा विकार॥*

समर्थ आणि कबीर हे दोघेही विश्वप्रापंचिक तर होतेच पण सामान्य प्रपंचकर्त्यांच्या वृत्तीप्रवृत्तींची, त्यांची जाण चांगली होती. त्यामुळेच त्यांनी स्वत:चा परमार्थ उत्तम साधून प्रपंचात गुरफटलेल्या सामान्यांना सन्मार्गावर कसे आणता येईल त्याचे चपखल मार्ग सांगितले.

कबीर आणि समर्थ दोहोंचे लक्ष जरी अवघा संसार सुखाचा कसा करता येईल याकडे लागले, तरी प्रत्येक साधकाने अथवा सांसारिक व्यक्तीने आपापला जीवन व्यवहार नेटका करावा, मानवी जीवनाचा सदुपयोग करावा, अशी दोहोंची शिकवण असे. ''आधी काही मेळवी मग जेवी'' अशी स्पष्टोक्ती समर्थ करीत. कबीरदास कुटुंबरक्षणापुरतेच मागणे देवापाशी मागतात. नि थोडेसे अधिक मिळाले तर ते त्यांना साधुसज्जनांसाठी हवे. म्हणून ते म्हणतात :

*सांई इतना दीजिए जामे कुटुम समाय।*
*मैं भी भूखा ना रहूँ साधु न भूखा जाय॥*

## सत्यधर्मप्रियता

दोन्ही सत्पुरुषांची सत्यप्रीती अपूर्व होती. ''मना सर्वथा सत्य सांडू नको रे।'' म्हणणारे समर्थ आणि ''साँच बराबर तप नहीं'' म्हणणारे कबीरदास एकाच परमार्थ मार्गाचे प्रवासी आहेत. दोघांनी ''नानायोग तीर्थाटने'' किंवा ''वेष वरि वरि केला'' अशा दांभिक आचारसरणीने देवमार्ग हाताळणाऱ्यांचा तीव्र निषेध केला. आणि ''आत्मज्ञानाचा महिमा'' कथन केला.

भगवंताविषयींची अनन्य निष्ठा, अद्‌भुत आत्मविश्वास, कठोर सत्यप्रियता, विलक्षण निस्पृहता, तशीच परखड किंवा प्रसंगी फटकळ वृत्ती असे अनेक स्वभावविशेष दोहोंच्या ठिकाणी प्रकर्षाने आढळून येतात. समाजाच्या अभ्युत्थानाविषयींची कमालीची तळमळ दोघांच्या काव्यात जागोजाग दिसते. क्वचित त्यात प्रस्थापितांना धक्काही आहे. कबीरदासांमध्ये तर तो फार मोठ्या प्रमाणात आहे. कबीर-रामदासांना सत्यनिष्ठेपुढे तथाकथित प्रतिष्ठितांच्या कर्मकाण्डाची फारशी तमा वाटत नाही.

## जबर आत्मविश्वास

समर्थांच्या वाणीचे सामर्थ्य हे आत्मविश्वासयुक्त भाषेत आहे. त्यांचे प्रत्येक वचन हे ठाशीव आहे, आग्रहाचे आहे. ''बुडते हे जन'' म्हणून ''कळवळा'' ते व्यक्त करतात. पण त्यांचा मार्ग थोडा कडक आहे. आज्ञेचा आहे.

*समर्थाचिया सेवका वक्र पाहे।*
*असा सर्व भूमंडळी कोण आहे?*

असा तर त्यांचा उदण्ड आत्मविश्वास त्यांना सांगतोच. परंतु

*मना त्वांचि रे पूर्व संचित केले।*
*तयासारखे भोगणे प्राप्त झाले॥*

अशी त्यांची विचारदृष्टी आहे.

कबीरदासही आपला प्रभुशक्तीवरील दुर्दम्य विश्वास मोठ्या धारदार पद्धतीने मांडतात:

*जाको राखे साइया, मारि न सक्के कोय!*

अथवा,

*हरिसे जनि तू हेत कर, कर हरिजनसे हेत।*
*मालमुलुक हरि देत है, हरिजन हरि ही देत॥*
*पाहन पूजे हरि मिलै तो मैं पूजूं पहार॥*
*इनते तो चाकी भली पीस खाय संसार॥*

त्याप्रकारच्या सर्व वचनात एक जबरदस्त अंत:सूत्र आहे. आपण साधना अथवा प्रपंच दोन्हींचे बाबतीत विवेकाची कास धरली पाहिजे. प्रत्येक गोष्टीचा विचार अनुभवाच्या कसोटीवर करायला हवा असा आग्रह आहे.

**नाम साधना**

भक्तिमार्ग हा सर्वांसाठी खुला करणाऱ्या नि तो सोपा करणाऱ्या नामदेव-ज्ञानदेवांनी नामसाधनेचे स्वरूप नानाप्रकारे स्पष्ट केले होते. नामदेवांनीच पंढरी ते पंजाब अशी उत्तरेकडे झेप घेऊन समस्त भारतीय साधनेला ''नामदेवा'' चा थोर विचार दिला होता. पुढे एकनाथांनीही जनमन जागरणाकरिता नामभक्तीचा महिमा विशद केला. तुकोबाराय आणि समर्थांनीही ''नामा'' चे महत्त्व वारंवार स्पष्ट केले.

नामदेवांचे उत्तरभारतीय श्रेष्ठ वारसदार कबीर ''नामसुमिरन'' अथवा नामजप हे ईश्वराच्या आराधनेचे सर्वोत्तम साधन कसे ते मार्मिक रीतीने सांगतात.

*सभी रसायण हम करी नहीं नाम सम कोय ।*
*रंचक घटमें संचरै सब तन कंचन होय ॥*

''नाम'' ही दिव्यौषधी होय. त्यासारखे दुसरे ''रसायन'' नाही. अणुमात्र नामजपसाधनेने साधकाचे सारे जीवनच कांतिमय होऊन जाते। हे नामही रामाचेच घ्या असे ते सांगतात, कारण :

*दशरथसुत तिहुँ लोक बखाना । रामनाम का मरम है आना ॥*

दशरथपुत्र रामाची कथा तिन्ही लोकी वर्णनाचा विषय आहे. पण ''रामनाम'' हे त्या कथेपेक्षा अधिक महत्त्वाचे ठरते.

समर्थही शिष्यसमाजाला पुन: पुन्हा बजावीत होते : नामाने महादोष नष्ट होतात. पुण्याचा ठेवा लाभतो म्हणून,

*प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।*

अशी त्यांची आज्ञा आहे!

**सद्गुरु कृपेचे महात्म्य**

समर्थ आणि कबीर हे गुरुमार्गी होते. दोहोंची गुरुभक्ती विलक्षण होती. पण दोहोंनाही गुरुसहवास केव्हा, कुठे, कसा, किती मिळू शकला हे नेमके सांगता येणार नाही. दोघांनीही ''परलोक साधाया कारणे। सद्गुरु पाहिजे।।'' म्हटले आहे. कबीरोक्तीही अशाच आहेत :

*- सद्गुरु की महिमा अनंत, अनंत किया उपकार ॥*
*- गुरु गोबिंद दोऊ खडे काके लागौं पाय ।*
*बलिहारी गुरु आपणे, गोबिंद दियो बताय ॥*
*- गुरु कुम्हार सिष कुंभ है, गढ़ गढ़ काढ़ै खोट ।*
*अंतर हाथ सहार दै, बाहर बाहै चोट ॥*

समर्थ रामदासांची आणि कबीरदासांची परमार्थपथावरील साधना एकप्रकारे स्वयंशासित आहे. जिथे जिथे गुणविशेष आढळतील तिथे तिथे सद्गुरुचे अधिष्ठान मानून ते निरंतर कार्यरत राहिले. कबीरदासांनीही ''मैं कहता आँखिनकी देखी। तू कहता कागजकी लेखी''

अशी करारी वृत्ती ठेवून गुरुपरंपरा अथवा शिष्यपरंपरा यांची चिंता न वाहता समाजप्रबोधन केले.

कबीरदासांचे गुरु रामानंद होते आणि त्यांनी एकदा कबीरांना ''राम मंत्र'' दिला, इतकेच एका जनश्रुतीच्या आधारे मानले गेले आहे.

**मनोबोधावर भर**

समर्थांनी प्रपंचाची भक्ती सोडून भक्तीचा प्रपंच करताना ''मना सज्जना भक्तिपंथेचि जावे'' असा मनास उपदेश केला. त्यांचा ''मनोबोध'' अथवा ''मनोपदेश'' प्रसिद्ध आहे. त्यात विवेचकता आहे. दासबोधामध्ये जो समग्र जनहितविषय समर्थांनी सविस्तर मांडला तोच साररुपाने त्यांच्या मनाच्या दोनशे पाच श्लोकात आलेला आहे.

या श्लोकात आरंभी रामाच्या सगुण रुपाचे स्मरण करून तेच ''ब्रह्म चैतन्य रुप'' कसे ते स्पष्ट केले आहे. उत्तरार्धात राम रुप ईश्वरच निर्गुण, शाश्वत, अनंत, भयातीत आहे. हा सिद्धांत मांडलेला आहे. पण हे ''मीपण सोडूनच आकळते'' असे सांगायला समर्थ विसरत नाहीत.

कबीरदासांनीही ''मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयो : ।'' अशी मनाची महती जाणली आहे. ते सांगतात :

*माला फेरत जुग भया मिटा न मन का फेर ।*
*करका मनका डारि के मनका मनका फेर ।।*

- टिळेमाळा इत्यादींचा साधनेसाठी अवलंब करण्याचे अर्थात बाह्याचारावर भर दिल्याने मनाला खरे समाधान मिळत नाही. आत्मोद्धार घडत नाही. म्हणून बाह्यावडंबराचा त्याग करावा आणि मनाची मणिमाळा जपावी. मनजागृतीवर भर द्यावा.

समर्थ मनाचे सामर्थ्य समजून जनांना कळकळीचा उपदेश करतात :

*मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें ।*
*मना बोलणें नीच सोशीत जावें ।*
*स्वयें सर्वदा नम्र वाचे वदावें ।*
*मना, सर्व लोकांसि रे नीववावें ।।*

हाच आशय संक्षेपाने आपल्यासमोर ठेवून कबीर म्हणतात :

*ऐसी बानी बोलिए मनका आपा खोय ।*
*औरनकू सीतल करे आपहूँ सीतल होय ।।*

आपण असे बोलायला हवे की ज्यामुळे आपले आपल्यालाच मनापासून बोलल्यासारखे वाटावे. पण त्यात विवेक हवा. आपल्या बोलण्याने इतरांना काच होऊ नये. आणि आपले आपल्यालाही असमाधान राहू नये.

*नारायण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।*

*या कारणें तोषवावी । कोणी तरी काया ॥*

अशी वैश्विक दृष्टी जागी झाल्यामुळेच भजनाची व्याख्या करताना समर्थ म्हणाले,

*कोणी येक भेटो नर । धेड महार चांभार ॥*
*राखावे तयाचे अंतर । या नाव भजन ॥*

कबीरदासांनीही भजनात जनाला महत्त्व अधिक दिले. त्यांनी तर जनी जनार्दन पाहण्यातच भजनानंद पाहिला आहे :

*चारी भुजाके भजन में भूलि परे सब संत ।*
*कबिरा सुमिरै तासुको जाके भुजा अनंत ॥*

**केवळ काव्यरचना नव्हे !**

कबीरदास आणि समर्थ रामदास दोघांची स्वदेश, स्वबांधव आणि स्वभाषा-स्वसंस्कृतीवर अनन्य प्रीती होती. ती विशुद्ध होती. निखळ होती.

तुलनेने पाहता कबीरांचे कवित्व अधिक मधुर असले तरी त्याला परतत्त्वाचा स्पर्शच अधिक होता. ''पहिले ते हरिकथा निरुपण। दुसरे ते राजकारण'' असे समर्थ म्हणत. कबीरही अध्यात्मसाधनेबरोबर समाजकारणाला महत्त्व देत होते. जनसामान्यांचा उद्धार हा त्यांचा ध्येयवाद होता. आपल्या कवित्त्वाबद्दल त्यांची उक्ती प्रसिद्ध आहे :

*तुम जिन जानो गीत है, यह निज तत्त्व विचार ॥*

अर्थात लोक ज्याला माझी कविता मानतात ते वस्तुतः माझे प्रकट चिंतन आहे. समर्थांचीही नेमकी अशीच भूमिका असावी. ''दिसामाजि काही तरी ते लिहावे'' अशा सरणीने समर्थांनी विपुल लेखन केले आहे. त्यात कवित्वापेक्षा तत्वचिंतनच जास्त आहे. समाजाच्या धारणेसाठीच त्यांनी आपले मनन शब्दबद्ध केले.

कबीरदासांची अभिव्यक्ती कधी उग्रकठोर शब्दरुप घेऊन प्रकटली. मुल्लामौलवी किंवा पुढारी पंड्यांवर ते खरपूस टीकाप्रहार करतात. आचार्य हजारी प्रसाद द्विवेदीजींच्या शब्दात म्हणायचे तर ''कबीर, वाणीचे डिक्टेटर'' होते. त्यांच्या कडक प्रतिपादनाचा फटका प्रतिष्ठित भल्याभल्यांना असा बसे की, पाठ चोळीत ते चालू लागत. आणि आपला झालेला फजिता फार जणांना समजला तर नाही - अशी चिंता वाहात.

समर्थांची समाजप्रबोधनाची धारणा जरी कबीरदासांपेक्षा फार वेगळी नसली तरी त्यांची धाटणी मात्र खचितच निराळी आहे.

*उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनांस शिकवावे ।*
*उदण्ड समुदाये करावे । परी गुप्तरुपें ॥*

अशी समर्थ नीती आहे.

**समर्थ-कबीरांचे साध्य**

समर्थांनी आपल्या तपोबळाने सज्जनांची संघटना सिद्ध केली. ''मांडिली मोडिलीं क्षेत्रें''

हे शल्य त्यांना सतत बोचत होते. क्रूर आक्रमकांच्या असहिष्णु आचारामुळे जनसामान्यांचे जीवन कसे भयग्रस्त झाले आहे, अस्मानीपेक्षा सुलतानी संकट कसे भेसूर आहे हे त्यांना डाचत होते. ''विवेक'' सर्वत्र लोपला याची खंत होती. म्हणूनच त्यांनी उपदेशक समाज पुरुषाची भूमिका स्वीकारली. ''वन्हि तो चेतवावा रे। चेतविताचि चेततो।।'' या विश्वासाने त्यांनी ''सामर्थ्य आहे चळवळीचे। जो जो करील तयाचे'' असे प्रेरक बळ तयार केले. ''देवकारण'' अथवा ''रामकारण'' सर्वसामान्य जनांच्या दैनंदिन जीवनापर्यंत जाऊन पोहोचावे, आणि त्यायोगे समाजाचे प्रपंचकारण आणि राजकारण,

*शक्तियुक्ति जयें ठायी / तेथे श्रीमंत धावती ।।*

असे होऊन जावे यासाठी समर्थांनी सारा मराठा म्हणजे ''देशनिष्ठ'' माणूस ''मेळवून'' ''महाराष्ट्र धर्म'' म्हणजे ''देशनिष्ठा'' जागविली.

कबीरदासांचीही धडपड यासारखीच होती.

ते हिंदू-मुसलमानांच्या धर्मबंधनापलीकडे गेलेले होते. त्यांचा आग्रह विशुद्ध आचरणाचा होता. मानवतेचा होता. ''सत्य असत्यासी प्रथम मनाला ग्वाही करावे'' आणि ''बहुमता'' पेक्षा आंतरिक शुद्ध भाव, विचार आणि प्रत्यक्ष कृती यांना महत्त्व द्यावे, असा त्यांचा पण होता. त्यानुरुप कार्यपद्धती योजून ते म्हणत :

*कबिरा खडा बाजारमें लिये लुकठ्ठा हाथ ।*
*जो घर फूँके आपणा चले हमारे साथ ।।*

- मी सोटा घेऊन भर बाजारात सर्वांसमक्ष उभा आहे. ज्यांना स्वार्थ शिवलेला नाही आणि ज्यांना या समाजासाठी काही करायची जिद्द आहे, त्यांनी माझ्याबरोबर या, अन्यथा येऊ नये.

समर्थांना असा दम द्यावा लागला नाही. याचे श्रेय थोडे शिवशाहीलाही द्यायला हवे. आनंदवनभुवनाचे स्वप्न एकीकडे समर्थ पहात होते. दुसरीकडे शिवरायांनी ते प्रत्यक्षात आणण्याचा 'उद्योग' 'जाणता जयवंत राजा' होऊन केला होता. समर्थांना त्या सामर्थ्य यज्ञामागे ''सज्जनत्व'' उभे करावयाचे होते. म्हणून कमालीच्या वत्सल पालकत्त्वाने ते म्हणत :

*मुलांच्या चालीने चालावें / मुलांच्या मनोगतें बोलावें /*
*तैसे जनांसि सिकवावें / हळू हळू ।।*

- अशी खऱ्या समाजशिक्षकाची भूमिका घेऊनच समर्थांनी ''आपणास जें जें ठावें, तें तें हळूहळू, जनांस सिकवावे। शहाणे करूनि सोडावे सकळ जन।।'' असे पथदर्शी लोककार्य केले.

~

१. पाहा : ''मराठी संतांची हिंदी रचना'' / ''प्रसाद'' एप्रिल १९८६

~ ~

# गोस्वामी तुलसीदास आणि समर्थ रामदास ६

---

**मराठी वाङ्मयेतिहासात रामायणापेक्षा महाभारतावर आणि त्याहीपेक्षा गीतेवर भर अधिक राहिला आहे.**

**तुलसीरामायणाच्या रचनाकाळात महाराष्ट्र महोदयाचे अग्रदूत एकनाथ उत्तरेत भागीरथीकाठी होते. ते मूळचे कृष्णकवी. उत्तरेतून पुन्हा गोदातटाकी परतलेले नाथ ''भावार्थ रामायणा'' ची विराट रचना करतात.**

**नाथ काळात दक्षिणापथावर वज्राघात झाला होता. इस्लामी पंचराज्यांनी एकशाही जूट करून विजयनगरच्या हिंदवी साम्राज्याचा पाडाव केला. आणि सारी दख्खन इस्लामला मोकळी झाली. अशा आपत्तिकाळी दंडकारण्याचा आणि पंचवटीचा वारसा सांभाळणाऱ्या मराठी माणसांना रामायणाचे स्मरण करून देणे निकडीचे होते. नाथांनी आपल्या प्रेरक रचनेने हे कर्तव्य केले.**

**नाथांनी पर्यायोक्तीचा आधार घेतला तर पुढे समर्थांनी सारा भर स्पष्टोक्तीवर दिला.**

**तुलसीदासांनी आणि एकनाथांनी रामराज्याचे स्वप्न पाहिले. रामराजाचा धावा केला. समर्थांना शिवरायांच्या रुपात मर्यादा पुरुषोत्तम दिसला. स्वराज्यात आनंदवनभुवनाचा संतोष गवसला.**

---

रामदास आणि तुलसीदास या दोन नामांतही स्पष्ट साम्य आहे. आमच्या मराठी संत-भक्तांची नावे क्वचितच ''दास'' पदान्त आहेत. चक्रधर, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम अशा सर्व सत्पुरुषांपैकी कोणाचेही नाम दासपदान्त दिसत नाही.

तुलसीदास आणि रामदास हे दोघेही थोर रामभक्त. साक्षात्कारी सत्पुरुष. भक्ती आणि मुक्ती यांचे अलौकिक सुख अनुभविणारे, समाजाला काही सांगावे म्हणून रामाज्ञेने कविता करणारे. दोघांनीही प्रपंचापेक्षा परमार्थ केला. समाजाचा संसार केला. एकाची लेखणी काव्यसौंदर्यरसात न्हाऊन निघते, तर दुसऱ्याचा काव्यातील उद्‌बोधनावर भर अधिक. त्यातून दोघांपाशी विलक्षण प्रासादिक भाषा आणि संस्कार घडविण्याची शक्तीही तशीच जबरदस्त.

**एकनाथांचे कार्य**

तुलसीदास आणि समर्थ या दोन महान भक्तहृदय विचारक कवींमध्ये दुवा म्हणून एकनाथ

आहेत. “क्रोधें गांजिलें देवभक्तां। महिमा उच्छेदिला सर्वथा” म्हणून “बया दार उघड। आता बया दार उघड॥” असे शक्तिदेवतेला आवाहन करणारे महाराष्ट्रमहोदयाचे अग्रदूत महात्मा एकनाथ आहेत.

एकनाथ मूळचे कृष्णकवी. भागवताचे टीकाकार. त्यातूनही भागवताच्या एकादशस्कंधावर ते विशेष मोहित झालेले. भागवत ग्रंथाला वाराणसीच्या विद्वद्वृंदाची मान्यता मिळविण्यासाठी ते काशीला गेले. तेथे काही वर्षे त्यांनी निवास केला. या सन १५७१ ते १५७५ दरम्यानच्या गोष्टी आहेत. याच काळात गोस्वामीजी वाराणसीत आपल्या कृतार्थ जीवनाची सायंकाळ अनुभवीत होते. भागीरथीच्या घाटावर त्यांच्या “रामचरितमानसा” चे कीर्तन-प्रवचन घडत होते. नाथांनी त्या भक्तिमधुर श्रवणसुखाचा लाभ घेतला आणि नाथ रामभक्तीकडे वळले. गोदातटाकी परतले ते नाथ “भावार्थरामायणा” च्या पूर्तीचा विचार घेऊन! मध्ययुगीन महाराष्ट्राचा हा इतिहास अभिमान वाटावा असा आहे.

**समर्थांची प्रतिज्ञा**

महात्मा एकनाथ यांच्यानंतर शिवयुगात समर्थ रामदास्वामींचा उदय झाला. सह्यगिरीच्या कडेपठारी मर्यादापुरुषोत्तम प्रभू श्रीरामचंद्राच्या पुण्यपराक्रमी जीवनाची विजयगाथा गाजवीत स्वामी समर्थपणे उभे राहिले. “केल्याने होत आहे रे। आधीं केलेंचि पाहिजे” असे सांगून खडतर दुर्दैवाशी दोन हात करा, असे म्हणत राहिले.” वन्हि तो चेतवावा रे। चेतवीतांचि चेततो” हा त्यांचा मंत्र होता. “मराठा तितुका मेळवावा” अशी त्यांची ऐक्याची घोषणा होती. आणि -

*“देव मस्तकीं धरावा, अवघा हलकल्लोळ करावा।*
*मुलुख बडवा कीं बुडवावा, धर्मसंस्थापनेसाठी॥”*

ही त्यांची प्रतिज्ञा होती. ही प्रतिज्ञा ज्या क्षत्रिय पौरुषाने ऐकली त्याला “जैशास तैसा भेटे। तेव्हां मज्यालसी थाटे” असा आत्मविश्वास गवसला. आणि उत्तमपुरुषाचे सारे गुण, शक्ती, वैभव ज्या एका महान शिवरायांच्या ठायी एकवटले होते त्यांनी तर समर्थांसारखाच,

*म्हणोनि आम्ही रामदास।*
*श्रीरामचरणीं आमुचा विश्वास॥*
*कोसळोनि पडो हें आकाश।*
*आणिकांची वास न पाहूं॥*

असा मनोमन अद्भुत आनंद आणि आत्मबळ मिळविले. मग सुष्टांचा जयो झाला, दुष्टदुर्जनांचे निर्दालन होऊ लागले. महाराष्ट्रभूमीत “आनंदवनभुवन” प्रकटले. समर्थांचे रामदास्य धन्य झाले. शिवरायांचे सामर्थ्य अन् स्वामीभक्ती सफल झाली. आणि शिवसमर्थांमुळे नाथ-तुलसीदास हे दोघेही स्वर्गी कृतकृत्य झाले.

**काही साम्य आणि वैशिष्ट्ये**

तुलसीदास आणि रामदास या दोघांची आराध्यदेवता एक होती. हे सारे विश्वराज्य

''सीयाराममय'' आहे अशी दोघांची मनोभावना होती. सद्भाव आणि सदाचार, कर्तृत्त्व आणि कृतकृत्यता, कर्तव्य आणि चरितार्थता असा पौरुषाचा ध्येयवाद त्यांनी भारतीय समाजाचे जागरण घडविताना मनीमानसी जपला - जोपासला होता. दोघांनी खडतर तप केले होते. विलक्षण जीवनाभिमुखता अन् रसिकहृदय असूनही दोघांना स्वीकारावा लागला, तो जीवनपथ वैराग्याचा होता. पण विराण्या आळविण्याचा वा विश्वाविषयीचे गूढ प्रश्न छेडून आत्मरंगात अथवा रहस्यरंगात दंग होण्याचा दोघांचाही स्वभाव नव्हता. दोघांनी कविता लिहिली ती, विचार सांगावा म्हणून. समाज सुधारावा, सावरावा, वर्धिष्णु व्हावा म्हणून.

दोघांनाही झुंज द्यावी लागली ती स्वकीयांच्या संकुचित वृत्तीविरुद्ध. उत्तर भारतात, विशेषेकरून शंभु महादेवाच्या वाराणसीनगरीत शिवभक्त शैव अन् विष्णूचे उपासक वैष्णव यांचा उभा दावा होता. पण आपल्या प्रखर वैराग्याने, उत्कट भक्तिभावनेने आणि पराकाष्ठेच्या सोशिक स्वभावाने समाजातील परस्पर संघर्षरत शक्तींचा समन्वय साधण्याचा तुलसीदासांचा संकल्प होता. इकडे समर्थांनी रामोपासनेबरोबर ''हनुमंत आमुची कुळवल्ली'' असे सांगून रामवरदायिनी आई भवानीचे पूजन केले. बलोपासना, विनम्र भक्तिभावना आणि पराक्रमाविषयी, सामर्थ्याविषयी ओढ ही समर्थांच्या साधनेची त्रिसूत्री होती. ''यत्न तो देव जाणावा'', ''यत्नेवीण दरिद्रता'' ''प्रयत्न पुरुषे सांडू नये कांहीं केल्या'' असे ते सतत सांगत होते. त्यांनी मराठमंडळात उत्साह आणि कार्यप्रवणता आणली. प्रपंच नेटका करून मग परमार्थ साधण्याचा व्यवहार आणला.

दोन्ही कवि-पुरुषांनी वर्णव्यवस्था, लोकमर्यादा, श्रुतिसंमत आचारविचार आणि सदाचार यांवर भर देत रामभक्ती सांगितली. दोघांच्याही काही विचारांना आजच्या काळाच्या संदर्भात काही मर्यादाही पडल्या आहेत हे कबूल करायला हवे.

वास्तविक गोस्वामी तुलसीदास आणि समर्थ रामदास स्वामी हे दोघे दोन वेगवेगळ्या प्रदेशाचे, प्रतिनिधी. त्यांच्या भाषा भिन्न. परिवेशांत फरक. दोहोंची जडणघडणही वेगवेळ्या वातावरणात झालेली. पण दोहोंचे उपास्य एक. दोहोंचे श्रद्धास्थान मर्यादापुरुषोत्तम प्रभु श्रीराम. अकबर जहांगीरच्या काळी जेव्हा समस्त उत्तर भारतात मोगल शासन स्थिरावले होते, त्यावेळी, तुलसीदास रामावतार अन् रामराज्य यांची पवित्र मंगल स्वप्ने पाहात, शरयूतीरावर पुरातन अयोध्यानगरीत बसून, आदिकवींच्या महाकाव्याचा अवधी अवतार अनुभवीत होते. राजापूरला यमुनातीरावर त्यांनी कितीतरी काळ रामकृष्णांच्या विमल चरित्रचित्रांचे पुण्यस्मरण केले होते. पुढे भागीरथीच्या किनारी, जेथे सारा भारतवर्ष विश्वनाथाच्या दरबारात विनम्र होण्यासाठी एकवटतो, तेथे राहून त्यांनी मर्यादापुरुषोत्तमाचे जीवनव्रत, कथाकीर्तनातून सर्वांसमोर विशद केले होते. पण या साऱ्या राममय जीवनव्रताचे आचरण करीत असताना तुलसीदासांना चर्मचक्षूंनी पाहावा लागत होता तो सारा आसमंत अधर्माचरणी आक्रमकांच्या आधीन होता. अवतीभोवती ओजस्वी आत्मबळाचा अभाव. स्वधर्मबांधव अवघे ''फजीत'' झालेले. सुष्टांचा सर्वत्र पराभव, अभक्तांचा अन् परपीडकांचा ''जयो'' झालेला.

### आव्हान आणि आवाहन

समर्थांच्या काळी देखील उत्तरेचा अंमल धर्मांध औरंगजेबाच्या असहिष्णू शिरीहाती सापडलेला. नर्मदा ओलांडून वर हिमाचलाकडे जाण्याचा मार्ग निर्वेध नव्हता. सारी तीर्थक्षेत्रे आणि पावनमंदिरे परक्यांच्या अवकृपेने भग्न झालेली. पण दक्षिणापथात शिवशाहीचे चैतन्य पसरत चाललेले. हिंदवी स्वराज्याचा उदय झालेला.

तुलसीकालीन हिंदु समाज आणि समर्थकालीन हिंदू समाज यात शेपाऊणशे वर्षांचा म्हणजे तीन पिढ्यांचा फरक. पण धार्मिक अत्याचार, आया-बहिणींची अब्रू असुरक्षित, हिंदूचा छळ हे सारे मोगली वर्तन, प्रतिकाराअभावी उत्तरेत अनिर्बंधपणे सुरू होते. त्याला त्या खडतर काळात आव्हान दिले ते सह्यगिरीच्या खडकाळ पठारावरील मूठभर मावळ्यांच्या संघटनेने. या संघटनेचा सूत्रधार शीलवान होता. धैर्याचा महामेरू होता. जाणता जयवंत होता. त्याचे राज्य व्हावे ही तर श्रींची इच्छा होती. म्हणून त्याच्या ह्या साऱ्या देवसदृश गुणसंचयाचे संकीर्तन करून समर्थांनीच भवानी आईला साकडे घातले :

*"तुझा तूं वाढवी राजा।"*

शिवाजीराजांचे सारे यशोमय जीवन, त्यामागची अनंत ध्येयासक्ती, उदण्ड प्रयत्नशीलता, अद्भुत संघटनाकौशल्य अन् विराट मनोबल समर्थांनी स्वतः पाहिले. इतकेच नव्हे तर, त्या विलक्षण कार्यकर्तृत्वाला फुलविण्याचा शुभसंकल्प सोडून ते अखंड संचार करीत राहिले. "जय जय रघुवीर समर्थ" असा जयजयकार करणारे समर्थ -

*"समर्थाचिया सेवका वक्र पाहे*
*असा सर्व भूमंडळीं कोण आहे?"*

हा आत्मविश्वासाचा उद्‌गार घरीदारी चेतवीत राहिले. अस्मानी-सुलतानी कालमानपरिस्थितीचे चित्रण ते करीत होते, ते वर्णनही आतड्याला पीळ पाडील असे होते. त्यात तळमळ होती. पण मिळमिळीतपणा नव्हता. ओजस्वीवृत्ती होती. आवाहन होते. त्यात आवेशही होता. तो अनुभवून जवानांचे बाहू स्फुरण पावू लागले. विषण्णता आणि असमर्थता त्यांना नको नको वाटू लागली. काहीतरी नवेच करायचे, अशी उर्मी अस्वस्थ करू लागली.

### तुलसीदासांचे वेगळेपण

तुलसीदासांच्या नावावर रामचरितमानसाव्यतिरिक्त लहानसहान अन्य बारा ग्रंथ आहेत. पण त्यांची प्रमुख रचना रामायणच. ती देखील वाल्मीकिरामायण आणि अध्यात्मरामायण यांना प्रामुख्याने समोर ठेवून केलेली कथात्मक महाकाव्यरचना आहे. तुलसीप्रकृती ही सौम्यशीतल अन् काव्यसौंदर्यात रमणारी आहे. नाथ आणि समर्थ यांच्या रामकाव्यात प्रेरकतेला प्राधान्य आहे. कालगतीचा शोध घेऊन बोध देण्यावर दोहोंचा भर दिसतो.

तुलसीदासांनी देशयात्रा केल्याचे प्रमाण नाही. हिंदी रामभक्तिशाखेचे ते प्रमुख कवी, पण त्यांनी समर्थांप्रमाणे संप्रदाय उभारून रामकथा-प्रसार केला नाही. समाजाचे संघटन

करून त्याला रावणवृत्तीविरुद्ध चेतवावे असे समर्थांनी ठरविले आणि त्याप्रमाणे केले. तुलसीदासांपुढे अशाप्रकारचा ध्येयवाद दिसत नाही. परंतु प्रासादिक, रसपूर्ण अन् जीवनभाष्यात्मक तुलसीरामायणामुळे उत्तरेत हिंदू समाजाला फार मोठा आधार मिळाला आणि हिंदू अस्मिता टिकली.

उत्तर भारतात सगुणोपासक आणि निर्गुणोपासक यांच्या भक्तिपरंपरा स्वतंत्र राहिल्या. त्यातही निर्गुणोपासकांवर सूफीमताचा प्रभाव पडला. त्यांनी मधुरोपासनेचे वावडे मानले नाही. सगुणोपासकात राम आणि कृष्ण यांची आराधना करणारे एकमेकापासून अलग राहिले. कृष्णभक्तीतही धर्मोपदेशक श्रीकृष्णाचे विस्मरण होऊन केवळ लीलाधराचेच गुणवर्णन करण्याकडे सारे लक्ष केंद्रित झाले. यातूनही मधुरोपासना प्रधान बनली.

तुलसीदासांनी बहुधा हे सारे ध्यानी धरून मर्यादा पुरुषोत्तमाचे आदर्श चरित्रचारित्र्य जनांपुढे ठेवले. समर्थांपुढे तुलसीदासांसारखी आव्हाने नव्हती. कारण मराठी भक्तिपरंपरेत अद्वैताधिष्ठित भक्ती, गीतोपदेश आणि समन्वय यांना आरंभापासूनच महत्त्व मिळाले होते.

**संजीवनी देणारी रचना**

असंघटित हिंदू समाजाला संजीवनी सांगावी, भारतीय संस्कृतीचे सारसर्वस्व शोधून मध्ययुगीन अज्ञानांध:काराला भेदावे म्हणून गोस्वामी तुलसीदास रामभक्त बनले. पुण्यतोया भागीरथीच्या तीरावर व्रतवैकल्यांच्या निमित्ताने आलेल्या भारतीय बांधवांना रामकथेचा नवा आशय त्यांच्या निमित्ताने आकळला. एकनाथांचे भावार्थ रामायण हा तुलसीदासांकडून त्यांना मिळालेला उदात्तमंगल वारसाच होय.

नाथांच्या रामायणानंतर रामकवी रामदास पुनश्च पूर्ण रामायण लिहित नाहीत. केवळ सुंदरकांड आणि युद्धकांडच लिहितात. हनुमंत सीता शोधासाठी निघतो आणि पुढे रामराज्याभिषेक साजरा केला जातो. या कथा प्रसंगाचे १४६२ श्लोक इतकीच समर्थांची कथावस्तु आहे. रावणाच्या अत्याचारातून देवभक्तांची सोडवणूक करण्याकरिता ''रामावतार'' होतो. तो ''बंधमोचक'' वीरवर आहे, इतकेच त्यांना जनमनावर ठसवायचे होते. खरे म्हणजे समर्थ ते रामायण जगले. आदिकवीचे भाग्य त्यांना लाभले. गोस्वामी तुलसीदासांचा उत्कट भव्य वारसा 'सनाथ'' महाराष्ट्राने समर्थपणाने पेलला आणि समर्थपणाने अन् ध्येयासक्तीने स्वीकारला तो शिवविचारांच्या अन् स्वराज्याच्या रुपात रामराज्य म्हणून.

आणि त्या योगे केवळ समर्थ स्वामी रामदासच धन्य नाही झाले, तुलसीदास अन् एकनाथही धन्य धन्य झाले. तुलसीरामायणातील वचन आहे...

*जब जब होइ धरम कै हानी।*
*बाढहि असुर अधम अभिमानी ॥*
*करहिं अनीति जाइ नहिं बरनी।*
*सीदहिं विप्र धेनु सुर धरनी ॥*
*तब तब प्रभु धरि विविध सरीरा।*

*हरहि भवनिधि सज्जन-पीरा ॥*

*(रामचरितमानस: बालकांड १२०-१२१)*

"यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत" या भगवान श्रीकृष्णाच्या गीतावचनाचा हा भावानुवाद आहे.

पंधराव्या शतकात रचल्या गेलेल्या अध्यात्म रामायणात भूमीवरील पाप नष्ट करणे आणि देवशत्रूंचा विनाश करणे हे रामावताराचे प्रयोजन सांगण्यात आले. तुलसीदासांनी रामप्रभूंच्या अवताराचे उद्दिष्ट याहीपेक्षा मोठे कसे ते सांगितले. भक्त, भूदेव, गोमाता आणि माणूस यांच्यावर कृपावर्षाव करावा म्हणून परमतत्त्व रामरुपात प्रत्यक्ष अवतरले, असे ते सांगतात.

**उपसंहार**

साऱ्या बहुजनसमाजाला अभय देण्यासाठी कला, विद्या, कर्तृत्त्व फुलविण्यासाठी, सन्मार्गाला प्रतिष्ठा देऊन वाममार्गाचा बीमोड करण्यासाठी देवावतारी पुरुषोत्तम आपल्यामध्ये वावरत असतो. शिवछत्रपतींच्या रुपाने सतराव्या शतकात महाराष्ट्रीयांनी हा अनुभव घेतला.

येथे गोस्वामी तुलसीदासांचे अधुरे स्वप्न साकार झाले. महात्मा एकनाथांनी घडविलेले जागरण फलद्रूप झाले. समर्थ रामदासांना तर आनंदवनभुवनाचा अनुपम सोहळा याचि देहि याचि डोळा अनुभवावयास मिळाला.

अशाप्रकारे भक्तियात्रेच्या विमल प्रवासात तुलसीदास, एकनाथ अन् समर्थ रामदास ही एक वंदनीय त्रिमूर्ती ठरली आहे.




१. जगमोहन चतुर्वेदी : एकनाथ व तुलसीदास, एकनाथ संशोधन मंदिर, औरंगाबाद.

२. डॉ.न.चिं. जोगळेकर : मराठी और हिंदी वैष्णव साहित्यका तुलनात्मक अध्ययन, जवाहर पुस्तकालय, मथुरा. १९६४

३. डॉ. सज्जनराम केणी : रामचरित मानसका तुलनात्मक अनुशीलन, पुस्तक संस्थान कानपूर. १९७४

४. डॉ. अशोक कामत : तुलसीदास आणि मराठी रामकाव्य (अप्रकाशित लघुशोध प्रबंध) १९७७

५. डॉ. अशोक कामत : गोस्वामी तुलसीदास, वोरा ॲण्ड कंपनी. मुंबई १९७८

६. डॉ. भीमराव कुलकर्णी : रामायणाधारित विविध भाषा साहित्य, रविवार सकाळ. २५/१०/८७

७. डॉ. अशोक कामत : आदिकवी, तुलसीदास आणि मराठी रामकाव्यपरंपरा, प्रसाद, मार्च व एप्रिल १९८९ पुणे.




# कीर्तन परंपरा :
# वारकरी आणि समर्थ सांप्रदायीक

७

---

ज्ञानदेव नामदेवांच्या काळापासून सामूहिक भजन-गायन नि वारकरी कीर्तन मराठी भाषी मुलखात प्रचलित आहे. यात एक प्रमुख अभंग गायक नि अनेक टाळकरी नामजप करीत संतवाणीचे प्रभावीपणे विवेचन करतात.

नारदीय श्रोतृसंवाद, भावविभोर कथन-कीर्तन, वारकरी भजन, संतग्रंथातील वचनांचे निरुपण यांचा चांगला मेळ महाराष्ट्रीय कीर्तन परंपरेत आढळतो.

समर्थ सांप्रदायिकांनी या कीर्तनाला वेगळे वळण देण्याचा प्रयत्न केला. समर्थ रामदासांनी कीर्तनविषयक विचार ठाशीव शैलीत मांडले. त्यांची व्याप्तीही मोठी आणि त्यातील आशयही मोठा. पण पुढीलांनी त्यातून बोध घेऊन फार सामाजिक यश मिळविले असे दिसत नाही.

आजही जनमन जागरणासाठी कीर्तन प्रभावी साधन ठरते. सुविद्यजनांसाठी व्याख्याने, वृत्तपत्रे, आकाशवाणी इत्यादी असले तरी आबालवृद्ध स्त्रीपुरुष बहुजनांकरिता रंजक नि ज्ञानप्रसारक असे दृश्यकाव्य वा नाटकाची वैशिष्ट्ये अंगभूत असणारे कीर्तन हवेच.

मात्र त्यात कोणताही सांप्रदायिक आग्रह नसावा. तो न ठेवण्यासाठीही वारकरी व समर्थ सांप्रदायिक कीर्तनांची बैठक समजून घेणे उपयोगाचे ठरेल..

---

## नामसंकीर्तन आणि कीर्तन

आपल्या देशात पुरातन काळापासून कीर्तनपरंपरा आहे म्हणजे भगवंताच्या नामसंकीर्तनाची पद्धती प्रचलित आहे. विश्वातील विविध सुखदुःखावर मात करीत मोक्ष अथवा मुक्ती मिळवून अमर रहावे किंवा ईश्वरमय होऊन जावे, अशी या नामजपप्रधान समूहभक्ती मागील मूळ कल्पना असावी.

नारदभक्तिसूत्रात एक श्लोक येतो :

*श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणम् पादसेवनम् ।*
*अर्चनं वंदनं दास्यं सख्यं आत्मनिवेदनम् ॥*

ही जी नवविधा अर्थात नऊ प्रकारची भक्ती सांगण्यात आली तिच्यातही कीर्तन म्हणजे परमेश्वराचे नामस्मरण असाच भाव दिसतो.

पुराणातील देवर्षी नारद हे कीर्तनप्रणालीचे आद्य प्रणेते असे मानले जाते. नारद म्हणजे नेमके कोण ? एक तर नारदभक्तिसूत्राचा कर्ता किंवा नरांचे धर्मजागरण आणि उन्नयन करतो तो नारद. पण ज्ञात इतिहासकाळापुरते बोलायचे तर मराठी संतमंडळातील ज्येष्ठ वारकरी संत नामदेव हे नामचिंतन भक्तीचे आणि कीर्तनकलेचे जनक ठरतात. जसे वीणाधारी नारदाचे चित्र प्रचारात आहे तसेच नामदेवांचीही जनप्रिय प्रतिमा वीणाधारक कीर्तनकाराचीच आहे. मुख्य म्हणजे नामदेव गाथेत कीर्तनकलेचे स्वरूप आणि महत्त्व विशद करणारे अनेक अभंग आलेले आहेत.

*बोलूं ऐसे बोल । जेणें बोलें विठ्ठल डोले ॥*
*प्रेम सर्वांगाच्या ठाई । वाचे विठ्ठल रखुमाई ॥*
*परेहूनि परतें घर । तेथे राहूं निरंतर ॥*
*नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावूं जगीं ॥*

(१४९४)

हा नामदेवांचा अभंग वारकरी संतांना जनमन जागरणासाठी कथा कीर्तन करण्याची प्रेरणा देणाराच ठरला. स्वत: नामदेव लोककल्याण आणि जागृतीच्या उद्देशाने पंढरीपासून गांधारपर्यंत पदयात्रा करीत गेले. त्यांच्यापाशी एकमात्र साधन होते, कीर्तन कलेचे. "ग्रंथामाजी ग्रंथ ज्ञानदेवी । एकतरी ओवी अनुभवावी" म्हणणारे नामदेव प्रत्यक्ष कार्य करणारे कवी होते म्हणून त्यांचे कीर्तन यशस्वी ठरले.

नामा वाळुवंटी कीर्तन करी, त्यावेळी सुंबाचा करदोडा नि रकट्याची लंगोटी ल्यालेला असे. त्याच्या कीर्तनाला पांडुरंग येऊन बसे इत्यादी वर्णन नामदेवकालीन जनाबाई करतात. हे अत्यंत अर्थपूर्ण आहे.

नामदेवांचे साधेपण नि कीर्तनप्राविण्य तर येथे प्रकट झालेले आहेच पण नामदेवांनी कीर्तन बंदिस्त जागेतून जनताजनार्दनासासाठी मोकळ्या वातावरणात आणले आणि क्रांती केली, हेही जनाबाईंना म्हणायचे आहे. अन्यही बहुतेक सर्व वारकरी संतांनी नामदेवांच्या या ऐतिहासिक कीर्तन कार्याचा मुक्तकंठाने गौरव केलेला आहे.

नामदेवांच्या नंतर एकनाथ, तुकाराम, निळोबा इत्यादी सर्व लहानथोर वारकरी संतांनी कीर्तन कलेच्या हरिभक्तीबरोबरच जनशक्ती जागविण्याचे थोर कार्य केले. वेदान्तदर्शन आणि भगवद्भजन यांचा मेळ घालीत "नीती" हा खरा धर्म कसा हे सामान्यांना समजावून सांगितले. आज खेडोपाडी जी माणुसकी दिसते, ती संतकीर्तनकारांच्या कीर्तन-लोकशिक्षणकार्यामुळे शिल्लक राहिलेली आहे, असे म्हटले तर वावगे ठरू नये.

**रामदासी कीर्तन**

नारदीय कीर्तनाला अधिक जनाभिमुख नि प्रभावी करीत बहुजनांचा उद्धार करण्याची वारकरी भक्त-भागवतांची किमया अन्य संप्रदायांनाही आकृष्ट करणारी ठरली तर नवल नाही, याचे ठळक उदाहरण म्हणजे समर्थानुयायी रामदासी पंथाचे देता येईल.

बहुतेक वारकरी संत प्रापंचिक होते. संसार आणि भक्तिसाधना, प्रपंच आणि परमार्थ, आत्मोन्नती आणि लोकजागृती यांसाठी जीवन वाहणारे होते. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात हिंदवी स्वराज्यात अथवा शिवशाहीत वावरणाऱ्या समर्थ रामदासांना हरिकथा निरुपणाबरोबरच राजकारणाचे आणि ऐहिक जीवनाचे, प्रपंचाचे वास्तव नि महत्त्व पटवून देत जनसंघटन करायचे होते. विशेषेकरून क्रियानष्ट झालेल्या प्रतिष्ठित वर्गाला जनकार्यात सक्रिय करावयाचे होते. त्यासाठी त्यांनी वारकरी कीर्तन पद्धतीला स्वत:चा एक नवा घाट दिला असे दिसते.

रामदास परंपराप्रिय होते. त्यांनी पुन्हा एकदा कीर्तनाला नारदीय रीतीजवळ आणले. पारंपारिक पोषाख पुन्हा आला. मुख्य म्हणजे बंदिस्त जागेत बुवांनी ''रामदास कृपासिंधु हो ऽ'' चा गजर करीत पूर्वरंग उत्तररंग रंगवीत ''जय जय रामकृष्ण हरी'' या सर्वसमावेशक मंत्राऐवजी ''श्रीराम जय राम जय जय राम'' या रामभक्तिपर मंत्रावर भर द्यायचा असे सुरू झाले.

**संतांचा कीर्तन विचार**

''तरी कीर्तनाचेनि नट नाचे। नाशिले व्यवसाय प्रायश्चितांचे। जें नामाचें नाहीं पापांचे। ऐसे केले।।'' अशा शब्दांत संत ज्ञानदेवांनी आपल्या गीताभाष्यात नामस्मरण, नर्तन आणि कथन हे कीर्तनाचे तीन महत्त्वाचे घटक सांगितले. पुढे जवळपास ३८२ अभंग नामभक्तीविषयक लिहून संत नामदेवांनी ''आकारला देव नामरुपा आला। म्हणोनि स्थापिला नामवेदीं।।'' अशी नामकीर्तनाला विशेष प्रतिष्ठा दिली. त्यांचे म्हणणे आहे :

*कीर्तनाच्या सुखें सुखी होतो देव।*
*कोणते वैभव वाणी आतां।।*
*अंत्यज आणि जातिवंता।*
*मुखीं नाम घेतां उठी घाली।।*

यातील तिसरा चरण लक्षणीय आहे. समाजातील सर्वांना बरोबर घेऊन जावे, हा नामदेवांचा ध्यास होता. कीर्तन हे साधन होते.

ज्ञानदेवांनी श्रेष्ठ काव्य परतत्वस्पर्शी असते असे म्हटले होते. नामेदव दोन पावले पुढे निघाले. ''परेहूनि परते घर। तेथें नांदू निरंतर'' हा त्यांचाही अलौकिक ध्येयवाद होताच. पण ''सर्व सोडूनि माझाई। वाचे विठ्ठल रखुमाई'' अशी नामकीर्तनाची बैठक त्यांनी या परम आनंदाला दिली. आणि कीर्तन रंगीं नाचतांना ज्ञानदीप जगीं लावण्याचे ते विसरले नाहीत.

संत एकनाथांनी धर्ममार्तण्डांचा प्रसंगत: विरोध साहून परमार्थ सर्वांसाठी सोपा करण्यासाठी कीर्तने केले आणि भारुडे-गारुडेही सादर केली. ''कीर्तनी सांपडे देवो'' असे सांगून निराभिमानी वृत्तीने सज्जनवृंदांना वंदीत त्यांनी त्यांची पवित्र चरित्रें कीर्तनांतून सादर करण्याचा कीर्तनकारांना संदेश दिला.

तुकोबाराय भागवतधर्माचे प्रभावी प्रवक्ते. त्यांनी कीर्तनांतून बहुजनांच्या धर्मश्रद्धेला विशुद्ध

बैठक तर दिलीच पण धर्मरक्षणाबरोबरच खऱ्याखोट्याचा निवाडा, गुणपूजा, पाखंडाचे खंडन यावर भर दिला.

"जेथे कीर्तन करावें तेथे अन्न न सेवावे। तुका म्हणे द्रव्य घेती देती तेही नरका जाती" असा इशारा देऊन त्यांनी "कीर्तन चांग कीर्तन चांग। होय अंग हरिरुप" असा कीर्तन म्हणजे आत्मोद्धाराचा मार्ग त्यांनी मानला.

- या सर्व पार्श्वभूमीवर समर्थांचा कीर्तन विचार पाहण्यासारखा आहे.

**समर्थांचा कीर्तन विचार**

*मुख्य ते हरिकथा निरुपण।*
*दुसरे ते राजकारण।*
*तिसरे ते सावधपण।*
*सर्व विषयीं॥*

हा समर्थांच्या धर्मविचाराचा नि लोकजागरणाचा पायाभूत सिद्धान्त होता. किंबहुना धर्म आणि राजकारण यांच्या समतोलासाठीच हरिकथा कीर्तन केले पाहिजे, असा त्यांचा दृष्टिकोण असल्याचे दिसते.

आपल्या कीर्तनकार महंतांना त्यांनी आज्ञा दिल्या आहेत. तालसुराचे ज्ञान हवे, संस्कृत सुभाषिते तोंडी असावीत, वेदान्त दर्शनाचे ज्ञान पक्के असावे, इतिहासपुराणाची जाणकारी उत्तम करुन घ्यावी, प्रभावी बहुश्रुतपणा ठेवावा, असे ते वारंवार सांगतात.

दासबोधातील चौथ्या दशकात नवधा भक्तीचे स्पष्टीकरण करीत समर्थ हरिकथा कीर्तन भक्तीचे महत्त्व सांगतात. कीर्तन भगवंतास प्रिय शिवाय त्याने साधकाला समाधान मिळते. आणि "बहुजनासि उपाये। हरिकीर्तने कलयुगी" - कलियुगात कीर्तन हे लोकजागृतीचे प्रभावी साधन ठरणार अशी समर्थांची सांगी होती.

*सगुण हरिकथा करावी। भगवत्‌किर्ती वाढवावी।*
*अखंड वैखरी वदवावी। येथा योग्य॥*
*बहुत करावे पाठांतर। कंठीं धरावे ग्रंथांतर।*
*भगवत कथा निरंतर। करीत जावी॥*

असे कीर्तन करणारा हरिदास "सगुण कथा या नाव कीर्तन। अद्वैत म्हणिजे निरुपण" अर्थात पूर्वरंगात अद्वैत निरुपण आणि उत्तररंगात आख्यान वा सगुण संतचरित्र गाणारा असावा. ह्याचे वक्तृत्व उत्तम व्हावे म्हणून अनेक गुण त्याने मिळवावयास हवेत: विरक्त ज्ञाता, प्रेमळ भक्त, व्युत्पन्न आणि वादरहित पंडित, रागज्ञानी, तालज्ञानी, सकल कलांचा जाणकार, ब्रह्मविद्येचा ज्ञानी अशी अनेकानेक गुणांची एक भली मोठी यादीच समर्थांनी दिली आणि पुढे हरिकथा कीर्तनकाराचे ठळक वैशिष्ट्य नोंदविले आहे:

*निराभिमानें वर्ते जनीं। तरी हेहि अपूर्वता॥*
*मन ठेवून ईश्वरीं। जो कोणी हरिकथा करी॥*

*तोचि ये संसारीं धन्य जाणा ॥*

हरिदास कसा नसावा तेही समर्थ बजावतात. एखादा बळाने थोटा असलेला जर लढाईला जाईल तर तो मारच खाईल, हे ध्यानी धरून अर्धवट ज्ञानी हरिदासाने असू नये. ''स्वगोष्टीनें स्वगोष्टी पेंचली ऐसे न व्हावे'' आणि ''श्रोत्याने आशंका'' घेतल्यावर हरिदासाने ''तत्काळ ती फेडिली'' नाही असेही होऊ नये.

श्रोतेही विरक्त, गुणसंपन्न, सत्यवादी, बुद्धिमान, पवित्र, ज्ञानी, गुणग्राहक तपस्वी, मनस्वी, वेदज्ञ, शास्त्रज्ञ, आचारशील, सर्वज्ञ इत्यादी शंभर गुणांनी युक्त असावेत अशी समर्थांची अपेक्षा आहे.

''उदंड जेवून'' येणारे, ''निद्राभारें कडकडा जांभया'' देणारे ''बैंसताचि तृषाक्रांत'' होणारे, ''विषयी - बायकांकडे पाहणारे, पादरक्षा चोरून नेणारे, आपापसात सावकाश गोष्टी करणारे श्रोते नसावेत.

''पोटासाठी रें रें करणारे'' म्हणजे रटाळ कीर्तन करणारे हरिदास नसावेत, हेही समर्थ बजावतात. ''नित्य नवा हव्यास धरून'' साक्षेपाने कीर्तन केले जावे. ''जनांची लाज मानू नये'' आणि ''धनाची आस्था सांडून'' असावे.

*हरिकथा कीर्तने प्राणिमात्र सुशील होती ।*
*कीर्तने अवेग्रता घडे । कीर्तनें निश्चये सांपडे ॥*
*कीर्तने संदेह बुडे । श्रोतयावक्तयांचा ॥*
*म्हणोनि कीर्तनाचा । अगाध महिमा ॥*

- असा ''अगाध कीर्तन महिमा'' समर्थ रामदासांनी बारीकसारीक तपशिलासह स्पष्टपणाने मांडला. पण प्रत्यक्ष समर्थ सांप्रदायिक कीर्तनात फारच साचेबंदपणा दिसतो. समर्थांचा एक प्रमुख विचार जो ''मराठा तितुका मेळवावा'' हा सांप्रदायिक कीर्तनात ज्या रीतीने यायला हवा तसा ज्ञातिनिरपेक्ष स्वरूपात आलेला दिसत नाही. ''धनाची आस्था सांडण्या'' बद्दलही असेच म्हणता येईल.

**समर्थ कीर्तनपरंपरा**

समर्थसांप्रदायिक कीर्तन वारकरी कीर्तनाच्या तुलनेने पाहिले तर फारच चाकोरी बद्ध वाटते. रामदासी बुवा बऱ्याचवेळा पारंपारिक कीर्तनकारांचा पोषाख करून त्यावर भगवी कफनी परिधान करतात. काहीजण उत्तरेतील वैष्णव महाराजांप्रमाणे मानेवर गाठ मारलेले वस्त्र घालतात. जटाधारी बुवाही कपाळावर उभे गंध नि मधोमध बुक्का लावतात. झांज किंवा चिपळ्या घेऊन ''जय जय रघुवीर समर्थ'' असा रामनामाचा समर्थ सूचक गजर करून नमनाकरिता ''रामदास कल्याणा रामा हो जयरामा। पतितपावना। पूर्ण कामा हो॥'' हे पद घेतात. त्यानंतर पुन्हा समर्थांचा जयजयकार करून ''जगदुद्धारासाठी रामदास अवतरले आणि सज्जनगडावर राहिले. पायी खडावा चट्‌चट्‌ वाजवीत भक्तांसाठी धावले.'' अशाप्रकारचे रामदासांचे वर्णनात्मक गुणगायन करणारे पद भजनी धुमाळीत म्हटले जाते.

''श्रीराम जय राम जयजयराम'' या मंत्राची माळ ओढीत बहुतेक समर्थांचीच अभंगपदे उदाहरणादाखल घेतली जातात. पूर्वरंग हा समर्थांचे पद अथवा दासबोधातील ओव्या घेऊनच केला जातो. उत्तररंगात श्रीराम, हनुमंत, स्वत: समर्थ रामदास अथवा त्यांचे बंधु गंगाधर पंत, समकालीन शिष्या वेणाबाई - आक्काबाई यांची आख्याने लावली जातात.

मधून एकदा ''समर्थ सद्‌गुरु माझे आई। मजला ठाव द्यावा पायीं'' हे भजन म्हटले जाते. बोवांचा भर उपदेशातही गुरुशिष्य अनुबंधावरच जास्त राहतो.

शिवसमर्थ भेट हा एक रामदासी कीर्तनाचा महत्त्वाचा विषय असतो. भैरवीनंतर रामदासविरचित गणपतीची आरती, राम, हनुमान, समर्थ रामदास, गंगाधरपंत, कल्याणस्वामी यांच्या आरत्या होतात. मंत्रपुष्पांजली नंतर ''कल्याण करी देवराया'' ही समर्थकृत प्रार्थना होते. शेवटी पुन्हा समर्थचरित्रातील एखादी कथा सांगून कीर्तन संपते.

रामदासी बुवांची गुरुवारी गावात कोरडी भिक्षा मागण्याची व दक्षिणा घेण्याची, नदीवर स्नानसंध्या करण्याची प्रथा असते.

नारायणबुवा रामदासी, उद्धवबुवा रामदासी, कल्याणबुवा रामदासी, चिंतामणीबुवा इत्यादी कीर्तनकार या परंपरेत विशेष प्रसिद्ध आहेत.

**वारकरी आणि रामदासी**

वारकरी कीर्तनाची परंपरा किमान सात शतकांची आहे तर समर्थ सांप्रदायिक कीर्तन हे सतराव्या शतकाच्या उत्तरार्धातील आहे. समर्थभक्तही जनजागरणासाठीच कीर्तन करीत असले तरी ते जनता जनार्दनात अत्यंत प्रिय असणाऱ्या ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, बहिणाबाई इत्यादी कुणाही संताचे अभंग आपल्या निरुपणासाठी घेत नाहीत. किंबहुना आपल्या कीर्तनात जास्तीत जास्त भर समर्थ रामदास स्वामींचे ध्येयवादी जीवन, काव्य, कीर्तन, चरित्र, शिष्य-शिष्या यांवरच देतात.

यामुळेच बहुधा वारकरी कीर्तनकारही आपल्या कीर्तनात रामदासांना वर्ज्य करतात. ज्ञानदेव ते निळोबाराय अशा सुमारे सहाशे वर्षांच्या काळातील अनेक लहानथोर वारकरी संतांचे अभंग उदाहरणादाखल घेतात. ज्ञानेश्वरी, अनुभवामृत, चांगदेवपासष्टी, नामदेवगाथा, एकनाथी भागवत, तुकारामगाथा इत्यादी प्रचंड संत वाङ्मय वारकरी कीर्तनात उपयोजिले जाते. या कीर्तनाला सामूहिक स्वरूप असल्यामुळे निरुपणकार, वीणाधारी, टाळकरी इत्यादी चाळीस पन्नास व्यक्तींचा त्यात सहभाग असतो. श्रोतेही हरिनाम गजरात, अभंगगाण्यात सहज भाग घेत राहतात.

साऱ्यांचे मिळून नाचणे, गाणे, नाना प्रकारचा भगवत् नामघोष आणि ''ज्ञानबा तुकाराम'' असा सर्व वारकरी सत्पुरुषांचा प्रातिनिधिक संतगौरव कीर्तनात सहजी केला जातो. एकप्रकारे प्रमुख वक्ता श्रोता नि एकूण जनसमाज यांची सर्वार्थाने जवळीक किंवा मनोयोगपूर्वक समावेशन वारकरी कीर्तनात साधत असते.

जातजमात मानू नये, मानवतावादी दृष्टी उच्चार-विचार-आचारात बाणवावी यांकडे वारकरी

कीर्तनात विशेष लक्ष पुरवितात.

वारकरी कीर्तनात काळाच्या ओघात नवनवा बाजही येत गेलेला दिसतो. नाथांनी सगुणचरित्रांच्या आख्यानांना महत्त्व आणले. तुकोबारायांनी टाळकऱ्यांना अधिक सामावून घेतले. मौखिक पठडीवर जोर देत टाळकरीही क्रमाक्रमाने कीर्तनकार कसे होतील हे पाहिले.

वारकरी कीर्तनकारांनी नेहमी सामाजिक आशय विभूतिपूजेपेक्षा महत्त्वाचा मानला. गावोगाव नाम सप्ताह, संतांच्या ग्रंथांचे सामूहिक पारायण यांना सदैव प्रोत्साहित केले.

या कीर्तनातील चाली देखील लोकलयींवर आधारित असतात. वीणा, पखवाज, टाळ अशा साध्या पण जोरकस वाद्यावर भर राहतो.

जोगमहाराज, गाडगेमहाराज, कैकाडी महाराज, तनपुरे महाराज, मामासाहेब दांडेकर, धुंडा महाराज, बंकट स्वामी, दादामहाराज सातारकर, दादामहाराज मनमाडकर इत्यादी असंख्य अलिकडच्या जुन्या नव्या वारकरी कीर्तनकारांनी विविध प्रयोग करीत मराठी संतवाङ्याचा समृद्ध वारसा केवळ टिकविला असेच नाही तर तो सतत जनताजनार्दनापर्यंत पोहोचविला. त्यांच्या मनीमानसी तो मुरविण्याचा यशस्वी प्रयत्न केला.



# समर्थ रामदास आणि संत तुकाराम ८

भिन्न प्रकृतीच्या दोन थोर व्यक्तींची तुलना अवघड असली तरी ती उपयुक्त ठरते; मात्र ती श्रेष्ठकनिष्ठता दाखविण्यासाठी केली जाऊ नये.

तुकोबांनी तत्कालीन राजपुरुषांशी विशेष मैत्री केली नाही की, अन्य समाजपुरुषांशी संघर्ष केला नाही. तळागाळापर्यंत पोहोचलेल्या वारकरी भक्त भागवतांना मेघवृष्टीने हितोपदेश करीत त्यांनी लोकोद्धाराचे व्रत सांभाळले.

समर्थांनी द्रष्टेपणाने स्वकीय परकीय शक्तींचा शोध घेत आपल्या समाजाचे संघटन आपल्या परीने केले. मठस्थापना करून आणि प्रतिष्ठित वर्गातील नैराश्य दूर करून त्यांना शिवरायांच्या स्वातंत्र्य लढ्याशी निगडित करण्याचा हेतुपुरस्सर प्रयत्न केला.

निवृत्तिपरता आणि सक्रियता, विरक्ती आणि विजिगीषु वृत्ती, साधना आणि सावधानता, प्रयत्न आणि विवेक अशा विविध गुणांची विधायकपणे सांगड घालीत आपल्या महाग्रंथाच्या रुपाने जीवन व्यवहाराचे एक तेजस्वी तत्त्वज्ञान त्यांनी स्वकीयांसमोर ठेवले.

एकाच काळात एकामागोमाग एक होऊन गेलेल्या या दोन महापुरुषांचे जीवनकार्य आजही प्रेरक वाटावे असे आहे.

## संतांची वाटणी

भाषिक, प्रांतरचनेनंतर आज त्या त्या भाषेत रचना करणारे संत त्या प्रांतांचे असे सोईस्करपणे समजले जाऊ लागले आहे. त्यामुळे आपल्याला बसवेश्वर कर्नाटकाचे तर ज्ञानदेव, नामदेव महाराष्ट्राचे वाटतात. संतांनी प्रांतभाषा यांच्या सीमा कधीच मानल्या नाहीत. मराठी संतांनी तर महाराष्ट्र भाषेबरोबर राष्ट्रभाषेतही आपल्या रचना केल्या आहेत. रामदास आणि तुकाराम यांचीही हिंदी रचना उपेक्षणीय नाही.

संतांची पंथवार वाटणीदेखील काटेकोरपणे केली जाते. कुणाला ज्ञानदेव-नामदेव नाथपंथीय वाटतात, कुणाला वारकरी वाटतात. तुकोबाराय वारकरी तर रामदास धारकरी वाटतात. खरे पाहता, कोणत्याही संताने एखाद्या पंथाचा स्वीकार केला असला तरी त्यांच्या ठिकाणी एकाच एक पंथाचा अभिनिवेश असा नाही. निदानपक्षी अन्य पंथांबद्दल अनादर तरी आढळत नाही. ज्ञानदेव-नामदेव हरिहरैक्यावर भर देतात. तुकोबा वैष्णवाची व्याख्या व्यापक करतात.

रामदासही 'विठोने शिरी वाहिला देवराणा' म्हणत पंढरीरायात प्रभु श्रीरामही पहातात. त्याच्याशी संवाद साधतात. असे दाखले कमी असतील; पण ते आहेत. ते शोधून आपण संतांच्या सर्वेश्वरपूजनाचे मर्म जाणून घ्यायला हवे.

समर्थ रामदास आणि संत तुकाराम यांचा काळ एक. पण पंथ वेगळे, उपास्य वेगळे. ज्या जनांची त्यांनी मने जागविली ती मने खचितच वेगळी नव्हती. पण जनांची वेगळीक मात्र आज विशेषत्त्वाने जपली जाते, हे चित्र स्पृहणीय नाही. यासाठी संतांची अधिक वाटणी होऊ न देता त्यांना त्या त्या काळी आपापल्या प्रकृतिधर्माप्रमाणे काय काय वाटते, त्यातील कोणता भाग संवादी आहे त्याचा शोध घेणे आवश्यक ठरते. अन्यथा संतसाहित्य ही सामाजिक परिवर्तनाची शक्ती न राहता इतर विभाजनवादी प्रवृत्तींप्रमाणे तीही एक चिंतेची बाब होऊन बसेल.

## तुलनेचे प्रयोजन

संत तुकाराम आणि समर्थ रामदास हे जरी एकाच काळातील सत्पुरुष असले तरी त्यांचे उपासना संप्रदाय भिन्न आहेत. आराध्य वेगळे, पंथ निराळे, आचार-विचार नि कविस्वभावातही अंतर - मग तुलना कशी नि कशासाठी करावी? केवळ अभ्यासासाठी करायची हे एकच उत्तर देता येईल.

तुलनात्मक अध्ययनामुळे विश्लेषण अधिक स्पष्टपणे करणे शक्य होते. ज्यांची तुलना करावयाची त्यांचे योग्य ते महत्त्व एकदा ध्यानी घेतले की, आग्रह कमी होऊ शकतात. पूर्वग्रह असतील तर ते दूर होण्याची शक्यता राहते आणि अशा अभ्यासाने मूळ विषयाचे आकलनही अधिक नेमके होऊन आस्वाद सुकर होऊ शकतो.

ज्या दोन व्यक्तींच्या तात्त्विक भूमिकेत समानता आहे आणि त्यामुळे त्यांच्यातील साम्यस्थळेच अधिक आढळून येतात, त्यांची तुलना करणे सोपे असते. पण भिन्नप्रकृतीच्या व्यक्तींची तुलना अवघड असली तरी उपयुक्त ठरते. मात्र अशा तुलनेतून श्रेष्ठकनिष्ठता दाखविली जाऊ नये. तुलनीय व्यक्तींचे वेगळेपण अवश्य स्पष्ट केले जावे. महत्त्वमापनही व्हावे.

असा विधायक हेतू ठेवून आपण संत तुकाराम महाराज आणि समर्थ रामदास यांचा तुलनात्मक विचार पुढे करावयाचा आहे.

## तुकोबांचे वेगळेपण

भागवतधर्ममंदिराचे कलश म्हणून संत तुकारामांचा गौरव त्यांची शिष्या बहिणाबाई हिने केलेला आहे. अभंग कीर्तनाच्या माध्यमातून सामाजिक विषमतेवर कोरडे ओढीत तुकोबारायांनी बहुजनांना परोपरीने जागविले. ते म्हणत : ज्यांना गुणांची पारख नसते, अंतरंगाची ओळख नसते आणि खऱ्या खोट्याची चाड नसते अशा मंडळींचे मोठेपण काय कामाचे? म्हणून अशा मंडळींची तमा न बाळगता समताप्रेमी भक्तिपंथाची कास धरावी आणि डोळसपणे आपापले कर्तव्यकर्म करीत मानवी जीवनाचे सार्थक करावे अशी तुकोबांची शिकवण आहे. दुष्ट दुर्जनांना दयामाया न दाखविणे, प्रसंगी नाठाळांच्या माथी काठी उगारणे आणि भेदाभेद

अमंगळ मानून सच्च्या वैष्णवधर्माचा आचारविचार करणे त्यांना महत्त्वाचे वाटते.

तुकाराम वारकरी सांप्रदायातील एक मातब्बर नेते होते. साक्षात्कारी संत होते. प्रतिभासंपन्न कवी होते. प्रभावी कीर्तनकार होते. पण त्यांनी केवळ महाराजी मोठेपण मिरविले नाही. संत नामदेवाप्रमाणे ते कृतिशूर मिशनरी आहेत. कष्टकरी बहुजनांनी हरप्रकारे केविलवाण्या जिण्यापासून परावृत्त व्हावे आणि दारिद्रय नि अज्ञान यावर मात करीत त्यांनी उच्चविचारसरणीही स्वीकारावी यासाठी तुकोबाराय झटत राहिले.

तुकोबांनी तत्कालीन राजपुरुषांशी विशेष मैत्री केली नाही की अन्य समाजपुरुषांशी संघर्ष केला नाही. त्यांच्यामागे तळागाळापर्यंत पोहोचलेला विशाल वारकरी समाज होता. वारीची सामूहिक साधना करणारे भक्तभागवत होते. तुकारामांनी तात्त्विक संघर्षापेक्षा बहुजनांचे जागरण महत्त्वाचे मानले. यासाठी ते मेघवृष्टीने उपदेश करीत, पंढरीरायाच्या प्रेममय भक्तिसुखाचा दिलासा देत राहिले.

*धर्माचे पाळण । करणे पाखांड खंडण ॥*
*हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥*

असा बोधोद्धाराचा प्रबळ स्वर त्यांच्या अभंगातील शब्दाशब्दात भरून राहिला आहे.

**समर्थांचे सामर्थ्य**

समर्थ उच्चकुलीन ब्राह्मण होते. सहज मिळालेल्या जन्मजात प्रतिभेच्या आधारे राहून पोटापुरते पुजारीपण वा पौराहित्य करणाऱ्यांचे वारसदार व्हावे असे त्यांना वाटले नाही. शास्त्रज्ञानाच्या जोरावर आपापले आखाडे मजबूत करावे आणि बौद्धिक आनंद प्रतिष्ठेत रममाण व्हावे असाही मोह अन्य स्वबांधवांप्रमाणे त्यांना झाला नाही. त्यांनी द्रष्टेपणाने स्वकीयपरकीय शक्तींचा शोध घेतला. आपल्या समाजाचे संघटन आपल्या परीने आरंभिले.

मठस्थापना करून आणि प्रतिष्ठित वर्गातील नैराश्य दूर करून त्यांना शिवाजीराजांच्या स्वातंत्र्यचळवळीशी निगडित करण्याचा हेतुपुरस्सर प्रयत्न हे समर्थकार्याचे सर्वाधिक महत्त्वाचे वैशिष्ट्य ठरले.

समर्थपूर्व मराठी संत परंपरेने प्रपंचच परमार्थमय करावा आणि मानवीजीवनाचा सदुपयोग करावा अशी सांगी सातत्याने सांगितली. समर्थांनीही हरिकथा निरुपणाला रामकथेची जोड देत भक्तिपंथानेच सज्जनांनी जावे असा सांगावा दिला. पण त्याबरोबर प्रपंच कसा नेटका करावा याचा बारीकसारीक तपशीलही सांगितला.

निवृत्तिपरता आणि सक्रियता, विरक्ती आणि विजिगीषुवृत्ती, साधना आणि सावधानता, प्रयत्न आणि विवेक अशा विविध गुणांची विधायकपणे सांगड घालीत समर्थांनी एक तेजस्वी तत्त्वज्ञान स्वबांधवांसमोर ठेविले. वीरवृत्तीने जे परकीयांचा प्रतिकार करीत होते त्यांना प्रोत्साहन दिले. शास्त्रज्ञानी विद्या विभूषित जनांनाही स्वकर्तव्याची जाणीव करून देऊन त्यांनी विधायक चळवळीचे बळ ओळखावे अशी हाक दिली.

.. अशा प्रकारे कालमान परिस्थितीनुरुप हरिकथा निरुपण करणारे समर्थ रामदास हे

अपवादात्मक संत ठरतात.

संत तुकाराम आणि समर्थ रामदास या दोहोंचे जन्मवर्ष योगायोगाने एकच आहे. सन १९०८. दोहोंचे बालपण खेड्यात गेले. कारणे भिन्न असली तरी दोहोंनी आपल्या भक्तिभावनेचा आरंभ बालवयातच आणि तोही आत्मिक प्रेरणेनेच केला.

तुकोबारायांच्या घरचा व्यापारधंदा मोठा. सावकारीही चांगली चाले. जेव्हा नैसर्गिक आपत्ती आल्या तेव्हा उभा व्यवसाय कोसळला. दिवाळं वाजलं. नात्यागोत्याचा नि मित्रमंडळींचाही वाईट अनुभव आला. त्यात पत्नी आणि मुलगा अन्नान्नदशा होऊन गेली. वहिनी गेली. कर्तासवरता मोठा भाऊ विरक्त होऊन परागंदा झाला. तुकोबा सर्वार्थाने एकाकी झाले. 'दु:ख बांदवडी हा संसार। सुखाचा ठाव कोठे नाहीं।' हा संसारप्रपंचाचा विदारक अनुभव घेऊन 'वेढियलो अंतर्बाह्यात्कारी' अशा निराश मनाने तुकोबा विठोबाला शरण आले, 'रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग। आंतर्बाह्य मन आणि जग' अशा संघर्षशील क्षणी ते परमार्थाकडे वळले. 'भेटीलागी जीवा लागलीसे आस' अशा उत्कट वृत्तीने देवाचा धावा करू लागले. एकांतातील उग्र तपाचरणाने त्यांनी आत्मविश्वास मिळविला. विधिवत् गुरुदीक्षा, सत्पुरुष सहवास मिळाला नाही. तरी स्वप्नोपदेश लाभून ते परमार्थ प्रवासात यशस्वी झाले. 'अणुरणिया थोकडा। तुका आकाशाएवढा॥'' अशा महत्पदाला जाऊन पोहोचले.

समर्थांचे बालपण सुविद्य परिवारातील सुसंस्कारात गेले. ते बालवयापासूनच 'चिंता करितो विश्वाची' अशा उदात्त भावनेने विचारशील होते. तत्कालीन प्रथेप्रमाणे बालवयातच - बाराव्यावर्षी त्यांचे लग्न लावण्याचा सोहळा त्यांच्या पालकांनी आरंभिला तेव्हा 'सावधान' होऊन ते बोहल्यावरूनच निघाले. आणि आत्मारामाचा शोध घेण्याची विलक्षण प्रतिज्ञा करून त्यांनी कठोर साधना सुरू केली. अखंड बारा वर्षे टाकळीला दक्षिणगंगेच्या प्रवाहात अद्भुत रीतीने तपाचरण केल्यानंतर त्यांना भगवंताचा साक्षात्कार झाल्याचे सांगतात. त्याचवेळी त्यांना जनांना उपदेश करता आला असता पण देशस्थितीचे अवलोकन करून काही निश्चित घडवावे अशा जिद्दीने बारा वर्षे त्यांनी भारतभ्रमण केले. अस्मानीसुलतानी अनुभवून ते कृष्णातटी परतले. महाराष्ट्राच्या विशिष्ट भागात आपली कर्मभूमी निश्चित करण्यासाठीही त्यांनी बारा वर्षे पदयात्रा केल्या. अकरा मारुतींची स्थापना केली. अनेक शिष्यमहंत मिळविले. त्यांना तयार केले. 'सामर्थ्य आहे चळवळीचे जो जो करील तयाचे' हा त्यांचा स्वानुभव आहे. 'मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्र धर्म वाढवावा' हा त्यांनी दृष्टीपुढे ठेविलेला जीवनमंत्र होता.

१६०८ ते १६५० अशी बेचाळीस वर्षांची तुकोबारायांची जीवनयात्रा. अगदी बालवयापासूनच जीवनसंघर्ष झेलीत अखेरपर्यंत ते 'सेवितो हा रस। वाटितो अनेका' अशा उदात्त वृत्तीने क्रियाशील राहिले. त्यांनी तळागाळापर्यंत पोहोचलेल्या वारकरी संप्रदायाशी, वारीच्या सामूहिक साधनेशी जवळीक ठेवून बहुजनांचे आत्मबळ वाढविले. 'आम्हां हे कौतुक जगा द्यावी नीत' याचबरोबर 'करावे फजीत चुकती ते' अशा जिद्दीने आणि

'धर्मरक्षावयासाठी। करणें अटी आम्हासी' अशा ध्येयवादाने ते आपल्या अभंगवाणीने जनमनजागरण करीत राहिले.

समर्थांनी हेतुपूर्वक परमार्थपथावर पाऊल ठेवले. नंतर सुमारे ३६ वर्षे केवळ साधना आणि योजनापूर्वक ध्येयनिश्चिती यासाठी त्यांनी वेचली आहेत. त्यानंतर सुमारे २५ वर्षे त्यांनी समाजसंघटन आणि विशिष्ट पद्धतीने, शिस्तीने आपल्या स्वतंत्र संप्रदायाची जडणघडण करण्यासाठी वेचली आहेत. त्यांनी स्वत: प्रपंच केला नाही. एकप्रकारे ध्येयपूर्तीसाठीच ब्रह्मचर्यव्रताचे पालन केले आणि सांसारिकांना सूक्ष्म दृष्टीने समजावून घेऊन प्रपंचविज्ञानाचा अमर ज्ञानकोश शोभावा असा एक महाग्रंथ त्यांनी सर्वांपुढे ठेविला. त्यांची प्रचंड स्फुटरचना हा हितोपदेशाचा अखंड धबधबा आहे. त्यांनी योजनापूर्वक उभारलेली मठमंदिरे आणि त्यायोगे साधलेले कार्य हे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासातील अतुलनीय अशा ज्ञानपीठांचे यश आहे. ते जरी विशिष्ट वर्गाशी निगडित राहिले असले तरी त्यायोगे एकूण समाजाला स्वात्मतेजाचे प्रेरक दर्शन घडले हे एक ऐतिहासिक सत्य आहे.

**काही भिन्नता**

'गुरु तो सकळांसी ब्राह्मण। जऱ्हीं तो जाण क्रियाहीन।' - समर्थांचे हे वचन तत्कालीन वारकऱ्यांना मान्य होण्यासारखे नव्हते. आज तर ते धारकऱ्यांनाही मान्य होऊ नये.

'सकळांसि पूज्य ब्राह्मण' हीच प्रमाण वेदाज्ञा आहे. ब्राह्मण म्हणजे मूर्तिमंत वेद। तोचि भगवंत।' ब्राह्मण पूजनें वृत्ती शुद्ध होतात.' किंवा 'ब्राह्मणतीर्थे उत्तम गती। पावती प्राणीं।। (दासबोध: ५/१/६-१०-१२) ही सारी समर्थ-वचने एक प्रकारे 'ब्राह्मण्य रक्षावें आदरें' या त्यांच्या विचारसरणीचा हिरीरीने पुरस्कार करणारी ठरतात. भक्तीच्या क्षेत्रात समतेचा पाठपुरावा करीत 'यारे यारे अवघे जन' अथवा 'भेदाभेद सारे अमंगळ' म्हणणाऱ्या वारकरी संतांपेक्षा हे खचितच वेगळे म्हणणे आहे. समर्थांनी ज्ञानवंतास, व्यासंगी अन् विशुद्ध आचरणी व्यक्तीलाच ब्राह्मण मानले असे काही प्रमाणात प्रमाणित करता येईल, परंतु समर्थ, तुकोबारायांच्या तुलनेने पाहता प्रतिगामी होते हे नाकबूल करण्यात काय हंशील आहे ?

ज्ञानी, विचारवंत ब्राह्मण हेच साऱ्या समाजाला गुरुस्थानी असावेत. इतरांनी कितीही सत्संग, व्यासंग केला तरी त्यांची बरोबरी परंपरेने ज्ञानसाधना करीत आलेल्यांशी होऊ शकणार नाही अशी समर्थांची थोडी एकांगी वाटेल अशी, पण निश्चित विचारसरणी आहे. त्यांच्या काळाच्या विशिष्ट संदर्भात तिचा मागोवा घेतला की समर्थांची भूमिका समजावून घेणे शक्य होते.

समर्थ हे स्वत: उच्चवर्णीय ब्राह्मण. त्यांचे संस्कार त्या वर्गाचे. त्यांनी स्वेच्छेने साधना स्वीकारून एक प्रकारच्या आत्मप्रेरणेनेच देशयात्रा केल्या. येथील बहुजनांवर सर्रास अत्याचार करणारे क्रूर शासक पाहिले. त्यांची असहिष्णुता आणि विलासिता ध्यानी घेतली. अशा अन्यायी वृत्तीच्या परकी आक्रमकांशी इमानेइतबारे वागणारे एतद्देशीय योद्धे पाहिले. त्यांची करंटी निष्ठा नि देशबुडवेपणा त्यांना साहविला नाही कारण मुळात समर्थ 'सज्जन मनाने

'धर्मरक्षावयासाठी। करणें अटी आम्हासी' अशा ध्येयवादाने ते आपल्या अभंगवाणीने जनमनजागरण करीत राहिले.

समर्थांनी हेतुपूर्वक परमार्थपथावर पाऊल ठेवले. नंतर सुमारे ३६ वर्षे केवळ साधना आणि योजनापूर्वक ध्येयनिश्चिती यासाठी त्यांनी वेचली आहेत. त्यानंतर सुमारे २५ वर्षे त्यांनी समाजसंघटन आणि विशिष्ट पद्धतीने, शिस्तीने आपल्या स्वतंत्र संप्रदायाची जडणघडण करण्यासाठी वेचली आहेत. त्यांनी स्वत: प्रपंच केला नाही. एकप्रकारे ध्येयपूर्तीसाठीच ब्रह्मचर्यव्रताचे पालन केले आणि सांसारिकांना सूक्ष्म दृष्टीने समजावून घेऊन प्रपंचविज्ञानाचा अमर ज्ञानकोश शोभावा असा एक महाग्रंथ त्यांनी सर्वांपुढे ठेविला. त्यांची प्रचंड स्फुटरचना हा हितोपदेशाचा अखंड धबधबा आहे. त्यांनी योजनापूर्वक उभारलेली मठमंदिरे आणि त्यायोगे साधलेले कार्य हे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासातील अतुलनीय अशा ज्ञानपीठांचे यश आहे. ते जरी विशिष्ट वर्गाशी निगडित राहिले असले तरी त्यायोगे एकूण समाजाला स्वात्मतेजाचे प्रेरक दर्शन घडले हे एक ऐतिहासिक सत्य आहे.

**काही भिन्नता**

'गुरु तो सकळांसी ब्राह्मण। जर्‍हीं तो जाण क्रियाहीन।' - समर्थांचे हे वचन तत्कालीन वारकऱ्यांना मान्य होण्यासारखे नव्हते. आज तर ते धारकऱ्यांनाही मान्य होऊ नये.

'सकळांसि पूज्य ब्राह्मण' हीच प्रमाण वेदाज्ञा आहे. ब्राह्मण म्हणजे मूर्तिमंत वेद। तोचि भगवंत।' ब्राह्मण पूजनें वृत्ती शुद्ध होतात.' किंवा 'ब्राह्मणतीर्थे उत्तम गती। पावती प्राणीं॥ (दासबोध: ५/१/६-१०-१२) ही सारी समर्थ-वचने एक प्रकारे 'ब्राह्मण्य रक्षावें आदरें' या त्यांच्या विचारसरणीचा हिरीरीने पुरस्कार करणारी ठरतात. भक्तीच्या क्षेत्रात समतेचा पाठपुरावा करीत 'यारे यारे अवघे जन' अथवा 'भेदाभेद सारे अमंगळ' म्हणणाऱ्या वारकरी संतांपेक्षा हे खचितच वेगळे म्हणणे आहे. समर्थांनी ज्ञानवंतास, व्यासंगी अन् विशुद्ध आचरणी व्यक्तीलाच ब्राह्मण मानले असे काही प्रमाणात प्रमाणित करता येईल, परंतु समर्थ, तुकोबारायांच्या तुलनेने पाहता प्रतिगामी होते हे नाकबूल करण्यात काय हंशील आहे?

ज्ञानी, विचारवंत ब्राह्मण हेच साऱ्या समाजाला गुरुस्थानी असावेत. इतरांनी कितीही सत्संग, व्यासंग केला तरी त्यांची बरोबरी परंपरेने ज्ञानसाधना करीत आलेल्यांशी होऊ शकणार नाही अशी समर्थांची थोडी एकांगी वाटेल अशी, पण निश्चित विचारसरणी आहे. त्यांच्या काळाच्या विशिष्ट संदर्भात तिचा मागोवा घेतला की समर्थांची भूमिका समजावून घेणे शक्य होते.

समर्थ हे स्वत: उच्चवर्णीय ब्राह्मण. त्यांचे संस्कार त्या वर्गाचे. त्यांनी स्वेच्छेने साधना स्वीकारून एक प्रकारच्या आत्मप्रेरणेनेच देशयात्रा केल्या. येथील बहुजनांवर सर्रास अत्याचार करणारे क्रूर शासक पाहिले. त्यांची असहिष्णुता आणि विलासिता ध्यानी घेतली. अशा अन्यायी वृत्तीच्या परकी आक्रमकांशी इमानेइतबारे वागणारे एतद्देशीय योद्धे पाहिले. त्यांची करंटी निष्ठा नि देशबुडवेपणा त्यांना साहविला नाही कारण मुळात समर्थ 'सज्जन मनाने

भक्तिपंथेचि जाणारेच' होते आणि 'नाठाळ वृत्तीच्या सज्जनांना स्वकर्तव्याची जाणीव करून देण्यासाठी त्यांची स्थाने पुन्हा एकवार त्यांना दाखवून, एक हात पाठीवर आणि दुसरा हाती घेण्याचे व्यावहारिक कौशल्य त्यांनी दाखविले.

ज्या ज्ञातीचे प्रतिनिधी त्या ज्ञातीच्या अनेक परिवारांची झालेली वाताहत आणि हिंदूच्या राजकीय पराभवातून सर्वत्र आलेले दास्य त्यांना जाचू लागले तेव्हा प्रथम आपल्याच ज्ञातिबांधवांना प्रसंगी महत्त्व देऊन संघटित करावे. त्यांना देशकार्यासाठी उद्युक्त करावे, ब्राह्मणक्षत्रियांनी अर्थात सज्जन समर्थांनी अथवा बुद्धिवीर आणि युद्धवीर यांनी एकत्र येऊन काही अस्मिता व्यक्त करावी, हा समर्थांचा ध्यास दिसतो.

'ब्राह्मणस्थाने भ्रष्ट झाली' असे म्हणतांना आपली 'तीर्थक्षेत्रे मोडिली' आहेत ती पुन्हां 'मांडायला हवीत' आणि 'गेलेला धर्म' पुन्हा एकवार प्रतिष्ठित करायला हवा हा त्यांचा प्रांजळ प्रयत्न आहे. म्हणूनच 'ब्राह्मण बुद्धीपासून चेवले। आचारांपासून भ्रष्टले' असे ते म्हणू शकतात. 'आपण आरत्री ना परत्री। काहींच नाही।।' याची त्यांना मनस्वी खंत वाटते. (दासबोध १४.७/३१-३२-३६)

दासबोधाच्या उत्तरार्धात समर्थांनी आपले ब्राह्मण्य विषयक विचार अधिक विशाल दृष्टीने स्पष्ट केलेले आहेत. सतराव्या दशकाच्या पहिल्या समासात 'साधुसंत आणि सज्जन श्रोतेजनांना वंदून म्हटले आहे. ज्ञानसूर्य मावळला। तेणें प्रकाश लोपला। अंधकारें पूर्ण जाला। ब्रह्म गोळ अवघा। आत्मज्ञानाचा सूर्य जर मावळला तर ज्ञानप्रकाशच लोपतो. विश्वही अज्ञानांध:काराने व्यापते, जीवही आतबाहेर अज्ञानाने माखतो. ''नाहीं सत्वाचें चांदणें। कांही मार्ग दिसें जेणें।। सर्व भ्रांतिचेनि गुणें। आपेंआप न दिसे।।'' ज्ञान सूर्याचा प्रकाश नसला तर निदान सत्वगुणांचे चांदणे असावे. त्यायोगाने तरी थोडा मार्ग दिसेल. पण सर्वप्रकारे भ्रमांनी जीव वेढून गेला तर काहीच दिसत नाही. याच ओघात समर्थ स्पष्टपणे सांगून जातात.

*ब्राह्मणाचें ब्रह्म सोंवळें। शुद्राचें ब्रह्म तें वोवळें।*
*ऐसें वेगळें आगळें। तेथे असेचिना ।।*

तेराव्या दशकात पंचभौतिक दृश्य वस्तूत अंतरात्मा सर्वत्र भरून असला तरी तो सर्वठिकाणी समानपणे प्रकट होत नाही हा दृष्टिकोन तर्काने पटवून देतांना समर्थांनी ''मनुष्य आणि गधडे। राजहंस आणि कोंबडे। राजे आणि माकडे।' एक कैसी ?'' असा प्रश्न करून आपला उच्चनीचतेविषयींचा आंतरिक हेतू असा विशद केला आहे:

*भागीरथीचें जळ आप। मोरी संवदणी तें हि आप।*
*कुश्चिळ उदक अल्प। सेववेना ।।*
*याकारणें आचार शुद्ध। त्याउपरी विचार शुद्ध।*
*वीतरागी आणि सुबुद्ध। ऐसा पाहिजे ।।*

गंगेचे जल, मोरीतील वा कपडेधुण्यांतील सांडपाणी हे पाणीच. पण पाणी अशुद्ध असेल तर जरासुद्धा पिता येत नाही. शुद्ध आचार, शुद्ध विचार, अनासक्ती, शुद्ध बुद्धी असणारा

माणूस हा अन्य माणसांहून वेगळाच असतो. समर्थ त्याला श्रेष्ठ म्हणतात. उच्चकुलीन मानतात.

वस्तुत: ही मर्यादा त्या काळाची आहे. विद्याध्ययन मर्यादित माणसे करीत. जे स्वाध्यायाने आणि स्वतंत्र बुद्धीने विचार करीत त्यांनाही तत्कालीन परिभाषा स्वीकारावी लागली आणि श्रेष्ठ आचारविचारांचे प्रतिनिधी म्हणून ब्राह्मण शब्द वापरावा लागला.

तुकोबांच्या संदर्भात लिहायचे झाले तर त्यांनीही यातिहीनत्त्वाची खंत वारंवार व्यक्त केली आहे. त्याचप्रमाणे क्वचित ब्राह्मणश्रेष्ठत्वाचाही उच्चार केला आहे. असे उल्लेख तुकारामगाथेत आढळतात :

*'ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म ।*
*गंवसे परब्रह्म नामें एका ॥ (४३७९/शा.गा.)*
*ब्राह्मण तो याती अंत्यज असतां ।*
*मानावा तत्त्वता निश्चयेसीं ॥ (१२३५/शा.गा.)*

एके ठिकाणी ते म्हणतात 'जयासी नावडे हरिनामकीर्तन' तो ब्राह्मण नाही. 'ब्राह्मण तो नव्हे. ऐसी ज्याची बुद्धि। पाहा श्रुतीमधीं विचारूनि।

याच अभंगात 'सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार / मातेसी वेव्हार अंत्यजाचा॥ अशा ओळी येतात. (१२३४/शा.गा.)

समर्थांनी बहुजनांच्या भक्तिपथापासून अलग होऊन आपला स्वतंत्र पंथ निर्माण केला हे खरे. त्यासाठी त्यांना बहुश: त्यांच्याच ज्ञातिबांधवांनी साथ दिली. आजही हे चित्र प्राय: बदलले नाही,हे जरी खरे असले तरी, याचा दोष सर्वस्वी समर्थांना देता येणार नाही.

समर्थांनी विशिष्ट प्रकारे धर्मजागरण केले नसते तर प्रतिष्ठित वर्गाला - शिवरायांच्या स्वातंत्र्यकाळात सहभागी करून घेण्याचे दायित्व त्यांना यशस्वीपणे स्वीकारता आले नसते. आणि अशाप्रकारचे देशकार्य अन्य संतांच्या तुलनेने विचार करता समर्थांनाच करता आले, हे विसरून चालणार नाही.

समर्थांनी ज्या गावोगावी मठस्थापना केली ती बहुतेक ठिकाणे शिवरायांच्या हिंदवी स्वराज्यात बऱ्याच उशिरा आली. समर्थ-शिवयोग अभ्यासला तर हे स्पष्ट दिसते की, समर्थांनी कुठेही शिवरायांचा अवाजवी फायदा घेतलेला नाही.

'भिक्षापात्र अवलंबिणे जळो जिणे लाजिरवाणे' असा एक उद्गार तुकोबारायांचा आहे. त्यांनी आणि एकूणच वारकरी संतांनी कष्टकऱ्यांना, त्यांच्या उद्योग व्यवसायांना महत्त्व दिले. नित्याचा उद्योगच भक्तिभावाने करावा, किंबहुना प्रपंचच परमार्थमय करावा अशी या संतांची भूमिका आहे.

समर्थांनी आपल्या अनुयायी महंतांना भिक्षेचा एक नवा अर्थ सांगितला. ज्याने समाजाच्या योगक्षेमासाठी जगायचे त्याने भिक्षेचा संकोच मानू नये. उलटपक्षी भिक्षेवरच उदरनिर्वाह करीत साधी राहणी नि प्रत्यक्ष काही घडविण्यासाठी समाजाशी शक्य त्या सर्व उपायांनी मैत्री साधावी. भिक्षा हे जनांशी जवळीक साधण्याचे निमित्त मानावे अशी समर्थांची भूमिका

दिसते.

सावधानता नि साक्षेप, प्रयत्न नि विवेक हे समर्थांचे परवलीचे शब्द आहेत. हरिकथानिरुपणाबरोबर त्यांना पुरुषार्थ निरुपण करावयाचे होते म्हणून त्यांनी मर्यादा पुरुषोत्तमाच्या चरित्रचारित्र्याचे गुणगायन साक्षेपाने करीत आपल्या ज्ञातिबांधवांना सावध केले. त्यांच्या साऱ्या प्रयत्नांमागे विवेक आणि विचाराची विशिष्ट बैठक आहे आज जरी त्यांची सरणी प्रतिगामी वाटली तरी त्यांच्या काळाचा विचार करता ते पुरोगामीच होते.

तुकोबारायांनी भजनकीर्तनाचे पारंपारिक माध्यमच मुख्यत: आपल्या प्रबोधनकार्यासाठी वापरले. त्यांनी देहू-आळंदी-पंढरी पलिकडे फारशी यात्रा केल्याची प्रमाणे मिळत नाहीत.

समर्थांनी आपल्या कार्याचा आरंभ करण्याआधी विपुल देशाटन केले. आपल्या अनुयायांसाठी स्वतंत्र स्फूर्तिकेंद्रे उभी केली. कीर्तनप्रणालीलाही आपल्या संघटनात्मक आवश्यकतेप्रमाणे वेगळे वळण दिले.

सज्जनगडावर कीर्तनसंमेलने होत आणि त्यात विविध सांप्रदायिकांना एकत्र आणीत अशी माहिती समर्थसांप्रदायिक बखर चरित्रांतून मिळते.

तुकारामांचा जीवनकाल आणि रामदासांचा पूर्वजीवन काल हा जरी राजकीय दास्याचा असला तरी एकापरीने तो मराठी वाङ्मयाचा एक संपन्न काळ होता.

नाथांनी संपादिलेली प्रतिशुद्ध ज्ञानदेवी जनांपुढे होती. नाथभागवताच्या रुपाने ज्ञानदेवी वरील उत्तम भाष्यही होते. त्यांचे प्रेरक भावार्थ रामायण होते. मुद्गलाचे वीररसपूर्ण रामायणही होते. रघुनाथपंडितांसारख्या प्रतिभासंपन्न पंडिताची आख्यानकाव्ये आणि वामनपंडितासारख्या व्युत्पन्न भाष्यटीकाकारांची पांडित्यपूर्ण रचनाही याच काळची आहे.

या साऱ्या वैभवशाली सारस्वत मंदिरावर तुकारामांच्या अभंग संपदेने वाङ्मयीन गुणांचा कळस चढविला. प्रत्यक्ष जीवनसंघर्षाचे चित्रण करता करता त्यांनी अलौकिकाची आगळी वेगळी अनुभूतीही सहजपणे व्यक्त केली. 'बुडती हे जन न देखवे डोळा' अशी त्यांची उत्कट करुणा आहे. आणि 'सेवितो हा रस वाटितो अनेका' अशी त्यांची उदात्तमंगल भूमिका आहे. 'वेदांचा तो अर्थ आम्हासीच ठावा। इतरांनी वाहावा भार व्यर्थ' असा त्यांचा उदण्ड आत्मविश्वास आहे. 'मऊ मेणाहुनि आम्ही विष्णुदास। भले तरी देऊ कांसेची लंगोटी। नाठाळाच्या माथा देऊ काठी।' असा त्यांचा खाक्या आहे.

रामदासांचीही भूमिका समजाहिताचीच आहे. 'जे जे आपणांसी ठावे ते ते सकळांसी सांगून सकळ जनांना शहाणे करून सोडावे' अशी त्यांची प्रांजळ इच्छा आहे. हे करण्यासाठी त्यांनी मठ महंत तयार केले आणि त्यांना नानाप्रकारे समाजप्रबोधनाची दीक्षा दिली.

जनांशिवाय भजन नाही हे समर्थांनाही मान्य आहे म्हणूनच 'धेड महार किंवा चांभार। त्याचे राखावे अंतर। या नाव भजन' अशी व्यापक व्याख्या समर्थ सांगतात. बारीकसारीक नियमावली कथन करीत लोकाग्रणी कसा असावा, त्याची आचारसंहिता सिद्ध करतात.

समर्थांनी प्रपंच केला नाही पण प्रपंचविज्ञान दिले. 'परमार्थास मोडू नये प्रपंच बळे'

असे सांसारिकांना बजाविले. हरिकथानिरुपणाला प्राधान्य दिले पण राजकारण वा व्यवहारवादाचे महत्त्व परोपरीने स्पष्ट केले आणि हे सगळे करताना त्यांनी अक्षरश: प्रचंड रचना केली.

तुकारामांच्या अथवा समर्थांच्या आज उपलब्ध असलेल्या वाणीत काही परस्परविरोधी वचनेही आढळतात. एकतर दोहोंची कालमान परिस्थिती आणि जीवनप्रवास पुरेसा स्पष्ट नाही. शिवाय, या वाणीला अमाप जनप्रियतेतून अन्य संतसाहित्याप्रमाणेच श्रुतिसाहित्याचे रुप प्राप्त झाले आहे.

तुकारामांनी जशी मायमराठी शब्दकळेच्या आणि भावबळाच्या अंगाने समृद्ध केली तशी समर्थांनीही ती विचारधन आणि नवनवीन प्रयोगांच्या सामर्थ्यावर संपन्न केली.

दोहोंच्या वाणीत भरपूर आवृत्ती आढळते कारण, एकतर दोघेही कीर्तनकार होते. समर्थ बहुधा प्रवचनकारही असावेत. तुकारामांचा पंथ बरीच दीर्घ परंपरा असणारा; त्यामुळे इतर वारकरी संतांनी मांडलेले अनेक विषय त्यांनी स्वीकारले. समर्थांना तर नवा पंथच स्थापायचा होता. महंत घडवायचे होते. स्वाभाविकच ते आपले म्हणणे पटविण्या-ठसविण्यासाठी आवृत्ती हेतुपूर्वक करतात.

तुकोबारायांची काव्यरचना लौकिकातील दु:ख आणि अलौकिकाचे अनुपम सुख सांगण्यासाठी प्रबळ भावोद्रेक होऊन अवतरली तर समर्थ स्वभावत: कवी नाहीत. त्यांना बुद्धिचातुर्याने काही निश्चित विचार प्रकट करायचे आहेत. ते ठामपणे मांडून ठसवायचे आहेत. यासाठी गद्याजवळ जाणारी सहजसुलभ रचना करीत ते 'प्रसंगी अखंडीत वाचीत जावे' म्हणतात. 'दिसामाजी काहीतरी ते लिहावे' म्हणायला त्यांना संकोच नाही, कारण त्यांचा काव्यहेतूच जनजागरणाचा होता.

**उपसंहार**

वैयक्तिक जीवनातील दु:खातून विरक्ती आणि नंतर भक्तीकडे वळून ती भक्ती मुक्तीसाठी नव्हे तर सामाजिक शक्ती म्हणून कशी समर्थ ठरेल असा प्रयत्न करणारे तुकोबाराय हे बहुजन वारकऱ्यांना संतश्रेष्ठ वाटतात. ते भागवत धर्ममंदिराची पूर्ती करणारे पथदर्शक दीपस्तंभ ठरतात.

तुकोबारायांच्या पाठोपाठ मराठी भक्तिपरंपरेस एक वेगळे वळण देण्यास प्रवृत्त झालेले समर्थ रामदास आपल्या यशस्वी तप:साधनेनंतर उर्वरित जीवन योजनापूर्वक देशकार्यासाठी वेचतात. स्वकियांचे संघटन करीत त्यांना रामभक्तीबरोबरच रावणवधासाठी कटिबद्ध झालेल्या वीरांबरोबर जाण्यासाठी प्रवृत्त करतात. आपल्या महाग्रंथाच्या माध्यमातून समाजासमोर प्रपंचविज्ञानाचा ज्ञानकोश ठेवतात. शिवछत्रपतींच्या देशकार्यास पूरक ठरतील, असे विविध प्रयत्न करतात. हे विधायक राजकारण करताना हरिकथानिरुपण न सोडून अथवा भक्तिपंथानेच सज्जन-मनांनी जायला हवे हेही सांगतात.

श्री.रा.गो. काटे : 'संपूर्ण भूषण', भा.इ.सं. मंडळ, पुणे १९३०
प्रा.गं.बा. सरदार : 'तुकाराम आणि रामदास', 'नवभारत', फेब्रुवारी, १९५०
भा.पं. बहिरट : 'संतवाणीचा अमृतकलश', पंढरपूर संशोधन मंडळ, १९५५
प्रा.श्री. म. माटे : 'श्रीरामदास स्वामींचे प्रपंचविज्ञान', म.शा.परिषद, नागपूर. १९५६
श्री.पु.मं. काडः (सं) : 'श्रीतुकारामबाबांच्या अभंगांची गाथा', महाराष्ट्र शासन प्रकाशन पुनर्मुद्रण. १९७३
प्रा.के.वि. बेलसरे : 'सार्थ श्रीमत् दासबोध', श्रीसमर्थ सेवा मंडळ, सज्जनगड १९७५
डॉ.वि.रा. करंदीकर : 'संतपरंपरा आणि सांस्कृतिक प्रबोधन', शिवपार्वती प्रतिष्ठान, नाशिक १९८६
प्रा. नरहर कुरुंदकर : 'त्रिवेणी'

# समर्थ रामदास आणि छत्रपती शिवाजीमहाराज ९

---

**दासनवमीचा उत्सव प्रतिवर्षी सर्वत्र उत्साहाने साजरा होतो. बहुसंख्य ठिकाणी निष्ठावान समर्थभक्त एकत्र येतात. काही समर्थ वाङ्मायाभ्यासी त्यांच्याकडे येतात. ते समर्थांचे सामर्थ्य त्यांना कथन करतात. ज्यांना जे मान्य आहे त्यांना ते पुन्हा एकदा मान्य होते. हे चांगलेच असते. पण आज आवश्यकता आहे ती प्रत्येक संताचे कार्य, ऐतिहासिक संदर्भ ध्यानी घेऊन आणि समकालीन समस्यांचे भान ठेवून तपासून पाहाण्याची. त्यातून काही संवादी विशेष जाणून घेत आपापले आग्रह वा पूर्वग्रह कमी करण्याची.**

**प्रस्तुत निबंधात समर्थ रामदास आणि छत्रपती शिवाजीमहाराज यांच्यातील ऐतिहासिक अनुबंधाचा मागोवा घेऊन त्याचे मर्म स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे.**

---

### इतिहासाची पुनरावृत्ती

ज्ञानदेव-नामदेवांच्या काळात हजार वर्षांचे यादव हिंदूराज्य डबघाईला आले होते. आपापसातील यादवीमुळेच पाहता पाहता ते अस्ताला गेले. त्यानंतर दक्षिण भारतावर पन्नास वर्षे सुलतानी वर्चस्व राहिले. पुढे बहामनी मुसलमानी राज्य इथल्याच लढवय्यांच्या सहयोगाने उभे झाले. बहामनी सुलतानांचा अमंल दीडशे वर्ष चालला. पाच शाह्या झाल्या. अहमदनगर, विजापूर, गोवळकुंडा, बिदर, वऱ्हाड. यांची,आपापसात यादवी, जुलूम जबरदस्ती, रक्तपात सुरू राहिले. त्यातही क्रूर शासकांना एतद्देशियांचेच सहकार्य मिळाले. उत्तरेत दिनेइलाही अर्थात धर्म समन्वयाची कल्पना करणारी अकबरशाही आली. इस्लामी सत्ता देशभर त्याचवेळी दृढमूल झाली. तिलाही या देशातील शूरवीरांचेच सहकार्य मिळाले. या सर्व सुलतानी यादवीत दक्षिणेची लूट होत राहिली. बहुजनांचा आत्यंतिक छळ झाला. एक विजयनगरचा पुसट अपवाद वगळता क्रौर्य, अन्याय यांचा प्रतिकार असा यशस्वीपणे झालाच नाही.

या साऱ्या पंधराशे वर्षांच्या मानहानिकारक इतिहासाच्या पार्श्वभूमीवर जो समाजपुरुष खडबडून जागा झाला तो शिव समर्थांच्या आणि तुकारामांच्या रुपांमध्ये दिसतो.

### तीन महापुरुष

शिवाजीराजांना नेमकी प्रेरणा कुणी दिली याचे उत्तर देणे सोपे नाही. ती प्रेरणा कुणा एकाच व्यक्तीने दिली हे खरे नाही. पण जर कुणा व्यक्तिशक्तीचा उल्लेखच करायचा झाला तर

ती प्रेरणा मराठी संस्कृती घडविणाऱ्या संतपरंपरेची आहे. आणि त्यातल्या त्यात ती शिवरायांच्या समकालीन असणाऱ्या समर्थ रामदासांची आणि संत तुकारामांची आहे, असे मानावे लागते.

इ.स. १६०८ मध्ये जन्मलेले संत तुकाराम, रामदास आणि इ.स. १६३० मध्ये अवतरलेले शिवाजीराजे हे सतराव्या शतकातील तीन थोर समाजपुरुष आहेत. मुसलमानोत्तर महाराष्ट्राची जडणघडण करणारे युगनिर्माते आहेत.

तुकाराम आणि रामदास दोघांच्याही नावात ''राम'' आहे आणि त्यांच्या काव्यात नि कार्यात रावणवधाच्या प्रेरणा आहेत. समाजकंटकांचे निर्दालन करण्याची आणि नाठाळांना प्रसंगी काठ्या हाणून सरळ करण्याची शक्ती आहे. तुकारामांनी ''जोडोनिया धन उत्तम वेव्हारें। उदास विचारें वेंच करी'' हे सांगून संसार-प्रपंचही नीट करावा आणि भक्तीही साधावी असा संदेश दिला. अणूरेणूहून लहान तरी महान् होण्याची साधना कशी करावी, त्याचा वस्तुपाठ दिला.

समर्थ रामदासांची सारीच नीतीरीती निराळी होती. त्यांनी आपला स्वत:चा प्रपंचच केला नाही. लहानपणापासून विश्वप्रपंचाची चिंता केली. पुढे महाराष्ट्राचे आनंदवनभुवन होण्याचे स्वप्न आपल्यापरीने पाहात व्यवहारशास्त्राचे धडे सामान्यजनांना दिले आणि राजकारणाचे पाठ शासनकर्त्यांना देत प्रतिष्ठितांना जनआंदोलनाच्या प्रवाहाशी समरस करून सोडण्याचा प्रयत्न केला. उदंड देशाटनानंतर समर्थांना एकूण समाजस्थितीचे निदान झालेले होते. ते ज्या समाजस्तरातून आले होते त्यांनी नेमके काय करायला हवे याचे त्यांनी चिंतन केले. ''देवमात्र उच्छेदिला। आपुला स्वधर्म बुडविला।'' अशी सर्वत्र स्थिती असताना ''जित्यापरीस मृत्यु भला'' असे देवकारण आणि ब्रह्मकारण करणाऱ्यांनाही वाटत नाही हे पाहून ''पाहोनी ऊर फाटतो'' असे म्हणून त्यांनी कर्मयोगी वृत्तीने स्वबांधवांना साद घातली :

*भले कुळवंत म्हणावे। तेही वेगीं हजीर व्हावें।*
*हजीर न होतां, कष्टावें। लागेल पुढें॥*

- हा त्यांनी दिलेला इशाराच त्यांच्या कार्यपद्धतीचे स्पष्टीकरण करणारा आहे. ''धर्मसंस्थापनेसाठी देव तर मस्तकी धरावाच'' पण ''मुलुख बडवावा बुडवावा'' आणि त्याकरिता ''हलकल्लोळ करावा'' असा ध्येयवाद त्यांनी स्पष्ट केला. ''चळवळीचे सामर्थ्य'' सांगून ''मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्र धर्म वाढवावा'' हा कालानुरुप विचार दिला.

हे तीन महापुरुष एकमेकांना कुठे, केव्हा, किती भेटले हे गौण आहे. हे तिघेही एकमेकांना कसे परस्परपूरक ठरले ते अधिक महत्त्वाचे आहे. जे शहाजीराजांना वा त्यांच्या सारख्या शौर्य, स्वाभिमान संपन्न वीरपुरुषांना जमले नाही ते प्रतिकूलतेतही शिवाजीराजांना कसे जमले या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासारखे आहे.

शिवाजीराजे संतजनांचे-सज्जनांचे समर्थ मित्र होते. असहिष्णुता, संकुचितपणा, विद्वेष यांच्याप्रमाणेच दुर्बलता, गद्दारी, बेइमानीशी त्यांचे वाकडे होते. समाजमन जागविण्यासाठी नेमके काय लागते ते संत सज्जनांच्या सहवासातून मिळते याची त्यांना जाणीव होती.

नात्यागोत्याच्या मंडळींना गोळा करून आणि वतनदारवृत्ती वाढवून राज्य निर्मिती वा राज्य सांभाळ होत नसतो तर तो, प्रजाजनांच्या हितकल्याणाची निरपेक्ष चिंता वाहणाऱ्या, आचारविचाराची शुद्धता राखून भक्तिमय व्यवहार करणाऱ्या समर्थ संतसज्जनांच्या योगाने घडत असतो हे शिवचरित्रातून प्रत्ययाला येते.

**विवाद्यता**

समर्थ रामदास आणि शिवाजीराजे यांची पहिली भेट कुठे आणि केव्हा झाली यावर अनेक विद्वानांनी विशेष खल करून अटीतटीने आपले म्हणणे मांडले आहे. यातही ही भेट बऱ्याच उशिरा म्हणजे राज्याभिषेकानंतर घडली असे सिद्ध केले तर रामदासांचे महत्त्व कमी ठरविता येते आणि लवकरच्या काळात म्हणजे आदिलशाही आव्हानांच्या वेळी, इ.स. १६५८ च्या आसपास झाली म्हटले तर मग हिंदवी स्वराज्य कर्तृत्वातील सारे महत्त्व समर्थ रामदासांना देण्याचा अट्टाहास सुरू होतो -- अशी एकूण मांडणीची बैठक दिसते.

समर्थपक्षाचे बहुतेक अभ्यासक आरंभी मुख्यत: रामदासी वाङ्मयातील बखरीवर भर देत राहिले. या बहुतेक बखरी वास्तव इतिहासापेक्षा अतिरंजित अन् कपोलकल्पित वर्णनांनी भरलेल्या आहेत. ज्यांनी शिवचरित्रपर लेखनाचे आधार देत शिवसमर्थ संबंध तपासले, त्यांनी, कवींद्र परमानंदांच्या शिवभारतात, जेधे शकावलीत, कृष्णाजी अनंतकृत सभासद बखरीत समर्थांना महत्त्व मिळाले नाही, यावर मुख्यत: भर दिला.

समर्थचरित्राची म्हणून पुस्तके जी आधाराला घेतात त्यातही काही विसंवाद जाणवण्यासारखे आहेत. समर्थांच्या देशाटनाचे उल्लेख येतात पण काशी किंवा अयोध्या येथे समर्थ गेले, त्यावेळी, तिथे त्यांना काय जाणवले याचा तपशील मिळत नाही. रामजन्मभूमीवर बाबरी मशीद इ.स. १५२८ पासून उभी आहे. पण समर्थांच्या काव्यात याबद्दल काही येत नाही. सोरटी सोमनाथ, कुरुक्षेत्र इत्यादी स्थळीही क्षेत्रे मोडली होती. पण त्याबद्दलच्या स्पष्ट प्रतिक्रिया समर्थ साहित्यात नाहीत. समर्थांचे तंजावराकडील शिष्य मेरुस्वामी यांनी लिहिलेल्या ''रामसोहळा'' या काव्यग्रंथात समर्थांचे त्रोटक चरित्र येते. ते इ.स. १६९६ च्या सुमाराचे आहे. त्यात शिवछत्रपतींचा निर्देश मिळत नाही.

शिरगाव (सातारा) मठाचे भीमस्वामी यांनी लिहिलेल्या अभंगबद्ध रामदासी वारकरी भक्तलीलामृतात १२१ अभंगांचे एक समर्थचरित्र येते. याची रचना इ.स. १७९७ च्या सुमाराला पूर्ण झाली. यात विशेष महत्त्वाची माहिती मिळत नाही.

गिरीधर स्वामी (१६५३-१७२९) यांनी समर्थांना प्रत्यक्ष अनुभवले असावे. त्यांचा ''समर्थप्रताप'' हा भक्तिभावाने लिहिलेला चरित्रग्रंथ आहे. यातही शिवसमर्थसंबंधाचा ऐतिहासिक दृष्ट्या विश्वसनीय ठरेल असा फारसा तपशील मिळत नाही.

पेशवाईतील रामदासीकवी आत्मारामबुवा येक्केहाळीकर यांचे ''दासविश्रामधाम'' हे समर्थचरित्र पुराण पद्धतीचे असून त्यात शिवसमर्थयोगाचे अत्यंत अतिरंजित स्वरुपाचे वर्णन मिळते. इतिहासाच्या कसोटीवर ते विश्वसनीय ठरत नाही.

समर्थभक्तांनी केलेले बरेचसे समर्थ-वर्णन असे आहे की, शिवाजीराजे प्रत्येक गोष्ट समर्थांना विचारूनच करीत असावेत. यातून दोन्ही विभूतींवर उघडउघड अन्याय झाला आहे. इतिहासाचार्य राजवाडे हे वस्तुतः मराठ्यांच्या इतिहासाची साधने सायासाने एकत्र करणारे एक ध्येयवादी महान संशोधक. पण त्यांच्यापाशी जसा बुद्धिमत्तेचा अहंकार होता तशीच त्यांच्याकडे एकूण संतवाङ्मयाविषयींची एक अपुरी, हेकट आणि चमत्कारिक दृष्टी होती. संताळे, टाळकुटे असे अपशब्द वापरून त्यांनी वारकरी संतांची हेटाळणी केली. ज्ञानेश्वरीचे हस्तलिखित मिळवून संपादितही केले. मूळ हस्तलिखित त्यांना ठेवावेसे वाटले नाही. मराठी संतपरंपरेत समर्थ रामदास सर्वश्रेष्ठ आणि त्यांच्यामुळेच शिवाजीराजे मोठे झाले असा एक आग्रही पक्ष, एरव्ही बखरींवर आगपाखड करणाऱ्या आणि ऐतिहासिक कागदचिठोऱ्यांचे महत्त्व प्रतिपादित करणाऱ्या राजवाड्यांनीच उचलून धरला. राजवाडे, देव, भावे यांचा काळ राजकीय दास्याचा होता आणि बहुतेक गोष्टींकडे ते राष्ट्रीय भावनेने पाहात असे जरी मानले तरी अतिरेकी आग्रहामुळेच जनसामान्यांचा आणि तटस्थ अभ्यासकांचाही रोष या मंडळींनी अकारण ओढवून घेतला. आणि शिवाजीरामदास अनुबंधाची विवाद्यता इतकी वाढली की तो अनुबंध नगण्य ठरावा! वस्तुतः शिवसमर्थ संबंध हे अत्यंत हृद्य स्वरूपाचे आहेत. ते समजावून घेण्यासाठी प्रथम दोहोंचा जीवन-प्रवास ध्यानी घ्यायला हवा.

**समांतर प्रवास**

समर्थांचे प्रत्यक्ष कार्य महाराष्ट्रात कृष्णा खोऱ्यात सुरु झाले इ.स. १६४४ पासून. अकरा मारुती स्थापित करून इ.स. १६४९ च्या सुमाराला त्यांनी चाफळला श्रीराम मंदिराची उभारणी सुरू केली. पुढे दहा वर्षांनी शिवाजीराजांकडे समर्थांच्या शिष्यांनी मंदिरासाठी देणगी मागितली. दरवर्षी दोनशे होनांचे उत्पन्न सुरू झाले. याच सुमाराला समर्थ शिवथरघळीत मुक्कामाला आले आणि दासबोधाचे लेखन सुरू झाले.

शिवाजीराजांची वडिलार्जित जहागीर पुणे परिसरातील. इंद्रायणी, भीमा, चंद्रभागा खोऱ्यातील. इ.स. १६५४ ला पुरंदर सर करून कोंढाणा, सिंहगड ते घेतात. जावळी हस्तगत करून अफझलखान गारद करतात. पुढे अनेकप्रकारे आदिलशाहीशी आणि मोंगलांशी लढा देऊन बळकट होतात. एप्रिल १६७३ ला सातारा-परळी, पुढे पन्हाळा, कोल्हापूर त्यांच्या स्वराज्याचा भाग होतो. येथवर प्रत्यक्ष एकत्र येण्याची सोय आणि सवड शिवसमर्थांना मिळत नाही असे ऐतिहासिक प्रमाणांवरूनच दिसते. पण याचा अर्थ असा नव्हे की, दोहोंचा अजिबात परिचय वा संबंधच नव्हता आणि तो अगदी उत्तरकाळातच येऊ शकला. दोहोंचा प्रवास समांतर नि परस्परपूरक असाच सुरू होता, हें सिद्ध करणाऱ्या कितीतरी घटना आपल्याला सांगता येतात.

**शिवसमर्थ-योग**

उभ्या भारताची पदयात्रा करून समर्थ इ.स. १६४४ च्या आरंभी महाराष्ट्रात कृष्णाकाठी परतल्यानंतर आपल्या बलोपासक संप्रदायाच्या प्रचार-प्रसारासाठी त्यांनी मराठी मुलखात

यात्रा सुरू केली. कृष्णा-कराड करवीर परिसरात शिवराज्याच्या सीमाप्रदेशात त्यांनी अकरा मारुतींची स्थापना केली.

यापैकी एक मारुती मसूर येथे स्थापन केला. मसूर हे ठिकाण निवडण्यात समर्थांची विशिष्ट दृष्टी दिसते. समर्थगाथेचे संपादक अनंतदास यांनी म्हटल्याप्रमाणे मसूर हे शिवाजीराजांची पुणे-सुपे जहागीर आणि विजापूर प्रांत यांच्यामधील एक महत्त्वाचे ठाणे होते.

इ.स. १६४५ मध्ये मसूरला पहिला रामजन्मोत्सव झाला. त्यावेळी बालशिवाजीराजे उपस्थित होते, अशी कथा आत्माराम महाराजांच्या दासविश्रामधामामध्ये वाचायला मिळते. पण याला ऐतिहासिक प्रमाण नाही.

समर्थ चरित्रांच्या जंत्री-वाकेनिशीप्रमाणे १२ एप्रिल १६४९ रोजी शिंगणवाडीच्या बागेत शिवाजीराजे आणि समर्थांची भेट झाली. चाफळजवळ शिंगणवाडीची टेकडी दाखविली जाते. पण वाकेनिशीबद्दल बहुतेक इतिहासकार साशंकता व्यक्त करतात.

हनुमंतस्वामींची समर्थचरित्राची बखर इ.स. १७९३ मध्ये तयार झाली. या बखरीत शिवसमर्थांच्या भेटीचा जो सविस्तर तपशील मिळतो तो अतिरंजित वाटतो.

बावडा दप्तर, मल्हार रावजी चिटणीस यांनी रचलेले सप्तप्रकरणात्मक शिवचरित्र, शिवदिग्विजयाची बखर, पर्णाल पर्वताख्यान यांतही शिव-समर्थ भेटीचे उल्लेख येतात. संक्षेपाने ते असे आहेत :

प्रतापगडाची बांधणी इ.स. १६५६ माली पुरी झाली. त्याठिकाणी शिवरायांनी देवी तुळज़ाभवानीची स्थापना केली. त्यावेळी समर्थ हजर होते अशी एक नोंद पुजारीकुळात मिळालेल्या यादीत असल्याचे रावबहादूर पारसनीसांनी नोंदविले आहे.

इ.स. १६५९ साली चाफळला झालेल्या समर्थांच्या कीर्तनाचेवेळी शिवाजीराजे उपस्थित राहिल्याचा उल्लेख बावडा दप्तरात मिळतो.

जयराम कविविरचित "पर्णाल पर्वताख्यान" काव्यात शिवराय समर्थ यांच्या पोलादपूर येथील भेटीचे वर्णन मिळते. इ.स. १६७३ च्या मार्चमध्ये पन्हाळा मिळविल्यानंतर राजधानी रायगडहून, राजे, पोलादपूरमार्गे करवीरकडे आल्याचे इतरही तपशील उपलब्ध आहेत.

जयरामकवींच्या म्हणण्याप्रमाणे समर्थांनी साम्राज्य उभारणीसाठी शिवरायांना आशीर्वाद दिला. पुढे ते शिवरायांसह पन्हाळ्यालाही गेले. तिथे रामचंद्रपंत अमात्यांच्या वाड्यावर समर्थांचे कीर्तन झाले. त्यावेळी राजेही होते.

थोर इतिहाससंशोधक गा.का. चांदोरकर यांनी इ.स. १९०६ साली दोन ऐतिहासिक पत्रे प्रकाशात आणली. त्यावरून इ.स. १६५८ पर्यंत शिवरायांना समर्थांबद्दल अजिबात माहिती नसावी आणि इ.स. १६७२ मध्येच त्यांची पहिली भेट झाली असे प्रमाणित केले आहे.

या पत्रासंबंधी समर्थांच्या अभ्यासकांनी आणि इतिहास संशोधकांनी यथेच्छ खल करून

जे निष्कर्ष काढले आहेत ते मानायचे तर इ.स. १६७२ मध्ये दोन महापुरुषांची पहिली दरबारी भेट झाली असावी. त्यापूर्वी भेटी झाल्याच नसतील असे न मानणाऱ्यात समर्थभक्त शं.श्री. देव, स.खं. आळतेकर हे प्रमुख अभ्यासक आहेत. इतिहासाचार्य राजवाडे, ग.ह. खरे आणि रा.ब. पारसनीस हेही आहेत. पण सर जदुनाथ सरकार, डॉ. बाळकृष्ण यांच्यासारखे इतिहासज्ञ आणि प्रा.श्री.म. माटे, प्रा.न.र. फाटक, प्रा. नरहर कुरुंदकर, केळुसकर यांच्यासारखे समर्थ अभ्यासक इ.स. १६७२ मध्येच शिवसमर्थ एकत्र आले असे मानतात.

**समर्थ प्रतापाची साक्ष**

गिरिधरस्वामींच्या ''समर्थप्रताप'' या ग्रंथात अफझलखानाच्या पारिपत्याचे जे वर्णन मिळते, त्यात, अफझलखानाला ठरवून मारविले अशी नोंद केली आहे. गिरिधरस्वामी लिहितात :

*समर्थे आकारपूर्वक यवनासी मारविले।*
*मग चाफळ क्षेत्र उभे केले।*
*श्रीतुळजामाउलीसी स्थापिले।*
*प्रतापगडीं ॥*

समर्थांचा दासबोध लेखन-यज्ञ इ.स. १६५० ते इ.स. १६६५ या काळात शिवथरघळीत झाला अशी सर्वसाधारण मान्यता आहे. या काळात शिवाजीराजे या परिसरात प्रभावीपणे वावरत होते. त्यामुळे समर्थ-शिवरायांच्या भेटी संभवतात. ''राजकारण बहुत करावें। परंतु कळोंचि नेदावें॥'' या समर्थसूत्राप्रमाणे त्या बहुधा गुप्तपणे झाल्यामुळे त्यांचा तपशील उपलब्ध नसावा, असा एक युक्तिवाद समर्थ सांप्रदायिकांकडून केला जातो. त्यात अगदीच तथ्य नाही असे म्हणता येणार नाही.

**एक सांकेतिक पत्र**

अफझलखानाच्या धाडीच्यावेळी समर्थांनी सत्‌शिष्य कल्याणस्वामींमार्फत शिवरायांना एक ओवीबद्ध पत्र लिहून ''विजापूरचा सरदार निघाला आहे'' असे सांकेतिक भाषेत कळविल्याची एक महत्त्वाची माहिती समर्थ सांप्रदायिकांनी प्रमाणित केली आहे. मूळ पत्र असे सांगतात :

*विवेकें करावें कार्यसाधन। जाणार नरतनु हे जाणोन।*
*पुढील भविष्यार्थी मन। रहाटोच नये॥*
*चालो नये असन्मार्गी। सत्यता बाणल्या अंगीं।*
*रघुवीर कृपा ते प्रसंगीं। दास माहात्म्य वाढवी॥*
*रजनीनाथ आणि दिनकर। नित्य नेमें करिती संचार।*
*घालिताती येरझार। लाविले भ्रमण जगदीशें॥*
*आदिमाया मूळ भवानी। हेचि जगाची स्वामिनी।*
*एकांती विवंचना करोनी। इष्ट योजना करावी॥*

अशा प्रकारची किती पत्रे समर्थ वाङ्मयात उपलब्ध आहेत याचा शोध घेतला पाहिजे. समर्थांची प्रभावी लेखनशैली ज्या एका शब्दचित्रात्मक पत्रात प्रकटली आहे, ते अधिक विश्वसनीय मानता येईल.

**शिवरायांचे अद्भुत शब्दचित्र**

इ.स. १६७० च्या सुमाराला **समर्थांनी** शिवरायांना उद्देशून कौतुकाने लिहिलेले एक काव्यरुप पत्र उपलब्ध आहे. **मध्यकालीन** मराठी वाङ्मयात यासारखे दुसरे मनोहर शब्दचित्र दाखविता येणार नाही. समर्थ म्हणतात: ज्याच्या गुणमहत्त्वाची अन्य कुणाशीही तुलना करता येणे अशक्य आहे असा ''निश्चयाचा महामेरु'' शिवछत्रपती, उदण्ड परोपकारी वृत्तीचा ''श्रीमंत योगी'' आहे.

*निश्चयाचा महामेरु । बहुत जनांसी आधारु ।*
*अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ।।*
*परोपकाराचिया राशी । उदंड घडती जयासी ।*
*तयाचे गुणमहत्त्वासी । तुळणा कैची ।।*
*नरपति हयपति गजपति । गडपति भूपति जळपति ।*
*पुरंदर आणि छत्रपति । शक्ति पृष्ठभागी ।।*

– हे वर्णन कुण्या अपरिचित कवीने केलेले वाटत नाही. उलट अत्यंत निकटवर्ती आणि शिवसामर्थ्याची संपूर्ण जाण असणाऱ्या व्यक्तीचेच हे शब्द वाटतात:

*यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।*
*पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ।।*
*आचारशीळ विचारशीळ । दानशील धर्मशील ।*
*सर्वज्ञपणें सुशील । सकळा ठायीं ।।*
*धीर उदार गंभीर । शूर क्रियेसी तत्पर ।*
*सावधपणे नृपवर । तुच्छ केले ।।*

असे वर्णन करतांना समर्थ त्यांच्या विशिष्ट स्वभाववृत्तीनेही काही म्हणतात. ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झाल्याची त्यांना खंत आहे. कारण ते प्रतिष्ठित, सवर्णांचे प्रतिनिधी आहेत. त्यांना बहुजन आंदोलनात आणून सोडण्यासाठी त्यांची चळवळ आहे.

*तीर्थक्षेत्रे मोडिली । ब्राह्मणस्थाने भ्रष्ट झाली ।*
*सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ।।*
*देवधर्म गोब्राह्मण । करावया संरक्षण ।*
*हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली ।।*

शिवाजीराजे ''धर्मरक्षी'' राष्ट्र निर्माते म्हणून समर्थांना प्रिय वाटतात. जदुनाथ सरकारांनी समर्थांच्या शिवप्रशंसेचा अनुवाद करतांना त्यांना ''Pillar of Hope'' असे यथार्थपणे म्हटले आहे. समर्थांचे शब्द आहेत:

*उदण्ड पंडित पुराणिक। कवीश्वर याज्ञिक वैदिक।*
*धूर्त तार्किक सभानायक। तुमच्या ठायीं॥*
*या भूमंडळाचे ठायीं। धर्मरक्षी ऐसा नाहीं।*
*महाराष्ट्र धर्म राहिला। कांही, तुम्हां कारणें॥*

महाराष्ट्र धर्माचे आद्य प्रणेते यादवकालीन ज्ञानदेव नामदेव आहेत. मुगलकालीन एकनाथ आहेत. शिवकालीन तुकाराम आहेत आणि प्रवक्ते रामदास आहेत.

धर्मकृत्यांनाही महत्त्व असावे असे निक्षून सांगणारे रामदास सहजपणे म्हणतात :

*आणिकही धर्मकृत्ये चालती। आश्रित होऊनि कित्येक राहती।*
*धन्य धन्य तुमची कीर्ती। विश्वीं विस्तारली॥*
*कित्येक दुष्ट संहारिले। कित्येकांस धाक सुटले।*
*कित्येकांस आश्रय झाले। शिवकल्याण राजा॥*

महाराष्ट्रधर्माला कालोचित असे तेजस्वी रूप देण्याचा, त्याला विजीगीषु आंदोलनाची धार आणण्याचा एक प्रभावी प्रयत्न रामदासांनी केला. असा प्रयत्न करताना केवळ रामकथानिरुपणापेक्षा राजकारणाला नि समकालीन शिवावताराला रामावताराचे महत्त्व देण्याचा द्रष्टेपणा समर्थांनी दाखविला हे कबूल करायला हवे.

शिवप्रशंसापर पत्राच्या अखेरीस व्यक्त झालेली समर्थांची विनम्रता त्यांच्या विरोधकांनाही अंतर्मुख करील अशी आहे :

*तुमचे देशी वास्तव्य केले। परंतु वर्तमान नाही घेतले।*
*ऋणानुबंधें विस्मरण झाले। काय नेणू॥*
*सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ति। सांगणे काय तुम्हांप्रति।*
*धर्मसंस्थापनेची कीर्ती। सांभाळिली पाहिजे॥*

शेवटच्या ओळी तर अभिजात नम्रतेचे शिखर गाठणाऱ्या आहेत :

*उदण्ड राजकारण तटले। तेणे चित्त विभागले।*
*प्रसंग नसतां लिहिले। क्षमा केले पाहिजे॥*

**चाफळ मठास सनद**

समर्थांच्या चाफळ येथील मुख्य मठाला १५ सप्टेंबर इ.स. १६७८ या दिवशी शिवाजीराजांनी एक सनद दिलेली आहे. या सनदेचा तपशील अत्यंत बोलका आहे. त्यावरून शिवाजीराजे आणि समर्थ यांचे पूर्वसंबंध निश्चित करता येतात. सनदीतील महत्त्वाचा भाग असा आहे :

"मजवर कृपा करून सनाथ केले, आज्ञा केली की, तुमचा मुख्य धर्म राज्य साधन करून... प्रजेची पीडा दूर करून पालनरक्षण करावे. तुम्ही जे मनीं धराल ते श्री सिद्धीस पाववील. त्याजवरून जो जो उद्योग केला व जें जें मनीं धरिलें ते ते स्वामींनी आशीर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केले. याउपरि राज्य सर्व संपादिले ते चरणी अर्पण करून सर्व काळ सेवा घडावी, ऐसा विचार मनीं आणिला, तेव्हा आज्ञा जाहली कीं, तुम्हांस पूर्वी धर्म सांगितले,

तेच करावेत, तीच सेवा होय. ऐसे आज्ञापिले. यावरून निकटवास घडून वारंवार दर्शन घडावे, श्रींची स्थापना कोठेतरी होऊन संप्रदाय शिष्य व भक्ती दिगंत विस्तीर्ण घडावी ऐसी प्रार्थना केली. तेही आसमंतात गिरिगव्हरीं वास करुन चाफळीं श्रींची स्थापना करुन संप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली.''

- यात शिवाजीराजांनी जी भूमिका आपल्याकडे घेतल्याचे दिसते ती समर्थांचे सामर्थ्य मान्य करणारी वाटते. इ.स. १६४८ पासूनच्या समर्थांच्या संघटनाकार्याशी एकप्रकारे शिवसत्ता निगडित आहे असे या तपशिलातून जाणवते.

**सज्जनगडाची साक्ष**

साताराजवळचा ''नवरसतारा'' आज सज्जनगड होऊन राहिला आहे ही देखिल शिवसमर्थयोगाची एक जिवंत निशाणी आहे.

अश्वलायन ऋषींचे वास्तव्य म्हणून आश्वलायनगड या नावाने प्रसिद्ध असा हा डोंगर, शिलाहारांनी किल्ला बांधल्यापासून ''अस्वलगड'' बनला. पुढे चौदाव्या शतकात बहामनी सुलतानी काळात तो परळीचा किल्ला म्हणून कृष्णा खोऱ्यावर धाक ठेवून राहिला. आदिलशाही आल्यावर त्याचे नाव ''नवरसतारा'' झाले. अफझलखानाचा मुलगा फाजलखान इथे दीर्घकाळ किल्लेदार होता.

शिवाजीराजांनी २ एप्रिल इ.स. १६७२ ला हा किल्ला घेऊन कृष्णाखोरे स्वराज्यात आणले. ६ जानेवारी इ.स. १६७३ रोजी समर्थ या गडावर वास्तव्यासाठी आले. समर्थांच्या वास्तव्यासाठी दोनहजार सुवर्ण होन खर्चून मठ बांधण्यात आला. अखेरपर्यंत ते इथंच राहिले. रामनवमीच्या उत्सवासाठी मात्र चाफळला जाऊन येत. समर्थ निवासामुळे किल्ल्यावर नित्य समर्थ सज्जनांच्या भेटी घडू लागल्या. संतसज्जनांचे एक संमेलन ही यावेळी गडावर झाले. आणि किल्ला सज्जनांचा गड बनला. त्यांच्या भेटीसाठी इ.स. १६७४ मध्ये शिवराय सपरिवार आले. पुढे इ.स. १६७८ मध्ये संभाजीराजे, येसूबाई, कन्या भवानीबाई यांची पाठवणी गडावर झाली. इथूनच संभाजीराजे दिलेरखानाशी दिलजमाई करून पळाले.

समर्थांच्या वास्तव्य काळानंतरही सज्जनगड समर्थ संप्रदायाशी निगडित राहिला. या गडाबद्दलच्या अनेकानेक कथा सांप्रदायिकांनी लिहिल्या आहेत. त्यापैकी काहींना ऐतिहासिक आधार शोधता येतात.

शिवाजीराजे कायमची वतने देण्याच्या विरोधी होते. पण समर्थांच्या निवासासाठी त्यांनी एक मोक्याचा किल्लाच दिला हे विशेषत्वाने ध्यानी येते. हा सज्जनगड ही शिवसमर्थांच्या उत्कट अनुबंधाची ज्वलंत साक्ष आहे.

**संभाजीराजांस उपदेश**

शिवरायांचे निधन इ.स. १६८० मध्ये झाल्यानंतर संभाजीराजांना उद्देशून जे उपदेशपर पत्र समर्थांनी सज्जनगडावरून पाठविले ते शिवसमर्थ संबंधात अतिशय महत्त्वाचे ठरते. या पत्रातील काही ओळी अत्यंत सुस्पष्ट आणि बोलक्या आहेत :

*अखंड सावधान असावें । दुश्चित कदापि नसावें ।*
*तजवीजा करीत बसावें । एकांतस्थळीं ॥*
*कांहीं उग्र स्थिति सांडावी । कांहीं सौम्यता धरावी ।*
*चिंता लागावी परावी । अंतर्यामीं ॥*

अशाप्रकारे संभाजीराजांना "सज्जनांचे मन कळावे" यासाठी नाना परीने समर्थ काही उपदेश करतात आणि अखेरीस शिवचरित्रचारित्र्याचा दाखला देतात :

*शिवरायास आठवावें । जीवित तृणवत् मानावें ।*
*इहलोकीं परलोकीं राहावें । कीर्तिरुपें ॥*
*शिवरायाचे आठवावें रुप । शिवरायाचा आठवावा प्रताप ।*
*शिवरायाचा आठवावा साक्षेप । भूमंडळीं ॥*
*शिवरायाचें कैसें चालणें । शिवरायाचें कैसें बोलणें ।*
*शिवरायाचे सलगी देणें । कैसें असे ॥*

यातूनही समर्थ-शिवाजीराजे यांच्यातील जवळीक आणि जिव्हाळा सिद्ध होतो.

"आहे तितुके जतन करावे" अथवा "पुढे आणिक मिळवावे" इतकेच समर्थांनी म्हटलेले नाही. पितृशोक झाल्याबद्दल केवळ सांत्वनही करण्याचा त्यांचा उद्देश दिसत नाही. उलट शिवाजीराजांचे रुप, प्रताप, साक्षेप, चालणे, बोलणे, सलगी देणे इत्यादी बारीकसारीक बाबीतील सारे बारकावे समर्थांना कसे ठाऊक आहेत, हेच पत्रातून प्रतिबिंबित होते.

इ.स. १६८० साली छत्रपती शिवाजीराजांचा रायगडावर झालेला मृत्यू तसा अकाली आणि अकल्पित होता. याचे दुःख समर्थांना इतके झाले की ते आपल्या खोलीतून तीन महिने बाहेर पडू शकले नाहीत. ते इतके अन्यमनस्क झाले की, पत्रावळीवर देहधारणे पुरते अन्न घेत. मातीच्या खापरातून पाणी पीत. एकप्रकारे त्यांनी प्रायोपवेशनच सुरू केले. त्यात जेव्हा संभाजीराजांच्या पतनाची वार्ता समजली तेव्हा समर्थ त्यांना भेटून आले. "उग्र कृती सोडून, शिवरायांना आठवीत काही नवे करून दाखववावे" अशा उपदेशाचे पत्रही लिहिले.

संभाजीराजांनी सज्जनगडावरील समर्थांचा वाडा नीटनेटका केला. तंजावरहून आणविलेल्या श्रीराम मूर्तीची स्थापना झाली. आणि चार दिवसांनी म्हणजे शिवछत्रपतींच्या निर्वाणानंतर वर्षभरातच २२ जाने इ.स. १६८२ ला समर्थांनी स्वराज्याचा निरोप घेतला. ही घटनाही शिवसमर्थ संबंधात कमी बोलकी नाही.



अनंतदास रामदासी: श्रीसमर्थांचा गाथा (श्रीसमर्थ चरित्राची ऐतिहासिक चर्चा आणि श्रीसद्गुरु समर्थांचे राजकीय चरित्र: निबंध प्रस्तावना) वाई. १९२८

श्री.स.खं. आळतेकर : श्रीसमर्थ चरित्र, कऱ्हाड. १९३३

ज.र. आजगावकर :श्रीसमर्थ चरित्र, मुंबई. १९३५

श्री.न.प. महाजन : श्रीरामदास : समर्थ संत / वोरा ॲण्ड कंपनी, मुंबई. १९६८

न.र. फाटक : रामदास - वाङ्मय आणि कार्य, मुंबई. १९७०
शं.दा. पेंडसे : राजगुरु समर्थ रामदास, पुणे. १९७४
प्रा.प्र.के. घाणेकर : समर्थांचा सज्जनगड / महाराष्ट्र शासन, पुरातत्त्व विभाग प्रकाशन.
महाराष्ट्र स्टेट गॅझेटियर : सातारा डिस्ट्रिक्ट / महाराष्ट्र शासन प्रकाशन. १९८५



# भूषण कविराय आणि समर्थ रामदास १०

कविराय भूषण, समर्थ रामदास आणि छत्रपती शिवराय हे समकालीन आहेत. समविचारीही आहेत.

शिवछत्रपतींनी दक्षिणेत हिंदवी स्वराज्याची उभारणी करून म्लेंछांना दरारा उत्पन्न केला, ''मोडिलीं क्षेत्रें पुन्हां मांडिली'', राष्ट्रधर्म वाढविला, असा आनंद कविराय भूषण आणि समर्थ या दोहोंनीही मुक्त मनाने व्यक्त केला आहे.

- असा संतोष शत्रूच्या शिबिरात असून भूषणाने व्यक्त करणे हे अनेक अर्थाने विलक्षण आहे. कदाचित भूषणचे काव्य समर्थांसमोर असावे. निदान दोहोंतील अद्भुत साम्य तरी उपेक्षा-विषय ठरू नये.

## शिवचरित्राचा आद्य भाष्यकार

हिंदी वाङ्मयाच्या पंडिती काव्यकाळातील उत्तर भारतीय शिवभक्त कवी भूषण, हा समर्थांचा एक महत्त्वाचा समकालीन आहे.

शिवसमर्थांच्या युगात साऱ्या उत्तरभारतावर मोंगली गुलामगिरीचे अधिराज्य पसरलेले होते. तिथले सारे राजेमहाराजे, सरदारसामंत नाममात्र राहिलेले. तर सर्वसामान्य प्रजानन परिस्थितीच्या प्रतिकूलतेने गांजून गेलेले. एका बाजूने परकियांचे राजकीय दास्य, दुसऱ्या बाजूने स्वकीयांची नामर्द वृत्ती. एकीकडे दैन्यदारिद्र्य तर दुसरीकडे कर्मठ वृत्तीच्या पंड्या-बडव्यांची आणि मुल्लामौलवींची मतलबी सत्ता. धार्मिक, सामाजिक आणि राजकीय अशी सर्वप्रकारची पराधीनता सर्वसामान्य जनसमाजाला ग्रासून टाकीत होती.

कविराय भूषणने उत्तरभारतीयांच्या दैवदुर्विलासाची सारी ''अस्मानी-सुलतानी'' केवळ सकरूण नेत्रांनी पाहिली - अनुभवली नाही. आपल्या स्वबांधवांची ती विपरीत स्थिती पाहून त्याचे मस्तक भणाणून गेले. मन कळवळून उठले. पण शब्दप्रभू भूषणकवी केवळ अश्रु समर्पण करणारा वा भावफुलांच्या ओंजळी वाहणारा कवी नव्हता. त्याच्या काळातील असंख्य इतर कवी मात्र असेच होते. ते ज्याचे खात असत त्याचे गाणे गात असत. आश्रय दाता बदलला की, त्यांचे ''श्रद्धास्थान'' ही बदलायचे. राजदरबारात राहून 'जी हाँ जी हाँ' करावे. सुलतान वा नवाबाच्या रंगेलपणाचे गुणगान करावे. लाचार नि लंपट वृत्तीने

कवित्व करीत मोहरा मोजून घ्याव्यात - अशा देशबुडव्या राजकवींचा तो जमाना होता. उत्तरेत ज्ञानदेव-नामदेवांची वारकरी परंपराही नव्हती. तुकोबांचा नाठाळाच्या माथा काठी देणारा धाक काही काळ कबीरदास दाखवून गेले खरे पण त्यांचे अनुयायी मात्र मठमहंतीतच रमले... सभोवताली महासागराचे गहनगंभीर गर्जनसंगीत सुरू असतांना दृढ चित्तवृत्ती करून एकांतसाधना करणारा एखादा महातपस्वी स्वामी विवेकानंद ज्याप्रमाणे स्वदेश बांधवांच्या भूत-भविष्य-वर्तमानाचा वेध घेतो, त्याप्रमाणे भूषण हा औरंगशाही, शिवशाही आणि भारतीयांचा पुढील काळ यांचा शोध-वेध घेत होता.

शिवचरित्र-चारित्र्याचा पहिला अमहाराष्ट्रीय जाणकार-भाष्यकार भूषण आहे. तो शिवभक्त वीरकवी आहे. तो केवळ प्रशंसागायक चारण-भाट नाही. तो साक्षात् शिवस्वरूप शिवरायाच्या भक्तीसाठी जीवन वेचणारा सज्जन समर्थ कवीराज आहे. त्याचे हिंदी काव्य हे गुलामगिरीच्या काळात प्रज्ञाप्रतिभासंपन्न जनांनी कशाची पूजा बांधावी, भक्ती करावी याचा आदर्श वस्तुपाठ आहे. नाठाळाच्या माथा काठी हाणावी नि सुष्टसज्जनांचे मार्ग निष्कंटक कसे करावेत, याचा एक ढळढळीत दाखला आहे.

**भूषणची ''शिव'' भावना**

भूषणचा काळ इ.स. १६४० ते १७३५ असा ठरतो. तो त्रिविक्रमपूरचा रहिवासी. चित्रकूटनरेशाने त्याला भूषण पदवी दिली.

पन्नानरेश छत्रसाल, वसंतराय आणि रुद्रसिंह, हृदयराय, रीवानरेश, अवधूतसिंह, जयपूरनरेश राजा जसवंतसिंह, त्याचा पुत्र रामसिंह, मंडूनरेश अनिरुद्धसिंह, बुंदीनरेश रावबुद्धसिंह, कुमाऊँनरेश उपोतचंद्र, गढवालनरेश फतइशाह, असोथरनरेश भगवंतराय आणि चित्रकूट नरेशांच्या परिचयानंतर त्यांचा केवळ एखाददुसऱ्या छंदात उल्लेख करणारा भूषण, ''शिवराजभूषण'' आणि ''शिवाबावनी'' हे जे दोन प्रमुख ग्रंथ लिहितो, ते अलंकारशास्त्राचे आहेत. पण ते शिवचरित्र-कथनाच्या हेतूने तयार केलेले असून त्यातील अंतः सूत्र हिंदुत्वावरील श्रद्धेचे आणि असहिष्णू मोंगलीवृत्ती बद्दलच्या सात्विक संतापाचे आहे.

समर्थांप्रमाणेच भूषणने शिवरायांमध्ये भगवान रामाचे आणि श्रीकृष्णाचेही रुप पाहिले. त्याची श्रद्धा सांगते :

*दशरथजू के राममें, वसुदेव के गोपाल ।*
*सोई प्रगट साहिके श्रीशिवराज भुआल ॥*

*(शिवराजभूषण ११)*

- दशरथाचा पुत्र राम हाच पुढे वसुदेवसुत गोपालकृष्ण अवतरला. तोच पुढे शहाजीराजांच्या घरी ''शिवराज'' म्हणून उदयाला आला. भूषण इथेच थांबत नाही. समर्थांसारखेच त्यालाही वाटते : शिवरायांच्या अवतार घेण्यामुळे देव-ब्राह्मण आनंदित झाले. (उदित होत सिवराजके मुदित भर द्विजदेव!) कलियुगही दूर सरले. म्लेंछांचा तर सारा नक्षाच उतरला. (कलियुग हट्यो, मिट्यो सकल म्लेंछन को अहमेव)

### अनेक ऐतिहासिक उल्लेख

समर्थांनी जशी उत्तरेकडे झेपावत देशयात्रा केली तशीच भूषणनेही दक्षिणेकडे शिवरायांच्या ओढीने झेपावून देशयात्रा केली आहे. भडोच, सुरत, देवगिरी, सिंहगड, रायगड, लोहगड, पन्हाळा, अहमदनगर, बिदर, परण्डा, विजापूर, गोवळकुंडा, कुडाळ, चौल, दाभोळ, बसनूर, जिंजी, तंजावर ही स्थाने भूषणने बारकाईने पाहून वर्णिली आहेत. अकबर, उदयभानु, अफझलखानापासून दिलेर, करतलब, खवास, फतेह, बहलोल, रुस्तुमजमाँ इत्यादी बहुतेक साऱ्या मुसलमान सत्ताधीशांचे नि लढवय्यांचे भूषण मानापमान दाखवितो. राजा जयसिंह, रामसिंह, जसवंतसिंह, अमरसिंह, करणसिंह इत्यादी परधार्जिण्या राजपूत वीरांचीही त्याने खबर घेतली आहे. तो मराठा सरदारांचे मालोजीराजांचा अपवाद वगळता उल्लेख टाळतो असे दिसते.

विजापुरचा आदिलशाह आणि गोवळकुंड्याचा कुतुबशाह हे भूषणला औरंगझेबरुपी यवनासुराचे दोन बाहू वाटतात. आग्र्याला औरंगझेबाच्या वाढदिवसाचे वेळी जयसिंहाने नेल्यावरून शिवराय कसे गेले, तिथे त्यांचा अपमान कसा झाला, रामसिंगाने त्यांना कसे सावरले, त्यांच्या सुटकेसाठी सहकार्य कसे दिले या साऱ्या घटनांचे वर्णन भूषण एखाद्या ऐतिहासिक दस्तावेजाप्रमाणे करतो. केवळ राजधानी रायगडच्या वैभवाचे चित्र रेखाटण्यासाठी भूषण चोवीस छंद लिहितो. तो केवळ कवी नाही. तो इतिहासाचा जागरूक साक्षीदार आहे. म्हणूनच त्याची समर्थांबरोबर तुलना करण्याचा मोह होतो.

१८११ मध्ये मल्हार रामराव चिटणिसाने लिहिलेल्या शिवचरित्राच्या बखरीत भूषणचा तपशिलाने उल्लेख येतो. "दक्षिण प्रांती शिवाजीमहाराज यांची कीर्ती श्रवण केली होती. तेथे येऊन महाराजांची भेटी घेतली आणि महाराजास विचारिले की, यवनांचा शत्रू कोणी असेल त्याजपाशी आम्ही राहणार. तेव्हा महाराजांनी उत्तर केले की, मी यवनांचा काल आहे. शिवभूखन म्हणून कविता करिते जाले. ऐसी वहिवाट पाचचार वर्षे जाली."

"शिवराजभूषण" ग्रंथपूर्ती इ.स. १६८१ ची आहे. त्यात शिवचरित्रातील इ.स. १६७४ पर्यंतच्या घटनांची तपशिलाने नोंद मिळते. समर्थ रामदासांची नोंद त्याने केलेली नाही. इ.स. १६७३ पर्यंत समर्थांचे वास्तव्य स्वराज्याबाहेर आहे आणि शिवरायांशी समर्थांच्या प्रत्यक्ष भेटी त्यानंतरच्या काळातील अधिक आहेत, हे भूषणकाव्यातील या अनुल्लेखावरूनही म्हणता येते.

### शिव-भूषणयोग

शिव-भूषण योग हा शिवसमर्थ योगासारखाच आहे. भूषण नेमका महाराष्ट्रात केव्हा आला, कुठे कुठे राहिला, त्याची आणि शिवाजी महाराजांची पहिली भेट नेमकी कुठे झाली, पुढे त्यांच्या संबंधांचे स्वरूप प्रकट राहिले की, गुप्त याबाबत फारशी ऐतिहासिक कागदपत्रे महाराष्ट्रात आजवर उपलब्ध झालेली नाहीत.

मल्हार रामराव चिटणीसाचा अपवाद वगळता अन्य मराठी बखरकार भूषणबद्दल फारसे

बोलत नाहीत. भूषण मात्र हिंदी वाङ्मयेतिहासात अमर आहे तो वीर कवी आणि काव्यशास्त्री पण्डित म्हणून ! आणि त्याने लिहिलेले सारे काव्यालंकारविषयक काव्य हे शिवचरित्रविषयकच आहे.

भूषण हा शिवकालीन होता, तो शिवकीर्ती ऐकून उत्तरेतून महाराष्ट्रात जाणीवपूर्वक आला होता हे त्याच्या हिंदी काव्यांतर्गत संदर्भावरून प्रमाणित झालेले आहे. महाराष्ट्रीय अभ्यासकांनी मात्र त्याची फारशी दखल घेतलेली दिसत नाही. एखादी परप्रांतीय-अन्यभाषिक व्यक्ती अवती भवती सारी प्रतिकूलता असतांना शिवाजी-राजासारख्यांचा आत्यंतिक गौरव करते - त्यासाठी त्याला काहीही कुणी दिलेले नाही. आणि तरीही आपण त्या व्यक्तीच्या काव्यकार्यांची नोंद घेत नाही हे कृतघ्नपणाचेच नव्हे काय ?

भूषणशी ज्याची तुलना करता येईल असा अन्य कवी उत्तरेत नाही. तसाच तो वस्तुतः मराठी प्रदेशातही आजवर झालेला नाही. त्यातल्यात्यात भूषण आणि समर्थ यांचाच अनुबंध दाखविता येतो. तो देखील दोघांच्या हिंदी-मराठी काव्यातील साम्यस्थळांतून अथवा दोहोंच्या राजा शिवाजीविषयक उत्कट प्रेमातून आणि इतिहासविषयक विशिष्ट जाणिवांतून !

**रामावतार शिवाजी**

समर्थांप्रमाणे कविराय भूषणही मर्यादा पुरुषोत्तम प्रभु रामचंद्राचा आराधक आहे. तो रामजन्मभूमीनजिकच लहानाचा मोठा झाला. ''एक वचनमें होत जहँ बहु अर्थन को ज्ञान'' अर्थात एका शब्दाने जेथे अनेक अर्थांचे ज्ञान होते तेथे श्लेषालंकार कसा सिद्ध होतो, हे स्पष्ट करण्याच्या निमित्ताने भूषण प्रभु रामपरिवाराविषयी म्हणतो :

*सीता संग सोभित सुलच्छन सहाय जाके,*
*भूपर भरत नाम भाई नीति चारू है ।*
*भूषन भनत कुल सूर कुल भूषन हैं,*
*दासरथी सब जाके भुज भव भारू है ॥*

अर्थात् माता सीता आणि बंधु लक्ष्मण ज्याच्या सोबत आहे, भक्त भरतासमान ज्याचा सहाय्यक भ्राता आहे आणि जो श्रीवैभवसंपन्न, सूर्यकुलभूषण दशरथनंदन आहे, ज्याच्या बाहुबलावर साऱ्या वसुंधरेचा भार आहे, ज्याने रावणाची लंका नष्ट भ्रष्ट केली, ज्याच्याजवळ वानरसेना होती आणि ज्याने सागरावर सेतु-बंधन केले, ज्याच्या सैन्यसंभाराला पारावार नाही, जो राक्षसांचा नि:पात करणेच जाणतो, अशा श्रीरामाचा वारसदार कोण ? तर...

*अरि लंक तोर जोर जाके संग बानर है,*
*सिंधुर हैं, बँधे जाके दल को न पारू है ।*
*तेगहि कै भेंटै जौन राकस मरद जाने,*
*सरजा सिवाजी रामही को अवतारू है ॥*

अर्थात् यवन राक्षसांचा नि:पात आता येऊन ठेपलाच आहे. कारण, आता शिवरायांच्या स्वरूपात धनुर्धारी प्रभु रामचंद्र राज्य करीत आहे! ''सरजा सिवाजी रामही को अवतारू

है!'' शिवाजीराजे हे श्रीरामचंद्राचेच अवतार आहेत - ही भूषणची श्रद्धा त्याने स्पष्ट शब्दात नोंदविली आहे. या छंदाचा श्लेषार्थ अधिकच रमणीय आहे. तो असा :

धरित्रीवर जो श्रीसंपत्ती अन् लक्ष्मीने शोभायमान आहे, ज्याचे सद्गुणच (सुलच्छन) त्याचे सहाय्यक होऊन त्याची यशोकीर्ती वाढवितात, ज्याला नीतिमानताच अतिशय आवडते, (भरत नाम नीति चारू है) - भूषण म्हणतो, जो सूर्यकुळाला भूषणभूत असून मोठमोठे बलवान शूरवीर ज्याचे दास (दास रथी सब जाके) आहेत, आणि साऱ्या पृथ्वीचा भार ज्याचे बाहूंवर अवलंबून आहे, जो शत्रूंची कंबरच मोडणारा (अरि लंक तोर) आणि ज्याचे बळ बरोबरच्या बाणात आहे, ज्याच्या सेनेची गणनाच करवत नाही, जो मानवतेच्या यावनी राक्षसी शत्रूंना केवळ तलवारीच्या पात्यानेच भेटतो (तेगहि भेटे जौन राकस) असा तो शिवाजीराजा मर्यादापुरुषोत्तम प्रभु श्रीरामाचाच साक्षात् अवतार म्हणायला हवा!

अशा ''रामावतार'' शिवरायांच्या निस्सीम भक्ताची आणि महाराष्ट्रभूमीत रामभक्तीचा समर्थ संप्रदाय उभा करणाऱ्या, शिवराज्याच्या उभारणीस पूरक ठरलेल्या शिवकालीन समर्थ रामदासांची थोडी तुलना करण्यासारखी आहे.

**भूषण आणि समर्थोक्ती**

शिवछत्रपतींच्या ध्येयवादी पराक्रमांमुळे हिंदूंचा धर्म टिकला. काही क्षेत्रे राहू शकली, ब्राह्मणांचे ब्राह्मण्य राहिले, इत्यादी वर्णन भूषणाने परखड शब्दात केले आहे. शत्रूच्या शिबिरात राहून केले आहे. तो म्हणतो :

*कासीहूकी कला जाती, मथुरा मसीत होती ।*
*शिवाजी न होते तो सुनति होती सबकी ॥*

समर्थांनी लिहिले आहे, आपल्या आनंदवनभुवनात :

*बुडाला औरंग्या पापी । म्लेंछसंहार जाहला ।*
*मोडलीं मांडलीं क्षेत्रें । आनंदवनभुवनीं ॥*
*बुडाले भेदवादी हे । नष्ट चांडाळ पातकी ।*
*ताडिले पाडिले देवे । आनंदवनभुवनीं ॥*
*गळाले पळाले मेले । जाले देशधडी पुढे ।*
*निर्मळ जहाली पृथ्वी । आनंदवनभुवनीं ॥*

- या पंक्तीतील त्वेष विलक्षण आहे. म्लेछांचा संहार होऊन मोडण्यात आलेल्या हिंदूंच्या क्षेत्रांची, पुन्हा एकदा प्रतिष्ठा व्हावी, असे समर्थांचे मन म्हणते. त्यासाठी ते परोपरीने ''आनंदवनभुवना'' चे अर्थात् सामर्थ्यशाली हिंदवी स्वराज्याचे स्वप्न-वर्णन करतात. त्यांच्या उपासनाप्रिय वृत्तीला पुरश्चरणाचे आणि स्नानसंध्येचेही मोठे समाधान आहे. त्यात त्यांनी भक्तिभावनेचा आनंदही बघितला असे दिसते :

*नाना तपें पुरश्चरणें । नाना धर्म परोपरी ।*
*गाजिली भक्ती हे मोठी । आनंदवनभुवनीं ॥*

तीर्थक्षेत्रांची नासधूस असहिष्णू वृत्तीच्या आक्रमक यवनांनी केली. त्यातून ''ब्राह्मणस्थानें'' बिघडली, धर्म गेला याचा समर्थांना मोठा खेद आहे. शिवछत्रपतींचा उदय ''धर्मरक्षी'' म्हणून झाला आणि ''महाराष्ट्र धर्म'' त्यांच्यामुळेच टिकला हे सांगताना समर्थ लिहितात:

*तीर्थक्षेत्रे मोडिलीं । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झाली ।*
*सकळ पृथ्वी आंदोळलीं । धर्म गेला ॥*
*देव धर्म गोब्राह्मण । करावयासी रक्षण ।*
*हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥*
*या भूमंडळाचे ठायीं । धर्मरक्षी ऐसा नाहीं ।*
*महाराष्ट्र धर्म राहिला कांही । तुम्हां कारणें ॥*

अध्ययन-उपासनाप्रेमी समर्थ, शिवशाहीतील स्वास्थ्यासंबंधी आपल्या समाधान-संतोषाचा भाव व्यक्त करून म्हणतात: शिवराज्यात हिंदूंच्या जपतप अनुष्ठानांना अभय आहे. कोणीही नदीकाठी जावे आणि पुण्यतोया भागीरथी काठी धर्मकार्याचा आनंद मिळवावा,

*उदण्ड जाहलें पाणी । स्नानसंध्या करावया ।*
*जपतप अनुष्ठाने । आनंदवनभुवनीं ॥*
*वेदशास्त्र धर्मचर्चा । पुराणें माहात्म्यें किती ।*
*कवित्वें नूतने जीर्णें । आनंदवनभुवनीं ॥*

भूषणाने हाच आनंद अतिशय जहाल पद्धतीने आणि काहीशा निर्णायक रीतीने व्यक्त केलेला आहे. त्याच्या मते दक्षिणेत शिवाजीराजे झाले आणि त्यांनी हिंदवी स्वराज्याची बळकट उभारणी केली म्हणून उत्तरेतही हिंदूंचे हिंदुत्व टिकले. तो म्हणतो:

*राखी हिंदुवानी हिंदुवान को तिलक राख्यो,*
*अस्मृति पुरान राखे बेद बिधी सुनी में ।*
*राखी रजपूती राजधानी राखी राजनकी,*
*धरामें धरेम राख्यो, राख्यो गुन गुनीमें ॥*
*भूषन सुकवि जीति हद्द मरहट्टन की,*
*देस देस कीरति बखानी तब सुनी में ।*
*साहीके सपूत सिवराज समसेर तेरी,*
*दिल्ली दल दाबिके दिवाल राखी दुनी में ॥*

- प्रस्तुत छंदातून भूषणकवी समाजात सर्वत्र त्याला कोणती लोकचर्चा ऐकायला मिळाली, तिचे निवेदन करतो आहे: लोक म्हणतात, शहाजीपुत्र शिवाजीराजांनी अनेक विजय संपादन करून मराठा राज्याच्या सीमा वाढविल्यामुळे साऱ्या देशामध्ये त्यांची सुकिर्ती पसरलेली आहे.

लोक हेही आता मनमोकळेपणाने सांगतात: शिवरायांमुळे हिंदुत्वाचे रक्षण होऊ शकले. हिंदूंना आता उजळ माथ्याने कुंकुमतिलक लावता येतो. स्मृती-पुराणांचे अध्ययन करता

येते. वेदप्रणीत ज्ञान-विज्ञानाचा विचारही करता येतो. शिवरायांमुळेच राजपूतराजांच्या राजधान्या जाग्यावर राहिल्या. त्यांचे क्षात्रतेज पुन्हा तळपू लागले.

खरे तर साऱ्या धरित्रीवरच धर्मरक्षण व्हावे, गुणवंतांच्या सज्जनत्वाची अवहेलना होऊ नये, असे आनंदमय वातावरण निर्माण होऊ शकलेले आहे.

शहाजीराजांचे सुपुत्र शिवराय केवळ शूरवीर नाहीत, त्यांनी आपल्या पराक्रमी तलवारीच्या बळावर केवळ दिल्ली नरेशांचा पराभव नाही केला तर त्यांनी उभ्या जगात "हिंदुत्वाची मर्यादा" च सांभाळली आहे!

**भूषण आणि समर्थ**

कविराय भूषण, समर्थ आणि शिवराय हे तिघेही समकालीन आहेत. तिघेही समान प्रकृतीचे आहेत. त्यांना स्वधर्म आणि स्वबांधव यांच्या विषयी अभिमान आहे, आस्था आहे.

त्या काळात साऱ्या उत्तर भारतात यवन पूर्णत: बळावले होते-पश्चिमोत्तर प्रदेश आणि पूर्वांचल प्रदेशही निरंकुश यावनी सत्तेखाली नांदत होता. राजस्थानच्या शूरभूमीतील लढवय्ये सरदार-राणे आपापसात संघर्ष करीत होते आणि परकी आक्रमकांच्या चाकरीतही काही वीर पुरुष धन्यता मानीत होते. समर्थांच्याच शब्दात सांगायचे तर "अभक्तांचा विजय" व्हावा आणि "सज्जनांचा क्षयो व्हावा" अशी स्थिती उत्पन्न झाली होती.

जातिजमातींच्या नि उच्चनीचतेच्या भिंतींमुळे "हिंदुस्थान बलवान" होणे तर दूरच पण तो शतशः विदीर्ण होत होता. स्वार्थी मतलबी हेतूंनी कर्मकांड जपणारी मंडळी समाजाला सद्धर्माचा प्रकाश दाखवू शकत नव्हती. विलासी मोंगल आणि एतद्देशीय ऐशोआरामी सरदार यांच्या दरबारात "जिसका खाना उसका गाना" असा रिवाज होता. दरबारी राजाश्रय मिळविणाऱ्या काव्यशास्त्री पंडितांच्या पंक्तीमध्ये उत्तरेत एक कविराय भूषण आणि दक्षिणेत समर्थ स्वामी रामदास हे दोघेच सारस्वत, दरबारी कवितेपासून दूर राहून स्वधर्मरक्षणासाठी काव्यरचना करीत होते. त्या कर्तव्यकर्माचा एक भाग म्हणून "औरंगवृत्तीचे" वस्त्रहरण करणे त्यांना अत्यावश्यक वाटले होते.

समर्थांच्या तुलनेने पाहता, भूषणने हे काम अधिक खंबीरपणाने केले आहे. वस्तुत: त्याची मातृभाषा हिंदी. तो उत्तरेतील रहिवासी. त्याची गंगाजमनी सुजलसुफल प्रदेशांशी जवळीक. पण त्याने दगडधोंड्यांच्या राकट कणखर महाराष्ट्रदेशाची पायपीट केली. इथली भूमी नि भूमिपुत्र जवळून पाहिले. त्याने आपले सगळे आयुष्यच शिवचरित्र-चिंतनासाठी खर्च केले. समर्थांनी जे शिवरायांविषयी लिहिले ते प्रसंगोपात्त आहे. काही पत्रांच्या रुपात आहे. ते शब्दचित्रात्मक नि प्रभावी असले तरी फारच संक्षिप्त आहे. भूषण मात्र शिवरायांविषयी अत्यंत उत्कट रीतीने तपशीलवार लिहितो. त्याच्या लेखनात अतिशयोक्ती आहे. पण ती अलंकारात्मक आहे. बखरकारांप्रमाणे भूषण अवाजवी प्रसंगवर्णन न करता वीरवृत्ती आणि ध[illegible]वना जागविण्याच्या हेतूने लिहितो.

भूषणला औरंगशाहीचे वास्तव चित्रण करून स्वबांधवांना जागवायचे आहे. ''किबलेके ढौर बाप बादसीह साहजहाँ, वाको कैद किया मानो मक्के आगि लाई है।'' अर्थात् ''ज्याच्या चरणांचे तीर्थ घ्यायचे त्या पूज्य पित्याला तू कैदेत घालून छळलेस. हे तुझे क्रूर-कर्म परमपवित्र मानल्या जाणाऱ्या मक्केच्या प्रार्थना-मंदिराला आग लावण्याइतके अनुचित आहे'' - इतक्या परखडपणे भूषण औरंगझेबाला सुनावतो. त्याच बरोबर ''आपसको फूटहीतें सारे हिंदुवान टूटे। टूटयो कुल रावन अनीति अति करते।'' अर्थात् ''आपापसातील भेदाभेदांमुळे हिंदू समाजाची अवनत अवस्था झालेली आहे! रामायणकाळात अनीतीची अति झाली आणि श्रेष्ठ शिवभक्त रावणावर कुळासह विनाशाचा प्रसंग ओढवला'', असेही स्वबांधवांना सांगायला भूषण कचरत नाही.

**उपसंहार**

भूषण औरंगशाहीच्या अखेरीपर्यंत विद्यमान असावा. न्यायप्रिय, प्रतापी नि स्वाभिमानी शिवरायांशी संघर्ष करीत राहिल्यामुळेच औरंगझेबाला शेवटी स्वतःचेच प्राण गमवावे लागले असा त्याचा निष्कर्ष आहे. ''बुडाला औरंग्या पापी। म्लेंछसंहार जाहला'' या समर्थोक्तीशी या निष्कर्षाचे नाते नाकारता येणार नाही.




श्री.रा.गो. काटे : ''संपूर्ण भूषण'', भा.इं.सं.मंडळ, पुणे १९३०

भगीरथप्रसाद दीक्षित : ''महाकवि भूषण'', साहित्य भवन, इलाहाबाद १९५३

सतीशकुमार : ''शिवाबावनी'', अशोक प्रकाशन, दिल्ली १९७०

डॉ. टीकमसिंह तोमर : ''हिंदी वीरकाव्य''

डॉ. भगवानदास तिवारी : ''भूषण : साहित्यिक एवम् ऐतिहासिक अनुशीलन''

डॉ. राजमल बोरा : ''भूषण और उनका साहित्य''

प्रा. वि.द. संत (सं.) : ''श्रीसमर्थ रामदास'', अ.दे.ऋ.ब्रा. मंडळ, मुंबई १९८२

अशोक कामत : ''शिवभक्त कवी भूषण'' १/२ ''प्रसाद'' पुणे. जाने. फेब्रु. १९९०




# समर्थांचे आनंदवनभुवनाचे स्वप्न ११

'आनंदवनभुवन' हे समर्थ-वाङ्मयातील एक बहुचर्चित स्फुट प्रकरण आहे. या प्रकरणाला महाराष्ट्रगीत म्हटले गेले आहे. समर्थस्मृती, भविष्य पुराणही मानले गेले आहे. कुणी यात वेदविहित विश्वमार्गाचे दर्शन पाहिले आहे. यातील काही ओव्या गूढ असून त्यामागे काही विशिष्ट हेतू आहेत. त्याविषयी मतभेद असू शकतात, पण ते ध्यानी घेऊनही आपण म्हणू शकतो :

आनंदवनभुवनात अन्याय, दमन, अनीती यांच्या विरोधी आवेशयुक्त कथन आहे. तत्कालीन असहिष्णु आक्रमकांविरुद्ध चीड आहे. रामराज्यासारखे शिवराज्य होत असल्याबद्दल विलक्षण उल्हास आहे. समर्थांची स्वप्ने आणि प्रत्यक्ष अनुभव यांचे प्रेरक शब्दात उच्चारण आहे.

ज्ञान, भक्ती आणि विरक्ती यांच्या गूढ आवरणात समर्थांनी आपला अनुभव काव्यमय रीतीने व्यक्त केला आहे. तो आजही लक्षणीय आहे. समर्थांचे शब्दसामर्थ्य आणि वैचारिक विश्व यांवर प्रकाश टाकणारा आहे.

---

**कर्मयोगी सत्पुरुष**

समर्थचरित्रामध्ये भक्ती, ज्ञान आणि कर्म यांचा एक अद्भुत संगम दिसतो. जनासाठी ते प्रवृत्तीमार्गी तर मनासाठी निवृत्तिमार्गीच होते. उपासनेच्या दृष्टीने ते कट्टर श्रीरामभक्त; पण सगुणनिर्गुणातीत ईश्वराची मूळ अद्वैत बैठकही त्यांनी स्वीकारली होती.

नामदेव, ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास हे मराठी मुलखाचे पंचायतन. हे पाच सत्पुरुष म्हणजे महाराष्ट्राचे पंचप्राण. महाराष्ट्रधर्माचे प्रणेते.

नामदेवांनी भगवंताची नामभक्ती सर्वांसाठी खुली केली. ज्ञानदेवांनी भगवंताची वाणी मायमराठीत आणून साऱ्या समाजाला स्फूर्ती दिली. एकनाथांनी आपल्या काळाचे आवाहन ओळखून साऱ्या समाजाला नीती सांगितली. तर कालौघात आत्मबळ हरवून बसलेल्या बहुजनांना तुकोबारायांनी आपल्यासंगे घेऊन त्यांच्यात आत्मिक शक्तीच निर्माण केली.

रामदासांनी या साऱ्या महापुरुषांपेक्षा थोडी वेगळी वाट निश्चितच स्वीकारली. त्यांची मूळ वृत्ती निवृत्तीची, परमार्थाचीच होती. पण त्यांनी देशयात्रा करून जी परिस्थिती प्रत्यक्ष

पाहिली - अनुभवली ती अनर्थाची होती. त्यामुळे सन्मान्य आणि सामान्य यांची सांगड घालण्याचा त्यांनी प्रयत्न मांडला. त्यातही त्यांनी फार बारकावा दाखविला.

त्याकाळी जे देव मानीत, ते देव जाणणारे होतेच असे नाही, यावर समर्थांनी बोट ठेवले. परकीय देव बुडवीत होते. तोडीत व फोडीत होते. त्यांचे पारिपत्य करण्यात क्षत्रिय कमी पडू नयेत, याची चिंता समर्थांनी वाहिली. राजकारणालाही भगवंताचे अधिष्ठान हवे, असे ते म्हणाले.

गडकोट-किल्ले दुर्जनांच्या ताब्यात नि सज्जन मात्र गडाखाली त्यांच्या तोफांच्या आक्रमणाच्या टप्प्यात अशी अवस्था होती. सज्जनांचे नेते कुठेतरी आडगावी गुहा-गुंफातून होते; किंवा देवमंदिरातून कीर्तन-प्रवचनांद्वारे प्रबोधन घडविण्याचा निवांतपणे प्रयत्न करीत होते. दुर्जन मात्र संघटित राहून राज्य गाजवीत असत. समर्थांनी या परिस्थितीविरुद्ध बण्ड पुकारले.

परमार्थाला पुरुषार्थाची जोड मिळणे ही शिवयुगातील फार मोठी निकड होती. "दुष्ट संहारिले मागे। ऐसे उदंड ऐकतो। परंतु रोकडे कांहीं। मूळ सामर्थ्य दाखवी ॥" असे साकडेच समर्थांनी शक्तिदेवतेला घातले. आणि समर्थांना आपल्या आदर्शांचे प्रत्यक्ष उदाहरणच शिवरायांच्या स्वराज्यात प्रत्ययाला आले. त्यांनी स्पष्टपणे लिहिले :

*गनिमांच्या देखता फौजा । रणशूरांच्या फुर्फुरती भुजा ।*
*ऐसा पाहिजे कीं राजा । कैंपक्षी परमार्थी ॥*
*तयास देखता दुर्जन धाके । बैसवी प्रचीतीचे तडाखे ।*
*बंडपाखांडाचे वाखे । सहजचि होती ॥*

या आनंदाची अनुभूती सतत समर्थ व्यक्त करीत राहिले.

एखाद्या क्रांतिकारक राजर्षीला पडावे असे एक दिव्य भव्य स्वप्नच रामदासस्वामींना पडले. तेच आपल्याला आनंदवनभुवनासारख्या त्यांच्या स्फुट प्रकरणात प्रत्ययाला येते. या स्वप्नात आपले "राजकारण" शिवछत्रपतींच्या पुण्यप्रतापाने सफळसंपूर्ण झाल्याचा त्यांचा अत्यानंद आहे. धर्मकामाबद्दलचा त्यांचा विलक्षण उल्हास प्रकट झालेला आहे.

वस्तुत: समर्थांना हे अद्‌भुत स्वप्न केव्हातरी एकदाच पडलेले नाही. ते त्यांना वेळोवेळी पडलेले आहे. पारतंत्र्याच्या यातना भोगणारे असंख्य जन त्यांनी आपल्या देशाटनाच्यावेळी पाहिले होते. पण त्यांच्या समर्थ मनाने त्या गुलामीच्या अंधाररात्रीही स्वप्ने पाहिली. ती प्रत्यक्षात आल्याचा हर्षही त्यांनी अनुभवला.

आनंदवनभुवनातील काही ओळी त्या दुर्दिनांचे स्मरण करून देतात. काही वेळोवेळची समर्थांची मनस्थिती सांगतात. हे प्रकरण एकटाकी लिहिल्यासारखे नाही. त्यातील गूढता ही या कारणामुळेही आलेली आहे.

**आनंदवनभुवन**

समर्थांची जी ६९ स्फुट प्रकरणे प्रसिद्ध आहेत, त्यात "आनंदवनभुवन" हे समर्थांचे

भविष्यपुराण म्हणून विशेष चर्चित आहे. याला कुणी "समर्थस्मृती" असेही सार्थ नाव दिले आहे.

हे स्फुट काव्य ५९ अनुष्टुभ छंदवृत्तात आहे. ह.भ.प. ल.रा. पांगारकरांनी म्हटल्याप्रमाणे हे ओजस्वी काव्य एक प्रकारचे महाराष्ट्रगीत आहे, त्यात मराठा तितुका मेळवून "महाराष्ट्रधर्म" वाढविणाऱ्या छत्रपती शिवरायांच्या रामराज्याचे समर्थांना जाणवलेले सामर्थ्यवर्णन प्रासादिक शब्दात आलेले आहे.

प्रा. म.वा. धोंड यांना हे काव्य इ.स. १६६४ साली वाराणसीला झालेल्या दसनामी गोसाव्यांच्या बंडाचे नि पुढे इ.स. १६७२ च्या सुमाराला दिल्लीच्या परिसरात झालेल्या सतनामी साधूंच्या हालचालींचे प्रतिबिंब वाटते. उत्तरेतील कालीमातेला समर्थ येथे रामवरदायिनी भवानी म्हणतात. आणि अशी कुणी पराक्रमी स्त्रीही त्यावेळी सत्नामी पंथात होती अशी प्रमाणे ते देतात. [१] प्रा. धोंड यांनी प्रस्तुत प्रकरणाला "श्रीवनभुवनी" म्हटले आहे. सुखभुवन, श्रीवनभुवन आणि आनंदवनभुवन हे शब्द समर्थांच्या स्फुट प्रकरणात समानार्थाने आले आहेत. परंतु प्रस्तुत स्फुटकाव्यात आनंदवनभुवन हा शब्द ओवीगणिक आला असताना त्याचे शीर्षक वेगळे मानण्याचे कारण दिसत नाही. प्रा. धोंड यांनी आपले एकूण मत फारच ओढूनताणून व्यक्त केल्यासारखे वाटते. त्यातून समर्थांच्या द्रष्टेपणावर जबर अन्याय होतो, असे म्हणावे लागते.

समर्थचरित्रकार स.खं. आळतेकर यांनी "धर्ममूलक विवेकवैराग्यप्रधान प्रयत्नवाद" हे समर्थवाङ्मयाचे रहस्य असल्याचे सांगून "या अमृततुल्य मंत्रोपदेशाप्रमाणे महाराष्ट्र वर्तला तेव्हा महाराष्ट्राचे आनंदभुवन झाले व महाराष्ट्र वैभवशिखरावर चढले" असे म्हटले आहे. [२]

आनंदवनभुवनात शिवछत्रपतींनी महाराष्ट्रात उभारलेल्या रामराज्याचे प्रतिबिंब आहेच, परंतु उत्कट राष्ट्रवादही आहे. देशावर आलेल्या धार्मिक संकटाचा, आक्रमणाचा परिहार होत असल्याचा मनस्वी संतोष प्रकटलेला आहे.

"हिंदुस्थानच्या चारही दिशांना बारा वर्षे भ्रमण करून काशीला रामगंगेच्या तीरावर बसले असताना समर्थांच्या बुद्धीपुढे सर्व हिंदुस्थान प्रचलित परिस्थितीसह उभे राहिले आणि त्यांच्या दिव्य प्रतिभेसमोर भावी हिंदुस्थानचे जे भव्य चित्र उभे राहिले त्याचे चित्रण शब्दांना जितके पेलणे शक्य झाले तितके त्यांनी केले आहे. त्यांच्या या काव्यरत्नाचे संपूर्ण परीक्षण, मोठमोठ्या रत्नपारखी लोकांनाही करता आले नाही." असे डॉ. शं.दा. पेंडसे यांचे प्रतिपादन असून "आनंदवनभुवन म्हणजे महाराष्ट्र हा अर्थ बरोबर नाही, काशीक्षेत्र आहे आणि त्या क्षेत्रात समर्थांनी भविष्यकालीन महाराष्ट्राचे व हिंदुस्थानचे जे चित्र स्वप्नात दिसले त्याचे वर्णन आहे" असे डॉ. पेंडसे यांचे मत आहे. [३]

अगदी अलीकडे श्री.एस.के. कुलकर्णी यांनी आनंदवनभुवनाचे एक वेगळेच स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे :

"वेदमार्ग विश्वमार्ग असल्याचा पुन्हा प्रत्यक्ष प्रत्यय येईल आणि ज्यावेळी सर्व विषयांचा

मानवकल्याणासाठी वापर करणारे "विद्यापीठ" अवतीर्ण होईल त्याचे ते विश्वव्यापी दर्शन आहे."[४]

- अशा प्रकारे मतमतांतरामुळे "आनंदवनभुवन" हे एक गूढ होऊन राहिले आहे.

**काशीस जावे नित्य वदावे।**

आनंदवनभुवनातील आरंभीच्या सहा छंदात आणि अखेरच्या दहा छंदात प्रापंचिकाला आध्यात्मिक उपदेश आढळतो. स्तोत्राचा मूळ गाभा मात्र अगदी वेगळा आहे. यामागेही एक योजक सावधपण आहे. अध्यात्म आणि भक्ती यांचे आवरण ठेवून नि काशीच्या पुण्यक्षेत्राचे स्थलवाची शीर्षक देऊन समर्थ आपला मूळ सामर्थ्यसूचक आशय समुदायापर्यंत गुप्तरूपाने जावा अशी काळजी घेतात. तत्कालीन धार्मिक आक्रमणाच्या क्रूर वातावरणात अशा प्रकारे चातुर्याने जनजागरण करण्यात समर्थांचे वेगळेपण स्पष्ट होते.

आनंदवनभुवनाच्या आरंभीच समर्थ लिहितात : जन्मापूर्वी नि त्यानंतर पुन:पुन्हा वाट्याला येणारी जी सांसारिक दु:खे असतात ती वृद्धापकाळी वाढतात. प्रपंचाचा त्याग केल्यावरही ती दृष्टीपुढे येतात. अशा वेळी विरक्तीपूर्वक वाराणसीला यावे. मनाला प्रभु रामाचा अखंड ध्यास लागून राहिला आहे असे पाहावे. रामाविषयींची प्रीती नि प्रपंचाविषयींची विरक्ती वाराणसीत वाढू शकते. प्रापंचिकांच्या व्यथावेदना त्यांच्या त्यांनाच ठाऊक असतात. त्याबद्दल कुणी कुणाला काय सांगावे? एकदा काशीक्षेत्री जावे आणि वैराग्याचा संतोष मिळवावा. "कष्टलो कष्टलो देवा। पुरे संसार जाहला" म्हणत देहत्याग जरी करावा लागला तरी चालेल असे मनात धरून काशीस जावे. नाना जन्मात कष्टक्लेशच वाट्याला आले, त्यातून कितीतरी अपाय झाले. आता त्यातून मुक्त होण्याचा उपाय म्हणून ईश्वरानेच वाराणसीचे विरक्त विद्याक्षेत्र दाखविले म्हणायचे नि आनंदपूर्वक आनंदवनभुवनी असायचे.

यानंतर समर्थांनी पुन्हा एकदा स्वप्नाचा उल्लेख करून आपण भविष्याचा विचार करतांना आनंदकल्पनांचे कल्लोळ कसे अनुभवले ते विस्ताराने मांडले आहे.

**वाराणसी-वर्णन ?**

आनंदवनभुवन म्हणजे काशीक्षेत्र याबद्दल दुमत होऊ शकणार नाही. समर्थांनी या प्रकरणाच्या आरंभीच स्वच्छ लिहिलेही आहे : संसार त्यागणे जाणे आनंदवनभुवना! तिसरा श्लोकही वाराणसी तीर्थाचाच संदर्भ देतो :

*संसार वोढितां दु:खें। ज्याचें त्यासीच ठाऊकें।*
*परंतु एकदा जावें। आनंदवनभुवना॥*

पुढेही ते जी जनधारणा सांगतात: 'न सोसे दु:ख ते होते' म्हणून "येकाकी येकदा जावे" आनंदवनभुवना। अशा स्थळी एकदा समर्थ मानसयात्रा करीत गेले असे दिसते म्हणूनच ते म्हणतात : हिंडतां फिरतां गेलों। आनंदवनभुवनी!"

*स्वर्गीची लोटली जेथें। रामगंगा माहां नदी।*
*तीर्थासी तुळणा नाहीं। आनंदवनभुवनीं॥*

समर्थ म्हणतात त्याप्रमाणे या तीर्थक्षेत्राशी तुलना करता येईल असे दुसरे स्थान नाही. येथे भागीरथाच्या प्रयत्नाने प्रकटलेली भागीरथी गंगा आहे. मूळची ती शिवगंगा आहे. समर्थ तिला सहज ''रामगंगा'' म्हणून जातात.

पारंपारिक ज्ञान-विद्या यांचे पीठ असल्यामुळे या ठिकाणी नित्य वेद-शास्त्र-पुराण-माहात्म्य ग्रंथांवरून धर्मचर्चा सुरू असते. जुनी-नवी काव्ये, त्यावरील भाष्ये एकाच वेळी या ठिकाणी ऐकावयास मिळतात. गीत-संगीत-वाद्य इत्यादींच्या कल्लोळात या क्षेत्री कथाकीर्तने चालतात.

- या पुरातन धर्मक्षेत्राची महती अशी आहे की, त्याचे वर्णन करण्यासाठी वेदांची देखील शक्ती मंद ठरावी. समर्थ या क्षेत्री आले आणि त्यांची मनोकामना पूर्ण झाली. पुढे ते विनयाने म्हणतात :

*उंदड ठेविली नामे । आपस्तुतीच मांडिली ॥*
*ऐसे हे बोलणे नाहीं । आनंदवनभुवनीं ॥*
*बोलणे वाउगे होते । चालणे पाहिजे बरे ।*
*पुढे घडेल ते खरे । आनंदवनभुवनीं ॥*

'कुणाला वाटेल मी आत्मप्रशंसेने बोलतो. पण हे खरे नाही. एखादा शुभसंकल्प या पुण्यक्षेत्री करावा आणि तो सहज सिद्धीप्रत जावा असेच हे क्षेत्र आहे. केवळ असे म्हणण्यात तरी काय अर्थ आहे? आधी काही करायला हवे. पुढे काय काय नि कसे कसे घडते ते पाहायला हवे.'

'जसे स्फुरले, स्मरले तसे आज लिहिले. हे स्थळ तर विद्यापीठच आहे. सर्व कला नि विद्या शिकण्यासाठी येथे दूरवरचे लोक येतात. ते अध्ययनानंदात असे रमतात की, अन्य सारे विसरून जातात.'

- आनंदवनभुवनाच्या आरंभीच्या सहा व अखेरीच्या दहा छंदात निश्चितच काशीबद्दलचे धर्मक्षेत्रवर्णन आहे. अन्य बेचाळीस छंदातील आशय हा रामराज्यासारख्या असणाऱ्या शिवरायांच्या हिंदवी स्वराज्याच्या तत्कालीन महाराष्ट्रातील सामर्थ्याविषयीचा धन्यता सांगणारा आहे.

म्हणून आरंभींच्या आणि अखेरीच्या काही उल्लेखाव्यतिरिक्त हे वर्णन शिवछत्रपतींच्या हिंदवी स्वराज्याचेच आहे, असे म्हणावे लागते. कारण,

*बुडाला औरंग्या पापी । म्लेंछसंव्हार जाहला ।*
*मोडलीं मांडलीं क्षेत्रें । आनंदवनभुवनीं ॥*
*बुडाले भेदवाही ते । नष्ट चांडाळ पातकी ।*
*ताडिले पाडिले देवें । आनंदवनभुवनीं ॥*
*रामवरदायिनी माता । गर्द घेऊनी ऊठिली ।*

हे सर्व उद्गार काही वाराणसीविषयींचे नव्हेत. हे तर शिवरायांच्या प्रतापाचेच वर्णन आहे. असे वर्णन त्यांनी अन्यत्रही संभाजीराजांना उद्देशून लिहिलेल्या पत्रात निस्संदिग्धपणे

केलेले आहे.

हनुमंतस्वामींच्या समर्थचरित्रात आनंदवनभुवन प्रकरणाबद्दल एक प्रस्ताव दिलेला आहे. त्यावरून आनंदवनभुवन म्हणजे नासिक-त्र्यंबकेश्वर पासून करवीर-महालक्ष्मी क्षेत्रापर्यंत परिसर आहे.

आनंदवन हा शब्द येथे ईश्वराचे आदर्श राज्य-रामराज्य या अर्थानेही आलेला दिसतो. शिवरायांचे स्वराज्य हे न्याय, नीती, विवेक, देवदेवतावरील श्रद्धा, धर्मस्थापनेची दृष्टी याच्या अधिष्ठानावर उभे होते. ते समोर ठेवून समर्थांनी आदर्श राज्याची आपली सुखकल्पना येथे शब्दबद्ध केलेली आहे. एखाद्या परप्रांतातील भौगोलिक प्रदेशाचे उल्हासाने वर्णन करून तेथे कसे रामराज्य आले हे सांगण्याचे त्यांना काही प्रयोजनच नव्हते.

**स्वप्नपूर्तीचा संतोष**

समर्थ आपल्या तपस्याकाळात आणि त्यानंतरही देशस्थितीचे अवलोकन करीत भ्रमण करताना रामराज्याची स्वप्ने कशी प्रत्यक्षात येतील याचा विचार करीत होते. अशा वेळी त्यांना एकदा वाटले: देवदेवतांची अचानक कृपा झाली. परकीय आक्रमणामुळे स्वधर्मावर जी जी आपत्ती आली ती देवांनी रोखली. शत्रूला जरब बसविली. भीमपराक्रम करणारा वज्रकाय हनुमान आणि त्याच्या रुद्रावताराला शोभून दिसणारे त्याचे शूरवीर शिष्य धर्मरक्षक बनून उठले. त्यांनी विघ्नांना खदेडून घालवून दिले. अन्याय, अनीती, दमन यापुढे सहन करणार नाही म्हणत लोक खवळले. देवांनी त्यांचा कैपक्ष घेतला. हनुमंत नि त्याच्या बलोपासक सैन्यासह प्रभु रामचंद्र देखील उभा ठाकला.

या काव्यात्म प्रचीतीच्या वेळी किंवा एक प्रकारच्या अद्‌भुत स्वप्नात समर्थ काशीक्षेत्री रामगंगेच्या किनारी उभे होते. काशीविश्वेश्वर महादेव आणि प्रभु राम यांचे अनन्य नाते त्यांना जाणवत होते. काशीचे पावन हिंदू क्षेत्र नि विश्वेश्वरमंदिरावर झालेला आक्रमकांच्या असहिष्णु बेदरकार वृत्तीचा आघात त्यांना सलत होता. याविरुद्ध जनताजनार्दन खवळून कसा नि केव्हा उठेल, याचा ध्यास त्यांना केव्हापासून लागून राहिलेला होता.

त्या महान तीर्थाचे ठिकाणी उत्तरेतील उंच पहाडांचे निवासी देव लोक, सखल प्रदेशातील सामान्य मानव, नाना क्षेत्रातील ऋषी-मुनी-तपी-संन्यासी-योगी असे त्रिलोकीचे निवासी लोटतात. "आक्रा आक्रा बहु आक्रा"-अर्थात त्या दिव्य स्थानी अद्‌भुत गर्दी लोटली आहे. त्या धर्मशील समुदायाचे सामर्थ्य अतिप्रचंड आहे. ते सहज जाणवत नसायचे. पण आता जाणकारांना त्याची प्रचीती वेळोवेळी येते. आज तर ती महान बलशक्ती जागी झालेली जाणवते आहे. देवांना, भक्तांना, हिंदुस्थानच्या जनसामान्यांना दास्याच्या बंधनातून मुक्त करण्यासाठी सर्व दिशांनी ते सामर्थ्य प्रकट होते आहे. "मुख्य देवचि ऊठिला आहे." प्रभु रामचंद्राने धर्मयुद्धासाठी प्रेरक शक्ती प्रदान केली आहे. देवाधर्माचे स्वातंत्र्य मिळविण्याची मोठी मोहीमच आज मांडण्यात आली आहे.

या ठिकाणी समर्थांना अगदी सहज देवराज्याचे स्मरण होते. देवसेनेत महाबलिष्ठ वीर

होते. त्यांनी विकटकर्कश होऊन दैत्यांवर हल्ले चढविले. "देव देव बहू देव" अशी दाटणी झाली. दैत्यांची दाणादाण उडाली. जणू देवेंद्राच्या निर्देशनानेच चारी दिशांचे महाबली योद्धे दैत्यांच्या सेनेला नमवीत होते.

समर्थांचे हे स्वप्न केवळ देव-दानव वा राम-रावण महायुद्धाचे रोमहर्षक स्मरण नाही, हे पुढे त्यांनी हेतुपुरस्सर योजिलेल्या "म्लेंछ" शब्दावरून स्पष्ट होते. "पूर्वी जे मारिले होते तेचि आता बळावले" अशा स्वच्छ शब्दात समर्थांनी तत्कालीन असहिष्णु आक्रमक मुसलमानांच्या - औरंगझेबाच्या सेनेला दैत्यांची उपमा दिलेली आहे.

'विजयी दीस जो आहे!' अर्थात् शक्तिदायिनी अंबा तुळजाभवानीचे नवरात्र साजरे केल्यानंतर विजयादशमीच्या दिवशी देवसैन्य संहारासाठी मोठ्या उत्साहाने, प्रतिज्ञापूर्वक प्रस्थान ठेवत असे. हे शिवशाहीतील वास्तव आणि गत युगातील राम-रावण युद्धाच्या वेळी श्रीगणरायाने पूर्वआपत्तींवर उगवलेला सूड या दोन्ही गोष्टी समर्थांच्या मनात सुखोत्साहाचा कल्लोळ एकाच वेळी उठवीत आहेत.

"सदानंदी उदो झाला। पराधीनता गेली।" हा त्यांच्या भवानीमातेच्या स्तोत्रातील हर्षच या ठिकाणी समर्थांना पुन्हा पुन्हा उत्फुल्ल करीत आहे.

**शिवप्रतापवर्णन**

दक्षिणेतील मुसलमानी शाह्यांशी आणि दिल्लीच्या सुलतानी शहेनूशाहीशी प्राणपणाने झुंज देऊन शिवरायांनी हिंदवी स्वराज्याचे स्वप्न खरे केले. खरे तर शिवरायांमुळे दक्षिणेतील यवन सत्ताच पालथी झाली. "बुडाला औरंग्या पापी" आणि "म्लेंछ संहार जाहला" या उद्‌गारामागे हेच ऐतिहासिक सत्य आहे.

समर्थांसारख्या उपासनाप्रिय अन् अध्ययनशील साधूच्या दृष्टीने एक निवांतपणा आला. स्वास्थ्य लाभले स्नानसंध्येसाठी! आता कोण्याही नदीकाठी जावे आणि गंगा भागीरथीच्या काठचा आनंद मिळवावा, असाही अर्थ खालील ओळींचा घेता येण्यासारखा आहे:

*उदण्ड जाहलें पाणी। स्नानसंध्या करावया।*
*जप तप अनुष्ठानें। आनंदवनभुवनीं॥*
*वेदशास्त्र धर्मचर्चा। पुराणें माहात्मे किती।*
*कवित्वें नूतनें जीर्णे। आनंदवनभुवनीं॥*

या वचनांना देखील एक पूर्वसंदर्भ आहे: नष्ट चांडाळ पातकी भेदभावही आता बुडत आहेत. बुडणार आहेत. माणसामाणसांमध्ये देवाधर्माच्या नावावर भेद करणारे ताडिले जाणार आहेत, अन्यधर्मियांना वध्य - काफर मानणारे पाडले जाणार हे समर्थांना दिसते आहे. जनांवर अत्याचार करणारे, त्यांना पिडणारे दुष्टदुर्जन देवकृपेने पराभूत होणार. "गळाले पळाले मेले। जाले देश-धडी पुढे-अशी त्यांना पळता भुई थोडी" होईल. मग पृथ्वीच निर्मळ होऊन जाईल. मोडलेली क्षेत्रे मांडली जातील. नांदती होतील. स्नान-संध्या, जप-तप, नाना अनुष्ठाने, तपस्या, पुरश्चरणे असे धार्मिक स्वातंत्र्य येईल. "गाजली भक्ति हे मोठी"

असा ''चढता वाढता प्रेमा'' नि त्यामुळे ''आनंद मोठा जाहला'' असा संतोषाचा परमानुभव पुढे येईल, असे समर्थ पुन:पुन्हा म्हणताहेत आणि दुसऱ्या बाजूला स्वप्नाच्या पूर्तीचाही आनंद द्रष्टेपणाने अनुभवीत आहेत.

*बंड पाखांड उडाले। शुद्ध अध्यात्म वाढले।*
*राम कर्ता राम भोक्ता। आनंदवनभुवनीं॥*

हा समर्थांचा उल्हास शब्दाशब्दात पुढे ओसंडून वाहताना दिसतो!

जे जे दु:खसंकट भोगावे लागले (''जन्म ते सोसिले मोठे। अपाय बहुतांपरी'') त्यावर ''उपाये धाडिले देवें'' असे या स्वराज्यात झाले. साऱ्या प्रकारची विघ्ने ''जीं स्वधर्माआड होतीं'' तीं ''लाटिलीं कूटिलीं देवें।'' - मारून ठोकून पळवून लावली. ''दापिलीं कापिलीं बहू'' - साक्षात भगवंतानीं साऱ्या विघ्नांचा विनाश केला. ''धर्डिलीं। चिर्डिलीं रागें। रडविलीं बडविलीं बळें'' अशा जोमाने सारी विघ्ने खतम करून टाकली.

शिवरायांची जरब अशी की, घरभेदे सारे गळाले पळाले. ते देशोधडीलाच लागले, पृथ्वी निर्मळ झाली. अवघ्या हिंदुस्थानात बळ आले. चैतन्य आले.

*बुडाले सर्वही पापी। हिंदुस्थान बळावलें।*
*अभक्तांचा क्षयो झाला। आनंदवनभुवनीं॥*

शिवरायांनी आरंभिलेल्या धर्मयुद्धात सारे देवद्रोही, दुष्टदुर्जन पराभूत झाले. देवांची विटंबना करणाऱ्या अभक्तांचा - मूर्तिभंजकांचा विनाश ओढवला. पापी जनांनी तोंडे काळी केली. इतरांना वध्य मानणारे असहिष्णु नास्तिक-मूर्तिभंजक अभक्त पार नाहीसे होऊन गेले.

बादशहाचा ''औरंग्या'' असा उल्लेख समर्थांची साहसी वृत्ती दाखवितो. एकेरीत बादशहाला पापी म्हणून तो बुडाल्याची घोषणा करणे अर्थपूर्ण आहे. स्वराज्यात म्लेंछांचे कोणतेही भय राहिलेले नाही असे त्यांना म्हणावयाचे आहे.

शिवरायांना साऱ्या देशनिष्ठांचे साहाय्य तर झालेच पण रामवरदायिनी जगदंबेनेही मोठेच बळ दिले. ती गदा घेऊन उठली. पापी वृत्तीच्या असुरांवर तिने पुन्हा एकदा कठोर प्रहार केला, ती रणचंडी बनली. शिवरायांसह युद्धक्षेत्रावर आली. साऱ्या दुष्टनष्ट चाण्डाळांचा कर्दनकाळ झाली. तिने दुष्टनिर्दाळण केले. पापसंहार केला.

ज्या पावन तीर्थक्षेत्रांचा दुष्ट आक्रमकांनी विनाश केला होता ती क्षेत्रे आता पुन: एकदा पूर्वीसारखी नांदू लागलेली आहेत:

मोडलीं मांडलीं क्षेत्रें। आनंदवनभुवनीं॥ हा समर्थांचा खरा संतोष आहे.

शिवरायांच्या हिंदवी स्वराज्यनिर्मितीबद्दलची प्रसन्नता व्यक्त करणारे अशाच प्रकारचे वर्णन समर्थांच्या ''तुळजाकुळदेवता'' या स्तोत्रातही येते:

*सदानंदी उदो जाला। सुख संतोष फावला।*
*पराधीनता गेली। सत्ता उदंड चालिली॥*

"शीघ्र आम्हाचि देखता" "तुझा तू वाढवी राजा" अशी या स्तोत्रामध्ये उत्कट प्रार्थना आहे. आनंदवनभुवनात शिवराय बलदण्ड राजे झाल्याचे आणि आपली प्रार्थना सफळ झाल्याचे समर्थांचे समाधानही आहे.

रामवरदायिनी भवानी

दैत्यांचा विनाश करीत विश्वाचे पालन करणारी जगन्माता तुळजाभवानी ही महाराष्ट्राची अधिदेवता आहे. तीच शिवरायांची वरदायिनी आहे. प्रभु रामचंद्रांचीही तीच वरदायिनी होती. तिच्या वरप्रभावाने रामाने रावणाला मारले अशी जनश्रद्धा आहे. ही देवी पारघाटात आली होती, ती रामदासांनी शोधून काढून तिची प्रतापगडावर प्रतिष्ठापना केल्याचे शिवकालीन उल्लेख मिळतात.

"प्रतापगिरीच्या ठायी ती आदिशक्ती म्हणून विराजते" असे समर्थांनीही म्हटलेच आहे. हीच देवी समर्थांची कुलदेवता होती.

*- तुळजावराचेनि गुणे । रामे रावण मारिला ॥*
*- देखिली तुळजामाता । निवालो अंतरी सुखे ॥*
*- तुळजापुर ठाकेना । चालिली पश्चिमेकडे ।*
*पारघाटी जगन्माता । सद्य येऊनि राहिली ॥*
*- तेचि हे तुळजामाता । भक्तांसी पाळिते सदा ॥*
*- प्रसीध तुळजामाता । श्रीरामवरदायिनी ।*
*कुळासी पाळिले मूळीं । आता आम्हासि पाळते ॥*

ही सारी समर्थांनी ठिकठिकाणी केलेली तुळजाभवानीची प्रशंसा आणि -

*देवालये दीपमाळा । रंगमाळा बहुविधा ।*
*पूजिला देव देवांचा । आनंदवनभुवनीं ॥*
*रामवरदायिनी माता । गर्द घेऊन ऊठिली ।*
*मर्दिले पूर्वीचे पापी । आनंदवनभुवनीं ॥*
*भक्तांसी रक्षिलें मागे । आतां ही रक्षिते पाहा ।*
*भक्तांसी दीधलें सर्व । आनंदवनभुवनीं ॥*

- हे सारे उल्लेख अर्थपूर्ण आहेत. ते तुळजापूरच्या आई जगदंबेचेच आहेत.

शक्तिरूपात जगदांतरी वर्तणाऱ्या या जगन्मातेने, अनेक संकटाआघातातून राजांना तारले, दुष्ट-दुर्जनांना निवारले, भक्तीचे सदा पाळण केले, देवकोडी मुक्त केल्या आणि "समर्थ भवानी माता समर्था वरु दीधला" असा अनेक प्रकारे रामदास या वरदायिनीचा गौरवोल्लेख करतात.

"आनंदवनभुवना" त त्यांनी अन्य प्रदेशातील कुण्या देवीचा उल्लेख केला असे म्हणणे हा कल्पनाविलासच होय.

**भविष्यदर्शन ?**

हनुमंतस्वामींच्या बखरीतील पारंपारिक माहितीच्या आधारे आनंदवनभुवनातील देवदैत्य संग्रामाचा संबंध शिवरायांच्या मृत्यूनंतर झालेल्या घडामोडीशी असल्याचे दाखवून देऊन श्री. प्रभाकर पुजारी यांनी प्रतिपादन केले आहे :

"शिवरायांच्या अवतारसमाप्तीबरोबरच धर्मसंस्थापनेचे कार्य नष्ट होणार नाही, इतकेच नव्हे, तर म्लेंछदैत्यांचा नाश करण्यासाठी सगळा समाज पुढे सरसावील हे भविष्यकालाचे रामदासांना झालेले दिव्य दर्शन त्यांनी "आनंदवनभुवना" त प्रकट केलेले आहे."[५]

आनंदवनभुवनातील अनेक ओव्या समाजशक्तीच्या द्योतक वाटतात. "खौळले लोक देवाचे", "मोहीम मांडिली मोठी", "कल्पान्त मांडिला मोठा, म्लेंछ दैत्य बुडावया", "भीमचि धाडिला देवे। वैभवे धाव घेतली" यासारख्या पंक्ती शिवोत्तरकालीन जन-संघर्षात "बुडाला औरंग्या पापी। म्लेंछसंहार जाहला" हे रामदासांचे भविष्यदर्शन प्रकट करतात, इच्छित चिंतन नव्हे - हे प्रा. पुजारी यांचे म्हणणे लक्षणीय आहे.

भीमशक्ती म्हणजे समाजजागरण वा जागृत सामाजिक संघटन. रामदासांनी "भीमरूपी महारुद्रा" या स्तोत्रात व अन्यत्र अशा "भीमशक्ती" चा निर्देश केलेला आहे.

"हिंदुस्थान बळावले पाहिजे", "अभक्त पापी बुडाले पाहिजेत", "पराधीनता गेली पाहिजे", "विजयी दीस यावा" म्हणून "मोठा अनर्थ मांडिला" पाहिजे - हा समर्थांच्या राजकारण-काव्यप्रपंचाचा मूळ उद्देशच आहे. त्यांच्या एकूणच काव्यात या प्रकारे भविष्यासाठी प्रेरक चेतना आहे. वर्तमानाचे भेदक दर्शन आहे. गतकाळाचा शोधही आहे. आनंदवनभुवनातही तो तीव्रतेने आहे.

**औरंग - वस्त्रहरण**

शिवसमर्थांच्या काळात उत्तर हिंदुस्थानात वस्तुत: यवन पूर्णत: बळावलेले होते. पश्चिमोत्तर प्रदेश आणि पूर्वांचलातही सर्वत्र त्यांची निरंकुश सत्ता स्थापित झालेली होती. राजस्थानातील शूरवीर मोंगलांच्या चाकरीत तर गेले होतेच पण आपापसात त्यांचे वैर असे माजले होते की, त्यांचा सतत "क्षयो व्हावा" नि "अभक्तांचा विजय" व्हावा. राणा प्रतापासारखा एखादा अपवाद सोडला तर सारा उत्तरभारत अभक्त, दैत्य वृत्तीच्या शासकांचा गुलाम बनलेला होता. राजकीय प्रतिकार तर सोडाच, पण धार्मिक आणि वाङ्मयीन व्यवहारामध्येही आपण अभक्तांचा विजय व्हावा इतके करंटे ठरलो होतो. जातिजमातीच्या भिंतींमुळे हिंदुस्थान बळावणे दूरच, शतशः विदीर्ण झालेले होते. स्वार्थी हेतूंनी कर्मकाण्ड जपणारी मंडळी समाजाला सद्धर्माचा प्रकाश दाखवू शकणारी नव्हती. विलासी मोंगलांच्या नि एतद्देशीय गुलाम अन् ऐशोआरामपसंद सरदारांच्या दरबारात "ज्याचे त्याचे खावे नि गाणे गात राहावे", असे एकेक काव्यशास्त्री पंडित उत्तरेत त्या काळी होते.

अशा आणीबाणीत उत्तरेत एक कविराय भूषण आणि दक्षिणेत एक समर्थ रामदास हे दोघेच सारस्वत स्वधर्मरक्षणासाठी कविता करीत होते. त्याचा एक भाग म्हणून पापी औरंगवृत्तीचे

वस्त्रहरण करीत होते. भूषण औरंगझेबाबद्दल समर्थांच्याही पुढे जाऊन म्हणतो :

*दारा कीन दौरि यह खजुएकी रारि नाहिं।*
*बांधिबो न होय या मुरादशाह बाल को॥*
*मठ बिस्वनाथको न वास ग्राम गोकुल को।*
*देवी को न देहरा न मंदिर गोपाल को॥*
*गाढे गढ लीन्हो केते बैरी कतलाम कीन्हें।*
*ठौर ठौर हासिल उगाहत साहि-कुल-सालको॥*
*बूडति है दिल्ली सो सँभारि न दिल्लीपति।*
*धक्का आनि लाग्यो सिवराज महाकालको॥*

*(शिवा बावनी)*

या ठिकाणी औरंगझेबाचा एक निकटवर्ती सरदार त्याला समजावून सांगण्याचा प्रयत्न करतो आहे: ''अरे! हे काही दाराला - सख्ख्या भावाला मारणं नाही. खजुव्याला झालेली लढाई नव्हे. शहानवाझखानाला कैदेत डांबून ठेवणंही सोपं गेलं तुला! हे आत्ताचं तसं सोपं काम नाहीं!!

तू काशी-विश्वेश्वराचं मंदिर मोडलंस. गोकुळवृंदावनात तुझ्या छावण्या केल्यास. तिथं तुला प्रतिकार नाही झाला. पण ध्यानात ठेव पुढे आता सोपं नाही. मथुरेला केशवदेवाचं - गोपालाचं देवालयही तू भ्रष्ट केलंस. पाडलंस. पण आता तर तुझी गाठ प्रत्यक्ष महाकालाशी आहे.

राजा शिवाजीच्या रूपात तुझा साक्षात काळच तुझा एकेक किल्ला, गाव सर करीत, तुझ्या क्रूर सैनिकांना - सेनानींना कंठस्नान घालीत पुढे सरसावलेला आहे.

हे दिल्लीश्वरा! तुझी राजनगरी दिल्ली देखील आता बुडायला वेळ लागायचा नाही. तुझं स्थानच ढळणार आहे. ते कसं सावरता सांभाळता येईल, त्याची चिंता कर.

- भूषणचे हे वीरकाव्य आनंदवनभुवनाच्या रचनाकाळातच रचलेले आहे. त्याचे तर सारे काव्यच मुळी ''कासिहु ते कला जाती मथुरा मसीद होती। सिवाजी न होते तौ सुनति होति सबकी॥'' हे कटु सत्य परखडपणे सांगण्यासाठी त्यांनी रचलेले आहे. [६]

**राम कर्ता राम भोक्ता**

भूषण शिवभक्त आहे. समर्थ प्रथम रामभक्त आहेत. शिवाजीराजात त्यांनी 'राम' पाहिला आहे. पण त्यांचे एकूण काव्य 'उपासना दृढ सुचविण्यासाठी' आहे.

आनंदवनभुवनातील काही ओव्या मानवी जीवनाचे उत्थापन रामराज्यातच होते हे सांगणाऱ्या आहेत. ''आनंदवनभुवनीं। राम कर्ता राम भोक्ता'', ''देव-भक्त दुजा नसे'' असे तर असतेच. पण त्या निर्मळ वातावरणात ''बंड पाषांड उडाले। शुद्ध अध्यात्म वाढले'' असाही आनंद निर्माण होऊन राहतो.

साधक आणि भगवंत, असे एकत्र आले म्हणजे खरे रामराज्य येते असे समर्थांचे मत

आहे.

जेव्हा प्रभु रामचंद्राची कृपा झाली तेव्हाच म्लेंछ दुर्जनांचे माजलेले बंड निष्प्रभ झाले. तीर्थक्षेत्राचा आध्यात्मिक आनंद वाढला. देवालये बहुविध दीपमाळा, रंगमाळा यांनी सजली. देवांचा देव अर्थात श्रीराम पूजिला जाऊ लागला.

जे शक्तिदेवतेची अर्चना करतात, बळाची उपासना करतात, त्यांना आरोग्य नि श्रीसंपदा प्राप्त होते. देवदेवता आणि भक्त यांचे अद्वैत असते. हे ऐक्य जर जाणले तर प्रचंड सामर्थ्य अंगी येते. यशकीर्ती मिळते. अद्भुत पराक्रम गाजविता येतो. म्हणून समर्थ म्हणतात :

*सामर्थ्य यश कीर्तीची । प्रतापें सांडिली सीमा ।*
*ब्रीदेचि दीधली सर्वे । आनंदवनभुवनीं ॥*

सामर्थ्य, यश, कीर्ती आणि प्रताप हे समर्थांचे ध्येयसर्वस्व होते. हे चार थोर गुण भक्त नि देव यांच्या एकतेतून साध्य होतात. त्यांच्याच योगाने दुष्टदुर्जनांचा संहार शक्य होतो. सज्जनांचे संरक्षण संभवते. धर्माची संस्थापना होऊ शकते.

**रामराज्यवर्णन**

समर्थांनी "रामराज्य" नावाचे जे स्फुट रचले आहे त्याची आणि आनंदवनभुवनाची तुलना करण्यासारखी आहे.

समर्थांनी संकल्पिलेले हे रामराज्य आणि महाराष्ट्रात अवतरलेले हिंदवी स्वराज्य एकच आहे. "हे साक्ष देखिली दृष्टी" असे समर्थ याच अर्थाने म्हणतात.

अनेकांनी उत्स्फूर्तपणे स्वार्थत्यागाचा धूप जाळून स्वराज्याची उभारणी केली. देवाधर्माचे राज्य व्हावे ही श्रींची आणि जनशक्तीची अनिवार इच्छा होती. त्याप्रमाणेच स्वराज्य निर्माण झाले. जणू महाराष्ट्रात आनंदवनभुवन अवतरले.

*मनासी प्रचीत आली । शब्दीं विश्वास वाढला ।*
*कामना पुरती सर्वे । आनंदवनभुवनीं ॥*

- हा समर्थांचा खरा आनंद आहे. हिंदवी स्वराज्यात "वैभवें सांडिली सीमा" अशी उन्नती आहे आणि "वैराग्य जाहाले सर्वे" असाही संयम आहे. राजा शिवछत्रपती हा जाणता, जयवंत, कीर्तिवंत, महाशक्तिशाली तर आहेच, पण तो "श्रीमंत योगी" आहे. उपभोगशून्य स्वामी आहे. धर्मसंस्थापनेसाठीच तो सिद्ध आहे. म्हणून शिवराज्य हे रामराज्य होणार हे निश्चित आहे.

**तुलसीदासांचे स्मरण**

तुलसीदास हे एकनाथांचे समकालीन आहेत. तत्कालीन सत्तालोलुप, अनीतिमान सुलतानांच्या काळात तुलसीदासांनी प्रजाजनांसमोर रामकथा ठेवून सद्गुणांची पूजा केली. प्रभु रामचंद्राच्या रूपात उत्तमपुरुषनिरूपण केले.

तुलसीदासांच्या पूर्वी उत्तरेत नामदेव-कबीरदासांनी आणि "संतमत" चळवळीतील

विलक्षण वाटतो.

"आनंदवनभुवनी" या एकाच पालुपदाची पंचावन्न वेळा झालेली आवृत्ती समर्थांचा विलक्षण आनंदोत्साह सामर्थ्याने प्रकट करते.

**काही निष्कर्ष**

आनंदवनभुवनात समर्थांची अनेक स्वप्ने आणि अनुभव यांचे एकत्रित उच्चारण आहे.

- यात आरंभी सर्वसामान्यांची कर्मकहाणी आहे. नित्य जीवनातील दुःखवेदना आणि जरामरण यात अडकून पडलेला जीव ईश्वराशी जवळीक करण्याचा प्रयत्न करीत राहतो - कधी त्यासाठी तीर्थक्षेत्रांचे अनुसरण करीत बसतो. हे समर्थ आरंभी सांगतात.

- मानवी देहाचा सदुपयोग करून जीवनमृत्यूच्या फेऱ्यातून मुक्त व्हावे, भगवत्‌शक्तीचा प्रत्यय प्रयत्नवादाने घ्यावा, असा सामर्थ्याचा संदेशही येथे रामदास देतात.

- ज्ञानोपासाना, भक्तिभावना आणि विरागी वृत्ती यांच्या साहाय्याने ईश्वराच्या सृष्टीचे वास्तव स्वरूप समजावून घ्यावे - हे समर्थांचे प्रतिपादन आहे.

- जगाकडे ईश्वराचे आनंदवनभुवन म्हणून पाहिले की, आत्मदर्शन होऊ शकते. "जन्म ते सोसिले मोठे। अपाय बहुतांपरी" ही बोच राहात नाही.

- आनंदवनभुवनाच्या रूपात सद्धर्माचे अवतरण होणार, पापीजनांचा निःपात करण्यासाठी जनताजनार्दनच चळवळीचे सामर्थ्य प्रकट करणार आणि त्यासाठी ईश्वराचे देणे असलेल्या शिवरायांसारख्या उत्तमपुरुषाने वन्ही चेतवून ठेवला आहे याची खातरजमा असू द्यावी, हेही समर्थांनी येथे ठसविले आहे.

- रामराज्य पूर्वी झाले, पण रामावतारकार्य अद्यापी होणारच आहे. रामरायाचे अध्यात्मप्रधान ईश्वरी राज्य लवकरच अवतीर्ण होईल, हा समर्थांचा आशावाद येथे विलक्षण उत्साही शब्दात प्रकटलेला आहे.

~

१. "श्रीवनभुवनीं", "म.सा.पत्रिका", पुणे. एप्रिल, मे, जून. १९७०
२. "श्रीसमर्थचरित्र" कॉंटिनेंटल, पुणे. १९७४ पृ. २६२.
३. "राजगुरु समर्थ रामदास," कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे. १९८० पृ. ३४४.
४. "महाराष्ट्र धर्म आणि समर्थ", सत्यबोध प्रकाशन, पुणे. १९८८ पृ. ११५.
५. सामर्थ्ययोगी रामदास, कॉंटिनेंटल, पुणे. १९७७ पृ. १८१.
६. तपशिलासाठी पाहा : अशोक कामत : "शिवभक्त भूषण", वसु प्रकाशन, पुणे. १९८९.
७. "श्रीरामदास स्वामींचे प्रपंचविज्ञान", मध्यप्रदेश शासन साहित्य परिषद, नागपूर. १९५६. पृ. १९८.

~ ~

# मराठी भारुड परंपरा आणि समर्थांची रचना १२

समाजाविषयींच्या आंतरिक आस्थेने मराठी संतसत्पुरुषांनी लोकभाषा आणि लोककला यांचा स्वीकार केला आणि भारुडासारख्या रहस्यरंजनात्मक रचना करून जनमन-जागरणाचे आपले व्रत प्रभावीपणे चालविले.

मराठी भारुडांची परम्परा संत नामदेवांपर्यंत मागे पाहता येते. पण महात्मा एकनाथ हे महाराष्ट्राचे खरे श्रेष्ठ भारुडगायक. त्यांच्यानंतर संत तुकाराम महाराज आणि समर्थ रामदास यांनीही ह्या भारुडरचनेचे सामर्थ्य जाणून तशी रचना केली.

समर्थ रामदासांनी आपल्या महाराष्ट्र-धर्म वाढविण्याच्या यज्ञासाठी हरप्रकारे लेखनप्रपंच केला. त्यांची मराठी-हिंदी भारुडे ही समर्थांचे ''वेगळेपण'' प्रकट करणारी आहेत. प्रस्तुत निबंधात समर्थांच्या मराठी/हिंदी भारुडरचनेचा विचार केला आहे.

---

### लोकोध्दारक संत

मराठी संत-भक्त जरी मूलत: परमार्थप्रिय साधक-आराधक असले तरी त्यांना समाजबांधवांविषयी अनिवार आस्था होती. अकृत्रिम ओढ होती. म्हणूनच स्वत: लौकिक दु:खसुखाच्या पलिकडे गेल्यानंतरही त्यांनी जनकल्याणाची चिंता अहर्निशपणे वाहिली आणि त्यांनी लोकोध्दाराची एक प्रकारे चळवळच केली असे म्हणता येईल.

लोकांच्या उन्नयनाचा संतांचा मार्ग मन-जागृतीचा होता. त्यासाठी आपण लोकप्रिय होण्यापेक्षा जे जे लोकांना प्रिय आहे, त्याचा आश्रय घेऊन त्यांनी आपले अलौकिक अनुभव आणि उदात्त विचार लोकांपर्यंत पोहोचविण्याचा मन:पूर्वक प्रयत्न केला.

चातुर्वर्ण्याची चौकट ज्या देववाणीमुळे अभंग होती त्या देववाणीचा किंवा तिच्यातील ज्ञानभाण्डाराचा संतांनी कधीच अव्हेर केला नाही. उलट ते ज्ञान त्यांनी वैश्य, क्षत्रिय, स्त्री-शूद्रांना आणि अन्यधर्मियांनाही लोकभाषेतून मुक्तपणाने लुटविले. लोकभाषेमुळे संतांचे आणि लोकांचे सूत्र अधिकच जुळले. घट्ट झाले.

### लोककलाकाराचा ठेवा

खेडोपाड्यामध्ये प्रत्यक्ष पदभ्रमण करीत जाऊन जनताजनार्दनाच्या सुखदु:खाशी समरस

होत त्यांच्याच बोलीभाषेचा आधार घेऊन त्यांचे थोडे मनोरंजन करायचे नि त्यांना हितोपदेशाच्या चार गोष्टीही सुनवायच्या असा एक लोकसंस्कृति-उपासकांचा मोठा वर्ग मराठी मुलखात आहे. अशा लोककलावंतात त्यागाचे दान मागणारा आणि देवनामाचे माहात्म्य गाऊन समाजाला पहाटेच्या प्रहरी जागविणारा वासुदेव आहे. हाती ज्ञानाची दिवटी धरून तिच्या प्रकाशात अज्ञान अन् मनोविकार यांचा अंधकार नष्ट करण्याचा विचार देणारा अंबाभवानीचा उपासक भुत्या आहे. आई जगदंबेचा उदोकार करीत भक्तिभाव अन् अध्यात्मविद्या यांचे गोंधळ घालणारे गोंधळी आहेत, सद्गुरुरायाला शरण जावं, आणि अविवेकाची काजळी नष्ट करावी असा शेरा कथन करणारे जोशी-ज्योतिषी आहेत. पोतराज, वाघ्या, कोल्हाटी, पिंगळा, पांगूळ, फकीर, बैरागी, बहुरूपी असे कितीतरी आहेत. हे सारे आपल्या परीने जनरंजन आणि जन-जागरणही करीत आहेत.

"भारुड" हे अशा लोकजागृतिकार कलावंतांच्या समाजप्रबोधक गीत-प्रयोगांचा एक बहारदार ठेवा आहे. हा ठेवा त्यांना बव्हंशी मराठी संतपरम्परेने दिलेला आहे.

**बहुरूढ "भारुड"**

महाराष्ट्र शब्दकोशामध्ये "भारुड" या शब्दाचा अर्थ "लांबच लांब, गुंतागुंतीची, कंटाळवाणी वृत्तांत कथा, अवघड कूटकविता, लेख अथवा रूपक" असा देण्यात आलेला आहे.[१] बहुरुढ म्हणून भारुड असे लोकप्रिय गीतास म्हणण्यात येऊ लागले असा तर्क संतवाङ्मयाभ्यासक पांगारकर करतात.[२] तर आचार्य विनोबाजी भावे यांच्या कल्पनेप्रमाणे "भारलेले गूढ ज्यात व्यक्त ते भारुड।"[३]

कानडीत "नाडहाडू" असा शब्द ग्रामीण गाण्याकरिता आहे. त्याचा हवाला देऊन डॉ.रा.अ. देखणे म्हणतात :

"मराठीत "जनसंभार" या शब्दासाठी फक्त "भार" हा शब्द संक्षिप्तपणे वापरतात. "भार" ह्या शब्दापुढे "हाडु" हा गीतवाचक शब्द येऊन भार + हाडू = भाराडू आणि त्याचे अपभ्रंश होऊन "भारुड" हा शब्द आता असावा."[४]

या कल्पनेला कोणताही आधार दिसून येत नाही. अशीच एक कल्पना डॉ. नांदापूरकरांनी केलेली आहे. त्यांच्या मते भारुड आणि गारुड यात साम्य आहे. एकनाथांच्या हिंदी रूपक गीतात गारुड व गारुडी यांचे उल्लेख येतात. गारुडी ही एक खेळ दाखवून पोट भरणारी भटकी जमात. तशीच पोटासाठी करमणुकीचा व्यवसाय करणारी डोंबारी, कोल्हाटी, पिंगळा, भराडी, गोंधळी, गोसावी इत्यादी समाजातील मंडळी "भारुडी" म्हणविली गेली असतील.[५]

"भारुड" एका दुतोंड्या पक्ष्याला म्हणतात. भारुडामध्येही दोन तोंडे, म्हणजे एक शाब्दिक अर्थ आणि एक रुपकात्मक अथवा अलौकिक अर्थ, असे दोन अर्थ अभिप्रेत असतात. यावरूनही "भारुड" आले असे काही अभ्यासकांचे म्हणणे आहे. कुणी प्राकृत भाषेतही भारुडसदृश प्राचीन गीतप्रकार असल्याचे म्हटलेले आहे.

वस्तुतः संतपूर्व काळातील प्राकृत अथवा संस्कृत भारुडासारखी रचना आजवर उपलब्ध

नाही. त्यामुळे भारुडांचा उगम मराठी संतवाङ्मयातच असल्याचे मान्य करावे लागते. भारुडगीते ही लोकगीतेच आहेत आणि अशा गीतांची परम्परा आधुनिक भाषापूर्व काळात दिसते. या दोन गोष्टींचा मराठी संतांच्या उपलब्ध पारम्पारिक गाथ्यातील भारुड काव्याशी संबंध जोडणे हे दूरान्वयाचेच वाटते.

**ललित, भराड आणि भारुड**

जनमन-जागरणासाठी कीर्तन-गायनाची परंपरा ज्ञानदेव-नामदेवांच्या काळापासून आढळून येते. कीर्तनात हरिकथेच्या आधाराने उपदेश येतो. त्याचे स्वरूप काहीसे गंभीर असते. कीर्तन संपल्यावर बोवांचे आख्यान अभिनय पद्धतीने सादर करण्याची प्रथा आजही काही ठिकाणी प्रचलित दिसते. या रूप-कीर्तनाला "ललित" म्हटले जाते. सोंगे आणून केलेले कीर्तन असे या ललिताचे वर्णन करता येईल.

देवाच्या नृत्यगायनासाठी "भराड" असा एक शब्द प्रचलित आहे. भराड आणि ललित यांच्या मिश्रणामधून "भारुड" जन्माला आले असावे हे तर्कसंगत वाटते.

मराठी लोकनाट्याची परम्परा विशद करताना श्री.वि.कृ. जोशी यांनी ललितगायनातील नाट्यतत्वाचा उहापोह करून भारुड आणि ललित कीर्तन यांचा अनुबंध स्पष्ट करण्याचा प्रयत्न केलेला आहे. [६]

किलोस्करपूर्व मराठी रंगभूमीचा मागोवा घेताना श्री.कृ.बा. मराठे यांनी कीर्तन, ललित आणि भारुड यांचा अन्योन्य संबंध अतिशय नेमकेपणाने सिद्ध केलेला आहे.

ललित स्वतंत्र नसते. ते कीर्तनाचाच दुसरा आविष्कार असते. बोवांचेच आख्यान त्यात रूपधारी पद्धतीने भाविकांपुढे वठवून दाखविले जाते. श्री. मराठे यांनी म्हटल्याप्रमाणे,

"भारुड" ही भक्ताने रुढ केलेली कीर्तनपरम्परा आहे किंवा भक्ताने रूपधारी पद्धतीने केलेले हरिगुणगायनच आहे. म्हणून भारुड हें जसे नाटकाचे अंग आहे, तसेच कवीने नवोनव प्रतिमा वापरून साकारलेले रूपक आहे." [७]

**मराठी भारुड परम्परा**

ही भारुडरचना जरी संत नामदेवांपासून आढळून आली, तरी संत एकनाथांनी रचलेली भारुडे आशय आणि रचना दृष्ट्या श्रेष्ठ ठरतात. इतर संतांच्या तुलनेने त्यांचीच भारुडे संख्येनेही अधिक मिळतात. वस्तुत: भारुडांचा खरा आरंभच एकनाथांनी केला आणि त्यांचे खास वैशिष्ट्यही त्यांनीच निर्माण केले. त्यांच्या भारुडात सामान्यांच्या रंजनाचा भाग अधिक आहे. समाजाचे सूक्ष्म निरीक्षण करून व्यक्तींचे गुणदोष थोड्या गमतीने आणि पसरट पद्धतीने सांगणे हे भारुड-गायकांचे कार्य नाथांच्या भारुडांमुळेच प्रभावीपणे शक्य होते.

संत नामदेवांच्या गाथेत ३४ लोककाव्यात्मक रूपके आढळतात. लोकाभिमुख दृष्टी ठेवून समाजातील लोकव्यवहाराचे केलेले निरीक्षण या अभंगांतून आध्यात्मिक अनुभवांच्या चौकटीत व्यक्त झालेले दिसते. गोंधळी, खेळिया, वासुदेव, पांगूळ, पिंगळा, डाक इत्यादी अभंगांना भारुडे म्हणता येईल. यात शब्दाशब्दात आध्यात्मिक अर्थ चपखलपणाने बसविलेला

दिसतो. नामदेवांची ही रूपके विनोदपूर्ण आणि सुलभ आहेत.

आध्यात्मिक उपदेशपर रूपके ज्ञानदेव-गाथेतही मिळतात. जनाबाईंनीही काही रूपकात्मक अभंग लिहिले. चोखोबांची जोहाररचना भारुडाशी जवळीक सांगणारी आहे. महानुभाव-नागेशादि सांप्रदायिक संतांनीही भारुडासारख्या माध्यमांचे महत्त्व जाणले होते असे दिसते, परंतु मुख्यत: यादवकालीन वारकरी संतांनी उपदेशपर रूपकांचा पाया संतवाङ्मयात घातला. या जोत्यावर भारुडांची एक भव्य इमारतच एकनाथांनी उभी केली. आज भारुड म्हटले की नाथांचे नाव आपल्यापुढे उभे रहाते.

एकनाथांनंतर मोठे भारुडरचनाकार तुकाराम महाराज आणि समर्थ रामदास.

तुकारामांनी काही भारुडे लिहिली. ती अधिक चित्रणात्मक, उपहासगर्भ, विनोदप्रचुर असून, ती लोकप्रियही झाली आहेत.

रामदासांची भारुडे त्या मानाने लोकप्रिय मात्र झालेली नाहीत. एकनाथांची भारुडेच सर्वतोमुखी आहेत.

**भारुडे आणि एकनाथ**

ज्ञानदेव-नामदेवांच्या तुलनेने पाहता एकनाथांचा काळ हा मुसलमानी शासनाच्या स्थैर्याचा काळ होता. ''निर्वाणदीपे किं तैल्यदानम्'' या न्यायाने नाथांनी सतत समन्वयावर भर दिला. त्यांनी वारकऱ्यांच्या हाती भक्तीचे दर्शन - ''भागवत'' दिले. धारकऱ्यांनादेखील प्रसंगी प्रेरक ठरेल, असे ''भावार्थ रामायण'' सिद्ध केले. सगुण नि परमपवित्र चरित्रे गाऊन आणि अनेक प्रकारे आख्याने-प्रकरणे रचून कीर्तनकारांना आदर्श दिले. ''हिंदूतुर्क संवाद'' तयार करून अन् विपुल हिंदी कविता लिहून अमराठी भाषिकांना नीती सांगितली.

सर्वांसाठी नाथांनी एक समर्थ माध्यम हाती घेतले ते म्हणजे भारुड. विषयवैविध्य, नाट्यमयता, उपहासगर्भता आणि विनोद यांचे सुरेख रसायन तयार करीत वेदान्तासारखा अवघड विषय सर्वसामान्य जनांना समजावून नि पटवून देण्यासाठी त्यांनी भारुडे लिहिली. अवतीभवतीच्या जनजीवनातील जिव्हाळ्याचे विषय हेतुपूर्वक योजून नाथांनी हे भारुड-भांडार उभे केले.

नाथांनी स्वत: मात्र आपल्या रचनेला कूटकाव्य, रूपक किंवा भारुड असे कोणतेही शीर्षक दिलेले नाही. गाथा संपादकांनी शीर्षके योजिली आहेत.

वारकरी संतांच्या काव्यात नसलेली गद्यसदृश रचना नाथांच्या भारुडात पाहावयास मिळते. ही रचना काव्यापेक्षा नाट्यकलेला अधिक निकटची आहे.

नाथांचे भारुड हे त्यातील समन्वयशील लोकशिक्षकाचे प्रभावी रूप प्रकट करते. आजही वास्तव समाजदर्शनाद्वारे प्रबोधन घडविण्यासाठी ही भारुडे उपयोगी ठरावीत, इतकी प्रभावी आहेत.

**समर्थ रामदासांचे लोककाव्य**

नाथांच्या नंतर शिवयुगात अवतीर्ण झालेले समर्थ रामदास हे जागरूक जनकवी होते.

जनांचे संघटन करून राष्ट्रधर्म जागविण्याचाही त्यांचा प्रांजळ प्रयत्न होता. पण जनताजनार्दनाशी प्रभावी जवळीक करण्यासाठी एकनाथांनी जितकी अभिनयकलेशी मैत्री केली, तितकी समर्थांनी केली असे दिसून येत नाही. "हरिदास्य सांडून जे कुणी कलावंत झाले" ते योग्य नव्हते, असे ते म्हणतात. "मजालिसीपुढे डोळे मोडणाऱ्या धटिंगणांचा" ते तिरस्कार करतात. पण तरीही समर्थांनी जनजागरणासाठी लोककाव्यप्रकारांचा आधार घेतला. भारुडेही रचली.

समर्थांच्या पारम्परिक गाथ्यात "भारुडे आणि भारुडसदृश पदेअभंग" अशा शीर्षकाने गोंधळ, पांगूळ, वासुदेव, वाघ्या, कानफाट्या, पिंगळा, बाळसंतोष, जागल्या, बैरागी, बहुरूपी इत्यादी लोक-संस्कृति उपासकांची रूपके आहेत. [८]

चेटुक, टिपरी, कोडे, अंजन, उंदीर, होळी अशा पदांतून देखील आध्यात्मिक कूटकात्मकता असून त्यातूनही त्यांनी श्रीरामाच्या उत्कट भक्तीचाच संदेश सांगितलेला आहे.

समर्थांच्या या सर्व रचनेत एकनाथांसारखेच संवाद-चातुर्य दिसून येते. विषयवैविध्यही आढळते. भाषा मात्र नाथांपेक्षा अधिक सुगम आहे. उपमाअलंकारावर भर देण्याची त्यांची प्रवृत्ती असली तरी त्यांच्या रचनेत पाल्हाळ जास्त वाटतो.

**समर्थांची भारुडसृष्टी**

समर्थांच्या स्फुट कवितेत अकरा विषयावरील आणि त्यांच्या सत्तेचाळीस उपभेदावरील सुमारे एकशेतेरा रचना भारुडे म्हणून वेगळ्या काढता आल्या आहेत. डॉ.रा.वा. चिटणीस यांनी केलेल्या वर्गीकरणाप्रमाणे उंदीर, कुत्रे, गाय, साप, पिंगळा अशा प्राण्यांवर पंधरा भारुडे मिळतात. फळे, वस्तू, खेळ इत्यादींबद्दल पाच, केवळ शाब्दिक स्वरूपाची म्हणजे उखाणे-कोड्यांची दहा, कूट चार, मानवी स्वभाव वृत्ती सांगणारी बारा भारुडे मिळतात.

सर्वाधिक भारुडांची संख्या कानफाट्या, कापडी, कुंटण, जोगी, खेळिया, बैरागी, बहुरूपी, पांगूळ, वाघ्या, वासुदेव, जागल्या, बाळसंतोष इत्यादी लोकसंस्कृति उपासकासंबंधीची असून ती सदतीस आहे.

गोंधळ, चेटुक, झडपणी, शिलंगण, होळी, चौक या लोक-सांस्कृतिक विषयावर सोळा भारुडे आहेत.

अन्य स्फुट सुमारे बारा भरतात. [९]

यावरून आपण असे म्हणू शकतो की, समर्थांनी आपल्या पूर्वसूरींचे वाङ्मय अभ्यासले होते. त्यांच्याशी संवाद साधला होता. त्यांनी पूर्वीच्या संतांचेच विषय घेऊन भारुडे रचली. त्यातील विषयवैविध्यावरून समर्थांनी जनसामान्यांसाठी एकनाथांच्याच पद्धतीने आपला विचार सामर्थ्याने पोहोचविण्याचा प्रयत्न केला.

समर्थांचे जीवनध्येय जनोद्धार हे होते. त्यासाठी त्यांनी आधी मठमंदिरांची स्थापना केली. उत्सव, गाणे, नृत्य, भजन, कीर्तन यांचा पुरस्कार केला. योग, ध्यान, नामजप, उपासना यांवर भर दिला. आणि भारुड ही रूपकांवर आधारलेली आकर्षक, प्रभावी अशी अध्यात्मनिरूपणप्रणालीही त्यांनी समर्थपणे हाताळली.

त्यांच्या भारुडांची संख्या आणि स्वरूप पाहता एकूणच मराठी भारुड काव्यातील एकनाथानंतरचे ते श्रेष्ठ रचनाकार ठरतात.

**''राघवाचा धर्म जागो।''**

समर्थांनी जनसामान्यांचे दास्य दूर करण्यासाठी, त्यांना रामराज्याचा लाभ होण्यासाठी ''दासबोध'' केला. चळवळीचे सामर्थ्य सांगितले. विवेकजागृती आणि हरिकथेचे महत्त्व मांडले. हेच त्यांचे बोध-कार्य त्यांच्या मराठी भारुडातून, त्यांचा पांगूळ करतो, जागल्या-दिवट्या करतो. वाघ्या-कानफाट्या जोगी-बैरागी करतो.

आयुष्य स्वहितकारणी लावावे, ''ऐक रे खेळिया, तुजला सांगतो, आपुलें स्वहित करीं रे। असे समर्थांचा खेळिया सांगतो ''घडोघडीने आयुष्य नेतो, काळ लागला मापारी रे।'' अशी विवेकाला जाग आणतो. इथं आलेला ''मापारी'' शब्द खास समर्थांचा आहे.

पांगूळ संत्रस्त प्रजाजनांना रामराज्याचा दिलासा देऊन सांगतो :

*धर्माचे नगर, तेथे राज्य करी रामरावो।*
*पांगुळा पाय देतो, जानकीचा नाहो॥*

हाच पुढे जनताजनार्दनाच्या कल्याणासाठी मागणे मागतो :

*''राघवाचा धर्म जागो, अधर्म रे भागो।*
*अज्ञान निरसुनिया विज्ञानी लक्ष लागो॥''*

अध्यात्मनिरूपण करून समर्थांचा जोगी, भवसागरापार जनांना सहजी जाता यावे म्हणून देहाविषयी म्हणतो,

*तो देह क्षेत्रपाळू, तो करिसी सांभाळू।*
*तो सूक्ष्म केवळु॥*

जागल्या ''कायानगरीची जागल करा'' म्हणून चेतवितो. ''जागा रे जागत्यांनो तुम्ही सावध व्हारे।'' म्हणून विनवितो.

**समर्थांची हिंदी रचना**

मराठी संतपरम्परेतील बहुतेक सर्व कवींनी महाराष्ट्रभाषेबरोबरच राष्ट्रभाषेतून आपले विचार व्यक्त करीत व्यापक समाजसंवाद साधला. समर्थही याला अपवाद नाहीत. ते तर सामाजिक संघटनेला सर्वाधिक महत्त्व देणारे आणि त्यासाठी देशाटन करणारे. त्यांनी मराठीप्रमाणेच हिंदीतूनही भारुडे रचली.

समर्थांच्या उपलब्ध हिंदी काव्यातील किमान दहा रचना या भारुडपद्धतीच्या आहेत. या सर्व रचना अनंतदास रामदासी यांनी संपादिलेल्या सांप्रदायिक समर्थगाथेमध्ये मिळतात. एक नमुना असा :

*जाग जागोरे भाई। जम से करो लढाई॥धृ.॥*
*जागो जागो मनमें बूझो, माया धंदा झूठा।*

*अलख पलख पलटकर देखो, आया काल चपेटा ॥१॥*
*दृढ भक्तिके सिले पैनो, एकभाव का घोडा।*
*रामनाम जपमाला लेवो, भगाव कालकी पीडा ॥२॥*
*रामदास प्रभुजी के सेवक कहा सुनो तुम भैया।*
*मनुष देह सो व्यर्थ गंवाया, अंतकाल पछताया ॥३॥*
*जाग जागो रे भाई। जम से करो लडाई ॥*

या हिंदी रचनेतील शब्दांची योजना मोठी चपखल आहे. ताल-लयीचा मेळ उत्तम साधलेला आहे. रचना सोपी सुबोध तर आहेच पण एरव्ही भारुडात जशी दिसते आणि रामदासांच्या काव्यात बऱ्याच वेळा जशी मिळते तशी पाल्हाळिक नाही.

रामदासांचा हा ''जागल्या'' मनोबोधाचे महत्त्व सांगत जन्ममरणाशी लढाई मारायला तर सांगतोच पण काळाचा आलेला रेटा आरखून पारखून पाहा म्हणूनही बजावतो. भक्तिभावाचा वेश परिधान करून एकचित्ताने घोडा चालविण्याची त्वरा करा आणि मर्यादापुरुषोत्तमाचे स्मरण करून काळाची पीडा घालवून द्या, म्हणतो.

रामदासांच्या हिंदी रचनेतील हे सारे ''समर्थपण'' खरोखरीच सुखद आहे. गीतातील ''कहा सुनो तुम भैया।'' (हे बंधु। मी जे सांगत आहे ते तू अवधान देऊन ऐक.) ही ओळ मराठी-प्रभावाची द्योतक तर आहेच. पण कधी कधी असे मराठीप्रभावित हिंदी किती अर्थवाही होऊन जाते, त्याचाही त्यात एक दाखला मिळेल.

चपेटा (काळाचा रेटा आणि तडाखा), सिले पैनो (भक्तिभावानी विणलेली वस्त्रे असावीत अर्थात विशुद्ध आचरणयुक्त जीवन असावे), एकभावका घोडा (चित्त आधीच चंचल, घोड्यासारखेच. पण त्याला असेल लगाम तर घोडा योग्य चाल करील. म्हणून एकभाव अर्थात दृढ संकल्पाने पुढची झेप घ्यावी.) - हे सारे ''शब्दार्थसहित काव्यम्'' खास ''रामदासी'' आहे. श्रोत्याला प्रभावित करणारे आहे.

असाच समर्थांचा ''जोगी'' आहे. त्याचेपाशी ''न सिंगी न पत्री, न बभूत न बटवा। नहिं, कछु मुद्रा माया॥'' परंतु या व्याघ्रांबरधारी जटाजूट साधकाचे अंतर ''साईराममय'' झालेले आहे. 'रैनदिन झूले काया'' - अर्थात तो नित्य आत्मिक सुखात मग्न आहे. त्याला इतरांकडून काही नको आहे.

कधी समर्थ ''अलख-जागृत'' नि खोट्या मायेस पळवून लावणाऱ्या निरंजन साधकाची ''अलौकिक'' स्थिती ''संतसंगा''मुळे झाल्याचे वर्णन करतात. कधी ते ''बकवानी'' अर्थात अकारण बोलणाऱ्या ढोंगी नाथसाधूचे ''आसन छोरी सुवासन जावे'' असे वस्त्रहरणही करतात. ''जैसी कहनी वैसी रहनी। सोई नाथका प्यारा।'' असा इशारा देऊन ''गोरख गोरख सब कोऊ कहे गोरख न बूझे कोय। योगींद्रकू जो कोई रख सोई गोरख होय॥'' अशी स्पष्टोक्ती करतात. आणि खऱ्या रामदास्याचा वा भक्तिभावाचा जो डांगोरा पिटतात, तो लक्षणीय आहे:

*जोग न जानू जुगत न जानू, न जानू आसन ध्यान।*
*रामकी कृपा दासने पायी, आलख हुआ परिपूर्ण॥*

एखाद्या भारुडात समर्थांचे काही उपासनेचे आग्रहही डोकावतात. मुद्दलच हरवून बसलेल्या पंड्याचे वर्णन करतांना "साध्या छोरी" - त्याने संध्या सोडून अर्थात ब्रह्मकर्माचा त्याग करून "झूठा अमल कीने" - भलत्याच गोष्टींनी तो "अंमलदार" बनला आहे, अशी मल्लिनाथी केलेली आहे.

**समर्थांच्या रचनेचे वेगळेपण**

समर्थांच्या या हिंदी-मराठी भारुड काव्यात अनेक वैशिष्ट्ये दिसून येतात. त्यांचे सूक्ष्म समाजावलोकन आणि लोकहिताची कळकळ जाणवते. सृष्टीविषयींचे त्यांचे प्रेम दिसते. प्रपंच आणि परमार्थ यांची सांगड घालण्याची व्यवहार्य दृष्टीही प्रत्ययाला येते.

वस्तुतः समर्थ श्रीरामाप्रमाणेच श्रीगणेशाचेही भक्त. त्यांची "सुखकर्ता दुःखहर्ता" ही आरती सर्वच गणेशोपासकांना अतिशय प्रिय आहे. त्या गजाननाचे वाहन मूषक अथवा उंदीर.

हे उंदीर शेतीधान्याची नासाडी करतात. लोकांना भरपूर त्रास देतात. त्यांना तर उंदीर आवरत नाहीतच, पण ज्या विघ्नहर्त्या देवाला ते फार आवडतात, त्यालाही त्यांना आवर घालता येत नाही अशी खंत समर्थ व्यक्त करतात.

- यावरून समर्थांच्या भक्तिपद्धतीचे वेगळेपण स्पष्ट होते. त्यांची श्रद्धा डोळस तर आहेच परंतु ते प्रसंगी अतिशय व्यावहारिक विचार करणारे आहेत. उंदीर जरी श्रीगणेशाचा प्रिय प्राणी तरी मनुष्य प्राण्याच्या शेती-उत्पन्नाआड तो आला तर समर्थांना मान्य नाही.

समर्थांची वर्णनक्षमता आणि त्यांचे सृष्टीनिरीक्षण विलक्षण आहे. आंब्यावरील भारुडामध्ये ते आंब्याचा पांढरा, हिरवा, सिंदूरवर्णी, जांभळा, गुलाबी असे अनेक रंग सांगतात. चापट, सरळ, कळकुंबे, लांबोळे, वाटोळे असे आकार देतात.त्यांच्या परोपरीच्या वासांचा उल्लेख करतात. तुरजे, इडे, सर्वड, लंगडे अशा जातीही त्यांना ठाऊक असतात. पण अशी भरपूर माहिती दिल्यानंतर त्यांना मूळ विषय असा मांडायचा असतो :

*भूमंडळीं आंबे पूर्ण। खाऊनि पाहतो तो कोण?*
*भोक्ता जगदीश आपण। सकळां ठायीं॥*

पुढे त्यांनी काढलेले तात्पर्य "शब्दापरीस करणी बरी" कारण "जिणें थोडे ये संसारी। दो दिसांचे॥" असे आहे. यातील रसिक नि जीवनवादी दृष्टी ध्यानात घेण्यासारखी आहे.

सौरी किंवा वेश्याविषयक पाच भारुडे लिहून समर्थांनी आपल्या काळातील समाजस्थितीचेच एक प्रकारे भेदक चित्र उपस्थित केले आहे. यातही त्यांची विलक्षण सूक्ष्म वर्णनप्रतिभा प्रकटलेली आहे :

"सकर शेला पिवळी चोळी नाकीं मोती साजे" अशी नटून थटून इतरांना भुरळ पाडणारी वारांगना "जगामध्ये नागवी हिंडे घरामध्ये लाजे" अशा विपरीत वर्तनाची असते.

*काजळ कुंकू लावूनि गेली केतकीचे वना ।*
*सोळा जणें लेंकुरे व्याली दादला नये मना ॥*
*घर नाहीं दार नाहीं रानामध्यें हिंडे ।*
*जेव्हां तेव्हां निजपतीला जगात केले भंडे ॥*
*टाकुनि लुगडी दाऊनि उघडी रामदास म्हणे ।*
*जन्मोजन्मीं येणें जाणें आम्हां नाहीं जाणे ॥*

जीवनातील शाश्वत सुखाची अजिबात ''जाण'' नसणारी व्यभिचारिणी जवळच्यांना भंडावून सोडतेच पण तिची अवस्था घरदारहीन होऊन जाते. ती जनात उघड वावरताना दिसते तरी ती एक प्रकारे रानातच राहणारी असते - हे सारे पतितेचे उद्‌बोधन करणारे वर्णन किती उघड्या शब्दात केलेले आहे! हे सारे समर्थांसारखा ब्रह्मचर्यव्रती सत्पुरुष केवळ समाजहिताच्या भावनेनेच करतो, हे ध्यानी घेण्यासारखे आहे.

या सर्व हिंदी-मराठी भारुडात समर्थ मुख्यत्वेकरून ''हरिकथा निरूपण'' करतात. आध्यात्मिक जागरण करतात. आपले सूक्ष्म जननिरीक्षणही व्यक्त करतात. पण त्यांचा वैशिष्ट्यपूर्ण प्रपंच-परमार्थ-समन्वयाचा विचार मात्र आणीत नाहीत. हे सकारण घडते की अहेतुकपणे होते हे कळावयास मार्ग नाही.

- समर्थांची ही सगळी रचना काव्यसौंदर्यापेक्षा त्यातील वैचारिकतेमुळे वाचनीय ठरते. भारुडात जे जनरंजन अपेक्षित आहे ते या ठिकाणी कमी मिळते. रूपकात्मकता, नाट्यगुण हेही येथे कमी आढळतात. भारुडात एरव्ही असणारा पसरटपणा मात्र अधिक पाहावयास मिळतो.

असे असले तरी समर्थांची काही भारुडे त्यांचे मराठी संतपरम्परेतील वेगळेपण ठसविणारी आहेत.

~

१. महाराष्ट्र शब्दकोश, खण्ड - ५ / पृ. २३६०
२. ''मराठी वाङ्मयाचा इतिहास'', खण्ड - २ / पृ. ४२३
३. ''एकनाथांची भजने'', प्रस्तावना. / पृ. ६-७
४. ''भारुड वाङ्मयातील तत्वज्ञान'' (अप्रकाशित प्रबंध / पुणे विद्यापीठ. १९८५ / पृ. ४)
५. डॉ. ना.गो. नांदापूरकर : (''एकनाथी भारुड'' / श्री एकनाथदर्शन./ पृ. १७३)
६. ''लोकनाट्याची परम्परा'', ठोकळ प्रकाशन, पुणे. १९६१ / पृ. १३४)
७. ''मराठी रंगभूमीचा पूर्वरंग'' (एकनाथी भारुड) पृ. ४२-४३
८. अनंतदास रामदासी (सं.) : ''समर्थांचा गाथा'', वाई. १९३५
९. ''रामदासांची लोककाव्ये'', सज्जनगड, मार्च ८९

~ ~

# समर्थांची हिन्दी काव्यरचना

# १३

संत नामदेवांपासून समस्त वारकरी संतांनी किंवा आचार्य दामोदरपंडितांपासून बहुतेक महानुभाव महंतांनी किंवा समर्थ स्वामी रामदासांपासून पुढील वारकरी संतांनी मातृभाषेबरोबरच त्यावेळच्या बहुजनवाणीत किंवा आजच्या राष्ट्रभाषेच्या माध्यमातूनही आपले पारमार्थिक विचार व्यक्त केले. त्यांनी दीर्घ देशयात्रा केल्या. जनांशी जवळीक साधली. त्यांची जनभाषा स्वीकारली. 'अवघे मिळोनि एक व्हावे' असेही समभावी दृष्टीचे जागरण घडविले. समर्थांची हिंदी पदरचना याचे एक प्रमाण ठरते.

*साधू दिसती वेगळाले । परि ते स्वरूपीं मिळाले ।*
*अवघे मिळोनि एकचि झाले । देहातीत वस्तु ॥*

असे दासबोधातील समर्थ-वचन प्रसिद्ध आहे. मराठी संत काय किंवा हिंदी संत काय, त्यांच्या साहित्यातील आध्यात्मिक भाव, परमेश्वराच्या अनुभूतीची ओढ, नामस्मरणाचा आग्रह, गुरुभक्ती; सदाचरणाची सांगी अशा अनेक बाबींतील त्यांच्यातील पारस्परिक साम्य सुस्पष्ट आहे. त्यातूनही येथे केवळ मायबोलीचा आग्रह नाही. मातृभाषेविषयी अभिमान असला तरी संतांना इतर भाषांचे वावडे नाही. समर्थांच्या हिंदी पद्य-रचनेचा विचार प्रस्तुत संदर्भात लक्षणीय ठरतो. [१]

या ठिकाणी हेदेखील नमूद करावयास हवे की, मराठी संतांच्या हिंदी काव्याचे दुर्भाग्य, दोन्ही प्रांतांतील अभ्यासकांच्या परस्पर अपरिचयामुळे उभे राहिले. एक तर ही रचना अमराठी वाटल्यामुळे मराठी अभ्यासकांचे तिच्याकडे दुर्लक्ष झालेले आहे. दुसरे, हे कवी अहिंदी परंपरेतील असल्यामुळे त्यांचे नीटसे आकलन उत्तरेतील विशेषेकरून हिंदी अभ्यासकांना होऊ शकले नाही, असे खेदपूर्वक म्हणावे लागते. पं. रामचंद्र शुक्ल, आचार्य हजारीप्रसाद द्विवेदी, डॉ. पितांबरदत्त बडथ्वाल किंवा पं. राहुल सांकृत्यायन यांच्यासारखे साक्षेपी संशोधकही याला अपवाद ठरले नाहीत. आ. विनयमोहन शर्मांनी मात्र समर्थांच्या हिंदी काव्याचा संक्षेपाने विचार केला आहे. [२]

मध्यकालातील हिंदी काव्याच्या इतिहासात कबीर रविदास, नानक, दादूदयाल, मलूकदास

इत्यादी कवींना निर्गुणोपासक म्हणून 'ज्ञानाश्रयी संत' असे संबोधिले गेले. मर्यादापुरुषोत्तम श्रीराम किंवा लीलाधर श्रीकृष्ण यांच्या सगुण-स्वरूपाची अर्चना करून तेथे परब्रह्माचे रूप-लावण्य अनुभविणाऱ्या तुलसीदास, सूरदास, मीराबाई, नंददास अशा कवींना सगुणभक्त समजले गेले. ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग असे दोन स्वतंत्र पद्धतींचे साधनासंप्रदाय तयार झाले. रामभक्ती किंवा कृष्णभक्ती ही पूर्णत: भिन्न मानण्यात आली. त्यामुळे शिव, विष्णु, कृष्ण, विठ्ठल किंवा राम या सर्व उपास्यांना परब्रह्मवाची मानणाऱ्या मराठी संत-भक्तांविषयी उत्तरेतील अभ्यासकांना अजूनही अचंबा वाटतो. सगुण-निर्गुणाचा एकत्र विचार करणाऱ्या मराठी संतांच्या हिंदी कवितेवरच प्रश्नचिन्ह अंकित करण्याची प्रवृत्तीही त्यांच्यात दिसून येते. [३]

**उपास्य भेदातील दृष्टी**

नाथसांप्रदायाचे दीक्षित निवृत्तिनाथ, पंढरीनाथाचे निष्ठावान भक्त नामदेव, विभिन्न सांप्रदायांचा समदृष्टीने विचार करणारे एकनाथ, पांडुरंगाचे श्रेष्ठ अभंग-गायक तुकाराम हे सारे समर्थांप्रमाणेच रामनामाची महती सहज सांगून जातात.

अहंकाराचा त्याग करून 'रामराम जप समत्वे साधावा' असे ज्ञानदेव-गुरू निवृत्तिनाथांचे सांगणे आहे.

''एका रामनामे सर्व पातके हडबडतात' अशी संत नामदेवांची उक्ती आहे.

रामनामामुळेच असंख्य जीवांचा उद्धार होतो, शिवाच्या पत्नीलाही रामनामाची गोडी वाटते, अशी एकनाथांनी कथा दिली आहे. 'रामराम म्हणता म्हणता आपण जगाचा निरोप घ्यावा' अशी संत तुकारामांची धारणा आहे. आणि,

*'सर्व देवांसी नमस्कारिले । ते एका भगवंतास पावले ॥'*

अशी समर्थांची देखील स्वीकृती आहे. ''हरिहरा भेद नाही, नका करू वाद'' अशीच उपास्यभेदातील दृष्टी ठेवून मराठी संतांनी आपली भव्य, उत्कट आध्यात्मिक अनुभूती अभिव्यक्त केली. जवळजवळ सर्वच मराठी संतांच्या हिंदी काव्याला निवृत्तिप्रधान भक्तीचेच वातावरण मानवते असे दिसते. त्यांच्या इतर कर्तृत्वाचे दर्शन हिंदी रचनेत होत नाही. तुकोबारायांच्या मराठी गाथेतील भेदक आत्मविष्कार किंवा भ्रष्ट आचरणाविरुद्ध कडक समाचार त्यांच्या उपलब्ध हिंदी काव्यात आढळून येत नाही. समर्थांनी आपल्या संप्रदायाला सांगितलेली राष्ट्रधर्माची उदात्त शिकवण त्यांच्या हिंदी कवनात दिसत नाही; परंतु ज्याप्रमाणे उपास्य-भेद महत्त्वाचे मानले नाहीत त्याचप्रमाणे प्रांत अथवा प्रादेशिक भाषांचे विभेद गौण मानले. उलटपक्षी बहुजनांची प्रांतीय भाषा म्हणून मराठी आणि देशातील असंख्य जनताजनार्दनाची बोली म्हणून हिंदी भाषा त्यांनी वेळोवेळी अंगिकारलेली आहे.

**नामदेवे रचिला पाया**

*ज्ञानदेवे रचिले पाया । उभारिले देवालया ॥*
*नामा तयाचा किंकर । तेणे रचिले आवार ॥*

हा तुकाराम-शिष्या बहिणाबाईचा रुपकात्मक अभंग महाराष्ट्रातील वारकरी संतसत्पुरुषांची परंपरा स्पष्ट करणारा आणि भागवत धर्ममंदिराचे वा मराठी वैष्णव संप्रदायाचे स्वरूप विशद करून सांगणारा आहे. या अभंगात समर्थरामदास आपले समकालीन असूनही बहिणाबाईंनी त्यांचा उल्लेख केलेला नाही. कारण ते वारकरी नव्हते. संतनामदेव हे भक्त-भागवतांचे योजनाशील प्रचारक होते. त्यांनी सेवाभक्तीने केवळ भागवतधर्ममंदिराचे आवार तयार केले नाही, तर त्याचा सांगावा, अटकेपार प्रत्यक्ष प्रवास करून मुलतान-गांधारकडील तत्कालीन वायव्य भारतापर्यंत नेला. उत्तरभारतातील भक्तिप्रणालीचे ते अग्रदूत ठरतात. वैष्णवांचे कुलपुरुष ठरतात, असे म्हटले तरी अतिशयोक्तीचे होणार नाही. संत नामदेवांच्या या अलौकिक ऐतिहासिक कार्याचे माध्यम मराठी नव्हते, तर ते मराठीमिश्रित हिंदी होते. महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही हिंदीसारख्या बहुजन-वाणीतून तत्त्वविचाराचा प्रचार-प्रसार सर्वप्रथम करण्याचे प्रमुख श्रेय संत नामदेवांना द्यायला हवे. या अर्थाने 'नामदेवे रचिला पाया' हे मान्य करावे लागते. महाराष्ट्रीय कवींच्या हिंदी काव्याची परंपरा नामदेव-एकनाथ-तुकाराम-रामदास-बहिणाबाई-देवनाथ-दयाळनाथ-निपट निरंजन अशी सुदीर्घ आहे. [४]

समर्थांना हिंदी रचनेचा वारसा आपल्या कर्मभूमीतच गवसलेला आहे. त्यांच्या व्यापक परिभ्रमणामुळे त्यांची हिंदी कविता सहज अवतरली इतकेच.

**समर्थांची भारत-यात्रा**

संतज्ञानदेव-नामदेवांनी यादवकाळातच उत्तर-भारत यात्रा केली. पुढे नामदेवरायांनी वायव्य भारतात वास्तव्य केले. संत एकनाथांनीही काशीनिवास करून 'पंडितमैत्री सभेत संचार' केला होता. सतराव्या शतकात समर्थांनी भारतवर्षात परिभ्रमण केले होते. यादृष्टीने त्यांच्या नावावरील 'तीर्थावळी' प्रकरण महत्त्वाचे ठरते. शके १५५४ (इ.स. १६३२) च्या फाल्गुनामध्ये त्यांनी आपल्या भारत-यात्रेस प्रस्थान ठेविले. अयोध्येस केव्हा जाईन असे त्यांना झाले होते.

समर्थ पंचवटी नासिक येथून वाराणसीकडे आले. येथे काशीविश्वेश्वराचे दर्शन आणि क्षेत्र-कृत्ये पूर्ण करून त्रिस्थळी अर्थात प्रयाग-गया-काशी अशी यात्रा त्यांनी पुन्हा केली. भागीरथी गंगेच्या काठी काशी पुरीत त्यांनी हनुमंत घाटावर मारुतिरायाची स्थापना केली. वाराणसीनंतर समर्थ अयोध्येत आले. याठिकाणी काही काळ निवास करून गोकुळवृंदावन मथुरेची यात्रा केली. पुढे प्रभास क्षेत्राकडे येऊन द्वारकेत वास्तव्य केले. समर्थ-प्रतापाच्या दहाव्या-अकराव्या अध्यायांत समर्थांच्या अशा उत्तर-भारतीय प्रवासाची माहिती मिळते. [५]

समर्थ पंजाबातही गेले. तेथे शीख धर्मगुरुंशी त्यांचा संवाद झाला. [६] हिमालयातील बद्रिनारायण व केदारनाथ येथपर्यंत ते जाऊन आले. तेथे त्यांना श्वेतमारुतीचे दर्शन घडले आणि त्याने त्यांना वेषदीक्षा दिली. [७] टोप, वल्कले, हुर्मुजी वस्त्रे, मेखला, जपमाळा, खडावा व कुबडी देऊन त्यांना सजवून पाठविले.

समर्थांचा भारतसंचार जवळपास बारा वर्षांचा सांगितला जातो. याच काळात त्यांनी विपुल हिंदी रचना केली असावी. आज उपलब्ध रचना केवळ स्फुट असून ती संख्येने साडेतीनशेच्या घरात जाईल.

प्राचार्य रामदास तुकाराम भगत यांनी इ.स. १९७६ मध्ये कोल्हापूरच्या अजब पुस्तकालय प्रकाशनासाठी 'समर्थ रामदासकी हिंदी पदावली' हा ग्रंथ संपादित केला.[८] हा ग्रंथ हिंदी भाषिकांना समर्थांच्या हिंदी परंपरेतील त्याचे महत्त्व इत्यादी बाबींचा परिचय घडवून देण्याच्या दृष्टीने तयार केलेला आहे.

प्राचार्य भगत यांनी अनंतदास रामदासी यांच्या गाथ्यातील 'हिंदी पदे' अशा शीर्षकाने संकलित पदक्रमांक १६५९ ते १७३७ अशी एकूण अठ्ठ्याहत्तर पदे व श्रीसमर्थवाग्देवता मंदिर धुळे येथील बाडातून त्यांना मिळू शकलेली अन्य एकशेसदतीस पदे अशी सर्व मिळून दोनशे पंधरा हिंदी पदे मुद्रित केलेली आहेत. ही सारीच रचना समर्थांची आहे असे निश्चितपणे म्हणण्यास पुरेसे आधार नाहीत.

अनंतदासांच्या गाथेतील हिंदी पदात 'दास कहे', 'रामदास कहे', 'दास फकीर कहे' अशी मराठी पदांशी जुळणारी नाममुद्रा दिसून येते. प्राचार्य भगत यांच्या पदावलीत मात्र या मुद्रांशिवाय, बंदेकमीन, महंत, बंदा, फकीर, भगत, कवी, दास फक्कर, बाबा गैबी, रसिक अशा अनेक अन्य मुद्रा आढळून येतात, याबद्दल डॉ. यू.म. पठाण यांचे म्हणणे लक्षणीय आहे.

''शिवकालीन मराठी भाषेची वैशिष्ट्ये लक्षात घेऊन या पदांची पाठचिकित्सा करावयास हवी.''[९]

समर्थांच्या मराठी रचनेत लयबद्धतेचे महत्त्व विशेष आहे. ज्या हिंदी पदांसोबत मराठीप्रमाणेच रागनिर्देश मिळतो ती रचना अधिक प्रामाणिक मानावयास हवी. अनंतदासगाथ्यातील ७८ पदांबरोबर रागांचे उल्लेख आहेत.

**समर्थांचे रामदास्य**

महाराष्ट्र धर्माचे प्रमुख प्रणेते समजले जाणारे ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ आणि तुकाराम किंवा मराठी भक्तिपरंपरेतील अन्य संतभक्त सत्पुरुष आणि समर्थ स्वामी रामदास यांच्यातील एक मोठा फरक त्यांच्या नावातच दिसून येतो.

रामदासांचे नावातील 'दास' पद रविदास, कबीरदास, सूरदास, नंददास, तुलसीदास, मलूकदास अशा उत्तर भारतीय संतभक्तांशी त्यांचे नावापुरते का होईना, परंतु साम्य दर्शविणारे आहे.

रामदासस्वामींना आपण 'समर्थ' म्हणून सदैव गौरवितो पण ते मात्र स्वत:ला 'दास' अशा विनम्र पदानेच व्यक्त करीत. प्रखर उपासना म्हणजे रामदास्य. 'बहुज जनांस चालवी', 'नाना मंडळे हालवी' अशी समर्थ पदवी त्यांनी रामदास्याचे कठोर व्रत आचरून प्राप्त करून घेतलेली होती.

महाराष्ट्रातील बहुत जनांची भाषा मराठी आणि महाराष्ट्रमंडळाबाहेरील जनताजनार्दनाची वाणी हिंदी, या दोन्हींचा आधार समर्थांनी विवेकपूर्वक घेऊन 'ईश्वराचे मनोगत' बहुत जनांसाठी सादर केले.

'दीनदयाळ', 'भक्तवत्सल', 'शरणागतप्रतिपाल', 'पतितपावन' अशा अनेक बिरुदांनी मर्यादापुरुषोत्तमाचे स्मरण करीत त्यांनी आत्मोद्धारासाठी बहुजनवाणीत विनम्र प्रार्थना केली -

*ज्ञान न जानुं, ध्यान न जानुं । अंतर भाव न हो ॥*
*दान न दिया, धर्म न किया । मुक्तिकु जानत हो ॥*
*रामदास कहे मै तो ऐसा । फुकट खावन हो ॥*

आजीवन 'रामदास्य' आचरणाऱ्या समर्थांचे सारे जीवन राममय होते.

*राम जनीं राम वनीं ।*
*रामरुप हे अवनी ॥*

अशा प्रकारची विश्वात्मक अनुभूती त्यांच्या मनी सदैव जागी असे. त्यांच्या हिंदी वाणीतही नेमकी हीच मन:स्थिती प्रकर्षाने प्रकट झालेली आहे.

*जित देखो उत रामहि रामा ।*
*जित देखो उत पूरणकामा ॥*
*तृण तरुवर सातो सागर ।*
*जित देखो उत मोहन नागर ॥*
*जल थल काष्ठ पाखाण आकाशा ।*
*चंद्र सूरज नच तेज प्रकाशा ।*
*मोरे मन मानस राम भजो रे ॥*
*रामदास प्रभु ऐसो कियो रे ॥*

**श्रीरामाचे वर्णन**

रामभक्तिपर पदांचे कर्तृत्त्व समर्थांचेच असले पाहिजे याबद्दल शंका कमी राहते. कारण,

*मोरे मन मानस राम भजोरे ।*
*रामदासप्रभु ऐसो कियो रे ॥*

अशी त्यांची सांगी हिंदीतूनही आहे.

समर्थांच्या मराठी काव्यात दिसते, तशीच सगुणनिर्गुणाचा समन्वय साधून सांगितलेली भक्ती हिंदी काव्यातही आहे.

*दीनदयाल दया करो हो राम ।*
*यह संसार अपारको, जीत उदास भया ।*
*जानत जानत मानत मनकू, ऐसा काम किया ॥*
*दास दीन जन शरण तुमारो, कहत सब गया ॥*

सगुणाच्या माध्यमातून निर्गुणनिराकार ईश्वरत्वाचा साक्षात्कार घडवून घेण्याची त्यांची भूमिका इथे व्यक्त करण्याचा प्रयत्न दिसतो.

समर्थांच्या मराठी काव्यात रामाची, हनुमानाची उपासना मोठ्या प्रमाणात मिळते पण हिंदीत मात्र अशी 'संकटमोचन बलोपासकाची' अर्चना आढळून येत नाही.

*''राम न जाने नर जिया तो क्याजी।*
*वेद पुरानकी चर्चा घनी किया॥*
*और शास्तर पढ आया तो क्यां जी।*
*रामदास प्रभु आत्मरघुविर।*
*इस नयन नहिं छाया तो क्यां जी॥''*

या सिंधकाफी रागातील सुंदर पदात समर्थांनी तत्कालीन कर्मकाण्डप्रिय भक्तांना उद्देशून सवाल केला आहे. ईश्वराचे वास्तव स्वरूप जर जाणून घेतले नाही तर धनदौलत, राज्यसंपदा मिळवून अथवा गोकुळ, मथुरा, द्वारका, अयोध्या अशी नाना तीर्थे-क्षेत्रे हिंडून किंवा गंगा, रेवा, तापी, गोमती अशा पावन लोकमातांचे स्नान करून तरी काय उपयोग आहे?

*धन दौलत सब माल खजीना।*
*और मुलुख सर किया तो क्या जी॥*
*गोकुल, मथुरा, मधुबन, द्वारिका।*
*और अयोध्या कर आया तो क्या जी॥*
*गंगा, गोमति, रेवा, तापी।*
*और बनारस न्हाया तो क्या जीं॥*
*दवेश, देवडा, जंगम जोगी।*
*और कानपंडी हुआ तो क्या जी॥*

कानफाट्या साधूंचा हा उल्लेख तत्कालीन उत्तरभारतीय स्थितिगतीच्या संदर्भात महत्त्वाचा ठरतो. आजही उत्तरभारतामध्ये भक्तीच्या नावाखाली भाबड्या अवडंबरबाजीला महत्त्व दिले जाते. अंधश्रद्ध सर्वसामान्यांच्या भावनांशी खेळ करणारे मतलबी 'साधुसमाज' सुखाने राहतात. समर्थांचा त्यांना प्रश्न आहे -

*आत्मज्ञान की खबर न जाने।*
*और ध्यानन बक हुआ तो क्या जी?*

समर्थांनी आपल्या मराठी पदांतून 'राम' स्वरूप परमेशाची प्रार्थना गायिलेली आहे. हिंदी कवनात साधकाचा आत्मा आणि परमशक्तिमान ईश्वरीय तत्त्व यांच्या अभिन्नत्वाची, या अद्वैताची चर्चा आलेली आहे. ''जहाँ जाऊं ताहाँ रामहीरामा'' अशी अभेद स्थिती त्यांनी अनुभवलेली आहे.

''जित देखो उत रामहिंरामा'' या पदात समर्थांनी परब्रह्मवाचक रामाचे पूर्णकाम, मोहननागर, असे मनोज्ञ वर्णन करून तो जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणीच नव्हे, तर तृण, तरुवर, सप्तसागर

यातही भरून राहिल्याचे सांगितले आहे. सूर्य आणि चंद्र हे त्या रामाच्या तेजानेच प्रकाशंतात, नाचतात असे म्हटले आहे. म्हणून, हे मना, तू नित्य रामस्मरण कर अशी त्यांची शिकवण आहे.

*मोर मन मानस राम भजो रे।*
*रामदास प्रभु ऐसो करो रे ॥*

**श्रीकृष्णाचेही चित्रण**

समर्थांची कृष्णभक्तिपर कविताही हिंदीत मिळते. ती संख्येने अल्पच आहे. एकूणच मराठी संतांच्या उपलब्ध हिंदी कवितेत श्रीकृष्णभक्तीचे प्रमाण कमी दिसते.

"नयनभार ओकु सहिय न जाय। सुरत सुरत पीरत लगी" म्हणून "जियेको है सो जियेरा जाने।" अशी झालेली भक्तिप्रीतिमय अवस्था समर्थांनी वर्णिलेली आहे. त्यांची हिंदी गवळण म्हणते,

*बावरि भई तन मेरी ॥*
*जित देखूं तित ठाडे निरंजन, चमकत भूलि रही ॥*
*निरखत देखत मनमों, तन की सूधि गई ॥*
*दास के पास दयालकी मूरत, सबघट एक सही ॥*

ही मधुराभक्ती हिंदी कृष्ण भक्तिकाव्याशी जवळीक सांगणारी आहे. समर्थांचा काळ आणि त्यांचे उत्तरेतील परिभ्रमण ध्यानात घेतले की या कवितेचे मर्म समजते. कृष्णाचे रूपरसपान करणारी राधिका, समर्थांनी, निरंजनस्वरूप अन् सर्वाठायी विद्यमान परम शक्तिमानाशी समरस होऊन जाते असे दाखविले आहे. अशी पदे पाचच आहेत, पण ती रचनादृष्ट्या सरस उतरलेली आहेत. आणखी एक उदाहरण पाहा.

*भावनहार की प्रीत ॥*
*बन्सी बजावे सरस रस गावे। चपल मनकी रहे गत हो ॥*
*रैन दिन नैननभो आनन। श्यामसुंदरकी मूरत हो ॥*
*बहुरंग नाटक रंग जगावे। दास सज्जन जन रत हो ॥*

अशी ही भावनहार श्यामसुंदराची प्रीत आणि सज्जन 'दास' भक्ताचे त्या बहुरंगी नाट्याशी तन्मय होणे कधी अशाही रंगतदार पद्धतीने व्यक्त होते.

*पीरत लागी रे माथो पीरत लागी रे।*

पण समर्थ लगेच असेही सांगून टाकतात,

*और पीरतसे मनसा भागी।*
*रामचरण चित लागी ॥*
*तेरो नाम उचारे संसारमय।*
*मोको सुधि नाहि मेरे तनकी ॥*

पुढे समर्थ "गृह, दारा, धन, जोरी" यांचा उल्लेख करून "भावत नाही घरबार" किंवा "धनजीवनसो कछु नहिं भावे" अशी कबुली देतात.

**धार्मिक एकतेचा पुरस्कार**

हिंदूपदशाहीच्या निर्मितीसाठी छत्रपती शिवरायांच्या कार्य-कर्तृत्त्वाचे प्रशंसा-गायन करणारे आणि "औरंग्या पापी बुडाला" म्हणून आनंदवनभुवनाचे स्वप्न खरे ठरेल म्हणणारे समर्थ रामदास आपल्या हिंदी कवनात 'अल्लाह' आणि 'निरंजन' यांचे एकत्व सांगतात. 'अल्ला निरंजन दोऊ नाहीं रे।' असे समजावून देतात.

विश्वात्मक सर्वव्यापी तत्त्व सगुणनिर्गुणाच्या अतीत आहे. साऱ्या जिवांमध्ये शिवाचा अंश आहे असे प्रतिपादन जसे दासबोधात सापडते तसेच ते हिंदी रचनेतही आढळते. समर्थ लिहितात,

*सब घटमें है रे खुदाई ॥*
*खाली जागा नहिं रे खुदा बिन, जानत नाहीं रे ।*
*झूटी कहे सो झूटी दिवानी, खबर नहीं पाई रे ॥*
*दास फकीर कहे इतनाही, अंतर माहीं रे।*

कधी "याद करो अल्लाकी" असाही उपदेश समर्थ करतात. आणि पुढे अल्लाह आणि ईश्वर हे दोन नाहीत, ही वस्तुस्थिती "समजत समजनहारे" असेही बजावावयास ते विसरत नाहीत.

हिंदू-मुस्लिम ऐक्याची भावना संतनामदेव आणि संतएकनाथ यांच्याही हिंदी रचनेत आढळून येते. गुरुग्रंथसाहेबामध्ये समाविष्ट असणाऱ्या नामदेवांच्या एक 'शबद' किंवा पदातील हा उल्लेख पाहण्यासारखा आहे :-

*हिंदू अन्हा तुरकू काणा ।*
*दुहा ते गिआनी सिआणा ॥*
*हिंदू पुजे देहुरा मुसलमाणु मसीत ।*
*नामे सोई सेविआ जहे देहुरा न मसीत ॥*

संत एकनाथांनीही हिंदू-मुसलमानांच्या संघर्षाचा विचार समाजसुधारक वृत्तीने केलेला दिसतो. 'हिंदू तुर्कसंवाद' नामक एका नाट्यमय प्रकरणात त्यांनी हिंदू आणि मुसलमान यांचे आपापल्या धर्माचा मोठेपणा मांडणारे संभाषण रंगविले आहे. अखेर अहमहमिकेतून विवाद उत्पन्न होतो तेव्हा नाथ दोहोंना समजावितात.

*ब्राह्मण म्हणे अहो जी स्वामी । वस्तुत: एक आम्ही तुम्ही ॥*
*विवाद वाढला नीती धर्मी । जत परब्रह्मी असे ना ॥*
*तुरूक कहे बात उसही । खुदाकू जो जात नाही ॥*
*बंदे खुदा से बीवी जुदाई । ये बात तुम सही समजो ॥*

"रे भाई गैबी मरद सो न्यारे" या काफी रागातील पदात समर्थांनी 'गैबी' म्हणजे

परोक्षज्ञानाची प्राप्ती झालेल्या साधकाचे वर्णन केलेले आहे.

*रे भाई गैबी मरद सो न्यारे । वे ही अल्लामिया के प्यारे ॥*
*देहरा तुटेगा, मशिदी फुटेगा । लुटेगा सब हय सो ॥*
*लुटत नहीं, फुटत नहीं । गैबी सो कैसो रे भाई ॥*

ईश्वरानुभूतीमुळे साधक निश्चिंत होतो. जगातील साऱ्या गोष्टींचा नाश झाला तरी त्याला अमृतत्व मिळते. याच पदामध्ये पुढे मानवी समतेचा सुस्पष्ट उच्चार समर्थांनी केला आहे. हिंदू आणि मुसलमान हे दोन वेगवेगळे धर्म असले तरी सर्वांचा सृष्टिकर्ता ईश्वर एकच आहे. आपण सारे एक ना एक दिवस जाणार पण तो मात्र अनंत कालापर्यंत असणार आहे. ''हक सो इलाही रे!'' समर्थ सांगतात.

*हिंदू मुसलमान मज्यहब चले । येक सिरजन हारा ॥*
*साहब अलम कुं चलावे । सो अलम से न्यारा ॥*
*अलम एक आखिर येक । दोऊ नहीं रे भाई ॥*
*हम भी जायेंगे, तुम भी जायेंगे । हक सो इलाही रे ॥*

''जनहरा समजनहारा । समजनहारा पियारा'' या पदातही पीर अर्थात ईश्वरनिष्ठ साधकाशिवाय अन्य सारे संसाररूपी मायापाशात गोते खातात. मालमुलूख वैभव सगळे मिळाले तरी निराशा पदरी येते हे समजावून देत समर्थ लिहितात,

*हिंदू मुसलमान चामके पुतले गेब चलावनहारा ।*
*बंदे कमीन कहे समजें सो अल्लमिया का प्यारा ॥*

अस्थिचर्ममय देहाच्या मर्यादा जाणून आणि सृष्टीच्या नियंत्याचे सामर्थ्य मानून जे 'अल्लामिया' चे स्मरण करतात तेच तरून जातात.

परब्रह्माच्या स्वरूपाचे आकलन झाले की अमरत्व मिळते, या उपनिषदीय सूत्राचा मराठी वा हिंदी संत सत्पुरुषांनीं पुन:पुन: उच्चार केलेला आहे. 'सिरजनहार' अर्थात सृष्टीचा निर्माता एकच 'अल्लाहमिया' आहे ही भावना

*घट घटमें वह सांई रमता, कटुक वचन मत बोल रे।*

अशा सुंदर शब्दावलीत कबीरदासांनीही व्यक्त केलेली आहे. समर्थांनी अशाच प्रकारची शब्दावली अनुसरून म्हटले आहे :

*घट घट साहिया रे । अजब अलामिया रे ॥*

**उर्दूमिश्रित हिंदी काव्य ?**

डॉ.वि.श्री. वाकणकर यांनी समर्थवाग्देवता मंदिरातील एका बाडाच्या आधारे समर्थांच्या उर्दूयुक्त हिंदी काव्याचा परिचय करून दिलेला आहे. [१०]त्यातील काही वानगीदाखल ओळी अशा :

*खुदा को न बंद कहो ये ही कैसे ।*

*समज बिन फकीरी करे वो तमाशा ॥*
*पीरोके ही मुंहसे भला खोज लेना ।*
*कहो रामदासा जरा ढील न करना ॥*
*खुदा के ही वास्ते फकीरी ही लेना ।*
*सबोसे भलाई, लडाई न करना ॥*

या रचनेविषयी डॉ. वाकणकरांचा अभिप्राय असा आहे, "संभव है उन दिनों हिंदुओंके समान मुसलमान भी समर्थ रामदासजी के प्रवचनों को सुनने आते हो ओर उस समाजकी ओर भी उन्होने उपेक्षा नहीं की अपितु उन्हीं की भाषाओमें उन्हे भी योग्य मार्गदर्शन किया।" [११]

मुसलमानांना उद्देशून लिहिलेल्या उपेदशपर रचनेव्यतिरिक्त शिवाजी महाराजांची गौरवगाथाही समर्थांनी उर्दूमिश्रित शब्दात वर्णिलेली आहे :-

*तडक की कडक मे धडक सो मर्दमे ।*
*गर्द ही गर्द आसमान तारे ॥*
*सरकते धरकते फरकते झरकते ।*
*करर करर करर ते बाण सारे ॥*

ब्रजभाषेत 'शिवराजभूषण', 'शिवाबावनी' अशी शिवचरित्रपर उत्कट वीरकाव्य रचना करणाऱ्या हिंदी कवी भूषणाची आठवण करून देणारी ही कविता आहे.

*वार ही वार वर वार तरवार के ।*
*पार ही पार आर पार भारे ॥*
*चिरिरि चिरिरि चिरिरि, चिरिरि, भिरिरि*
*भिरिरि भिरिरि सिरिरि सिरिरि*
*सिरिरि रुधिर धाटे ।*
*वटक मे कटक तट हटक मे हटक टट ।*
*झटक मे झटक झट झटक पुकारे ॥*
*तब बाजने रण तूर भीडते रण सूर पर ।*
*दल्ल चक चूर-हास सारे ॥*

सारी रचना अशी वीररसाने रससरलेली आहे. रणमैदानावरील तलवारबाजीचा खणखणाट किंवा तोफगोळ्यांचा दणदणाट उडाल्याचा आभास व्हावा, अशी सारी शब्दफेक आहे. साध्या सुबोध संस्कृत शब्दांचा प्रभाव साधण्यासाठी केलेला प्रयोगही समर्थांच्या भाषाप्रभुत्वाचा परिचायक आहे.

समर्थांच्या स्फुट कवितेपैकी 'मनाचे श्लोक' उर्दूतूनही मिळतात. हे समर्थांचे लेखन नाही. सुमारे अडीचशे वर्षापूर्वी मद्रासकडील शहा तुराब चिश्ती या मुसलमान कवीने मनाच्या श्लोकाचे मूळ वृत्तातच भाषांतर केले आहे. हे भाषांतर (डॉ. अब्दुल सत्तार) दळवी यांनी संपादित स्वरूपात प्रकाशितही केले आहे. [१२]

मराठीच्या मिश्रणाने महाराष्ट्रात तयार झालेल्या दक्खिनी हिंदी भाषेची अनेक रूपे या समर्थ हिंदीत दिसतात. मनकू, जाकू, ताकू, अलमकु, मोकू, आखर, जिकीर, कुबाता, पीरत, मिलाव, बताव, दिखाव अशी अनेक उदाहरणे देता येतील.

बेगी, मेंदू, घटका, शास्तर, निरखत, धुंडित, तडंक, कडक, धडक, आकाशा, पीरत, ज्यागा, खावतु, गावतु, वाजतु, फुकट, सूधि, ढील, समज, खजीना, गाफिलपणा, मुलुख, ध्यानन, पसारा, विख, मोडे, फोडे, चक्कित, धुंडत, घटका असे असंख्य मराठी शब्द या पदावलीत जागोजागी आलेले आहेत. त्यामुळे हे काव्य महाराष्ट्रीय रामदासांचे आहे, याबद्दल शंका उरू नये.

**उपदेशपर रचना**

मराठी संतकवींचे हिंदी काव्य प्राधान्याने उद्‌बोधनात्मक आहे. आक्रमकांच्या क्रौर्यामुळे आणि आपापसातील भेदाभेदांमुळे हताश झालेल्या सर्वसामान्यजनांना भक्तिमार्गी, नीतियुक्त जीवन जगणे, नामस्मरणाद्वारे एकाग्रता साधणे, कर्तव्य आणि उपासना यांचा मेळ बसविणे अशा अनेक कारणांस्तव संतसत्पुरुषांनी हितोपदेश केला. समर्थ रामदासांचे उपलब्ध हिंदी पद-साहित्य याला अपवाद नाही.

संसाराचे असारत्व समर्थ मोठ्या प्रभावी पद्धतीने स्पष्ट करतात. 'काय भुलल्यो संसार मन रे' या पदात जीवनातील एक एक घडी मोलाची असते, परंतु माणसाची फसगत कशी होते, ते खुमासदार शैलीत वर्णिले आहे:

*धन जोबन का संग पकरी ।*
*ये कोउ नहीं उतरे पार ॥*
*जानत जानत मूरख भयो है ।*
*केता कहूं बारं बार ॥*

मानवी जिणे हे 'दो दिननका सांगात' असून शेवटी साऱ्यांनाच त्याग करून 'छोरी अकेला जात' हे वास्तव स्वीकारावे लागते. हेही त्यांनी एका पदात चांगल्या रीतीने पटवून दिले आहे. त्यात यौवनाच्या उन्मादाबद्दल ते लिहितात:

*जानि दिवानी बाबा जानि दिवानी ॥*
*भली न माने बुरी न माने । बात गुमानी रे ॥*
*जानीमें जन अकल नवावे । जिकिर न मानी रे ॥*
*दास फकीर कहे मन धीर ।*

एखाद्याने भरपूर पैका कमवावा, मुलुख मिळवावा, पण राम न जाणावा. एखाद्याने काशी, द्वारका, अयोध्या आदी तीर्थे फिरावीत आणि गंगेसारख्या पवित्र नद्यांचे स्नान करावे, पण राम विसरावा. त्याचे जीवन व्यर्थ होय. एकूण बाह्यावडंबरच अनावश्यक हे समजावून देताना समर्थ लिहितात,

*धन दौलत सब माल खजीना ।*

*और मुलुख सर किया तो क्या जी ॥*
*गोकुल मुथरा मधुबन द्वारका ।*
*और अयोध्या कर आया तो क्या जी ॥*
*दरवेश शेवडा जंगम जोगी ।*
*और कानफाडी हुआ तो क्या जी ।*
*आत्मज्ञानकी खबर न जाने ।*
*और ध्यानन बक हुआ तो क्या जी॥*

आत्मज्ञान आणि प्रभुरामासारख्या आदर्श पुरुषोत्तमाचे ध्यान याशिवाय नरजन्म कृतार्थ होत नाही. वेदविद्यांचा मोठा व्यासंग केला, शास्त्रपुराणांचा पाठ केला, पण राम हृदयात सामावलाच नाही. तर मग सारे व्यर्थ नव्हे का ? या पदात जी 'क्या जी ?' अशी प्रश्नवाचक पृच्छा आहे, ती समर्थांची खास शैली प्रकट करणारी आहे, श्रोत्यांशी जवळीक साधणारी आहे :

*वेद पुरान की चर्चा घनी है ।*
*और शास्तर पढ आया तो क्या जी ॥*
*रामदास प्रभु आत्म रघूविर ।*
*इस नयन नहिं छाया तो क्या जी ॥*

**आत्मानुभवाचे आगळेपण**

एका हिंदी पदात समर्थांनी प्रभूरामाच्या वैभवशाली राजदरबाराचे चित्र रेखाटले आहे.

*रघुनाथ के दरबार घमडी गाजतु है ।*
*तत्थै थै थै परववाज बाजतु है ॥*
*सुरवर मुनिवर देखन आवतु है ।*
*नारद किन्नर सुरवर गावतु है ॥*
*शंख भेरि सुनिके राम थिरक्तु है ।*
*लाल धूसर तबके उडावतु है ।*
*रामदास तहाँ बलि जावतु है ॥*

या पदातील वर्णन वरवर पाहता जसे रामदरबाराचे भासते तसे ते नसावे. आध्यात्मिक दिव्य अनुभूतीतून उद्‌भवले ते आगळे विश्व मन:चक्षूंसमोर कसे उभे आहे याचे हे रूपकात्मक अंकन आहे. सद्‌गुरूच्या कृपाप्रसादाने 'डोळियांचे डोळे' उघडले आणि दिव्य प्रकाश, अनाहत नाद अनुभवाला आला, असा येथे आशय आहे.

'अलख निरंजन सबजन गाँही', जित देखो उत मोहन नागर', 'घट घट मेरा साहिया', 'दासके पास दयालकी मूरत । सब घट एक सही', अशी समर्थांची वैश्विक उपासना-दृष्टी आहे.

'जहाँ जाऊ तहाँ राम ही राम', किंवा 'जहाँ देखू तहाँ प्रकट गोसाई' अशी गोस्वामी

तुलसीदासांच्या 'सीयाराममयसबजग जानी' सारखीच विश्वानुभूतीची समर्थांची अभिव्यक्ती आहे. कधी कधी त्यांची हिंदी रचना अतिशय समर्पक शब्दात अर्थघन स्वरूपात अवतरलेली आहे :

उदाहरणार्थ,

*अजब मूरत सब घटमें रहतु है ।*
*बोलत चालत सखि हसतु खेलतु है ॥*
*चंचल चपल लीला आवतु जावतु है ।*
*सुनत देखत सब रसमें बसतु है ॥*
*नरसुरमुनिवर सबके अंतर है ।*
*दासन के आसपास उदास रहतु है ॥*

या ठिकाणी आलेली नाममुद्राही लक्षणीय आहे. 'उदास' हा समर्थांच्या आवडीनिवडीचा शब्दही येथे 'दास' पदासह आहे.

समर्थांनी आत्मसंवादाच्या धर्तीवर केलेला व्यावहारिक लोकोपदेश अनेक अभंग-पदातून मिळतो :

*मन में की एकी बेकी । एकी बेकी फुकी ॥*
*एक बतावे बेक बतावे । हक सो खातिर ल्यावो ॥*
*अकलबंद सो लेता पंद । बंद समज्यावे बंद ॥*

या ठिकाणी केलेली शब्दांची कसरत, त्यासाठी पत्करलेली अर्थहानीही स्पष्ट आहे. वस्तुत: समर्थांच्या हिंदी काव्यातही काव्यापेक्षा वैचारिकतेलाच प्राधान्य आहे. रामाबरोबर हनुमानाची अर्चना नसली तरी सगुणाकडून निर्गुणाकडे आणि त्यायोगे वैश्विक अनुभूतीकडे जाण्याची वृत्ती आहे. तत्कालीन हिंदी काव्याचे अतिशृंगारिक वळण पाहता हिंदी कवितेचे महत्त्व विशेषत्त्वाने जाणवावे असेच आगळे आहे, पण समर्थांचे खरे सामर्थ्य प्रकट करणारा जीवनव्यवहाराचा प्रवृत्तिपर विचार किंवा राजकारण यांची सांगड घालण्याची त्यांची वैशिष्ट्यपूर्ण शैली मात्र त्यांच्या नावावर उपलब्ध असलेल्या हिंदी काव्यात आढळून येत नाही.

१. आचार्य विनोबा भावे यांनी समर्थांच्या काव्यासंबंधी मार्मिक विवेचन करून त्यांची मराठी भजने संपादिलेली आहेत. परंतु त्यात हिंदी रचनेचा अंतर्भाव नाही. / 'रामदासांची भजने', परंधाम प्रकाशन, पवनार.

२. आचार्य विनय मोहन शर्मा यांच्या ग्रंथात समर्थांच्या पाच हिंदी पदांचा समावेश आहे / 'हिंदीको मराठी संतोंकी देन' बिहार राष्ट्रभाषा परिषद, पाटणा १९५८ पृ. ३४१-४४. डॉ.यू.म. पठाण यांनी लिहिलेले समर्थांच्या काव्यावरील दोन हिंदी-मराठी लेख लक्षणीय आहेत.
'मराठी संतोंकी हिंदी वाणी' (सं.आ.प्र. दिक्षित) पंचशील प्रकाशन, जयपूर. १९८१ पृ. ११८-१३५

(यात २५ पदेही दिली आहेत.) 'समर्थ दर्शन' (मुद्गल /कावळे /कुलकर्णी), कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे १९८२ पृ. १५३-१६२.

३. 'हिंदी और महाराष्ट्र का स्नेहबंध' / अशोक कामत / महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, पुणे. १९७१ / 'समर्थ रामदासकी हिंदी वाणी' लेख. पहावा.

४. 'महाराष्ट्र का नाथपंथीय हिंदी काव्य' / अशोक कामत / जवाहर पुस्तकालाय, मथुरा १९७५ / उपसंहार.

५. समर्थांच्या उत्तर-यात्रेचा तपशील त्यांच्या चरित्र-लेखकांनी सादर केलेला आहे. / 'श्रीसमर्थ चरित्र', स.खं. आळतेकर. पृ. ८५ 'समर्थ - प्रताप' / अध्याय १०-११

६. प्रस्तुत संदर्भात डॉ. रा.चिं. ढेरे यांनी जे टिपण लिहिले आहे. ते नव्या दिशा सूचित करणारे आहे. / 'इंद्रायणी' डिसेंबर १९६२.

७. मराठी वाङ्मय कोश खंड १/ (नोंद- लक्ष्मणशास्त्री जोशी) पृ. ३०७

८. समर्थांची हिंदी पदे संपादित स्वरूपात 'युगप्रभात' (कालिकत, केरळ) या हिंदी पाक्षिकातून दि. १ डिसेबंर १९६९ ते १ मार्च १९७० या काळात प्रस्तुत लेखकाने मुद्रित केली आहेत.
प्रा. सुमन केळकर, हैद्राबाद यांनी 'श्रीसमर्थ रामदास्वामींची हिंदी रचना' या शीर्षकाने एक छोटी पुस्तिका प्रकाशित केली आहे. (प्रकाशक, साहित्यसार केंद्र, नागपूर, १९८१) या पुस्तिकेस डॉ.अ.ना. देशपांडे यांनी प्रस्तावनेत प्रबंध म्हटले आहे.
समर्थांच्या त्रिशती जन्म वर्षांच्या निमित्ताने प्रकाशित झालेल्या पुस्तिकेत पूर्वप्रकाशित लेखांविषयींची माहिती नसल्याचे दिसते.

९. 'समर्थ दर्शन' (मुद्गल / कावळे / कुलकर्णी) १९८२ पृ. १५३.

१०. 'शिवसमर्थ स्मरण मुद्रा' / संपादक : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, पं : अमरेंद्र गाडगीळ / स.रा.सं.प्र. पुणे. १९८२ पृ. १९२ / ७

११. तत्रैव पृ. १९२ / ८

१२. 'मनसमझावन' हिंदुस्थानी ॲकॅडमी प्रकाशन, मुंबई.



# समर्थवाणीतील काही उक्तिविशेष १४

---

नुकतीच महाराष्ट्रात अनेक ठिकाणी दासनवमी साजरी झाली. समर्थ रामदासांचे स्मरण समर्थ सांप्रदायिकांनी निष्ठापूर्वक केले. पण समर्थ हे केवळ एकाच सांप्रदायाच्या स्मरणाचा विषय ठरावेत काय? वस्तुत: समर्थ रामदासांच्या वाङ्मयातून साकारणारे त्यांचे बरेचसे विचार-विश्व हे चिरंतन मार्गदर्शन करणाऱ्या एखाद्या प्रकाशस्तंभासारखे आहे. ते साऱ्याच समाजास उपयोगी ठरणारे आहे.

अद्वैताचे तत्त्वज्ञान आणि भगवद्भक्ती तर त्यांच्या साहित्यात आहेच. पण त्याच्या जोडीला देशाच्या उभारणीला उपयोगी ठरेल, अशी वैचारिक शिदोरीही तेथे आहे.

मर्यादापुरुषोत्तमाचे आदर्श वर्तन, महाबली हनुमंताचा शक्ति-भक्तिसमन्वय हे समाजासमोर ठेवून समर्थांनी शिवराज्याचा आधार असलेली जनशक्ती जागविण्याचा मोठा प्रयत्न केला.

समर्थ अनासक्त कर्मयोगी होते. द्रष्टे सत्पुरुष होते. त्यांच्या कित्येक वचनांतून आजच्या समस्यांचेही काही समाधान सापडू शकेल असे प्रस्तुत लेखावरून आपल्या ध्यानी येईल.

---

## उपोद्घात

समर्थ रामदासांच्या वाङ्मयधनाचा विचार करतांना आचार्य विनोबाजींनी मोठी मार्मिक दृष्टी दाखविलेली आहे. त्यांचे म्हणणे संक्षेपाने असे:

..लहानपणी रामदासांचे वेड होते. त्यावेळी जणू ते आदर्शमूर्ती वाटत. त्यांच्या साध्या लिखाणामुळे आपला आध्यात्मिक लिखाणाकडे नकळत कल झाला. पुढे, मागे जात जात ज्ञानदेवांपर्यंत आणि नंतर वेदापर्यंत अभ्यास केला, अन्य धर्मांचे नि पंथांचे वाङ्मय वाचले तेव्हा विचारांचे पचन झाले. सार ग्रहण झाले. असार गळाले. म्हणून रामदासांचे जेव्हा स्मरण होते तेव्हा "आई थोर तुझे उपकार" एवढाच उद्गार स्फुरतो.

पुढे विनोबा रामदासांच्या लेखनाबद्दल परखडपणे लिहितात:

"रामदासांनी लिहून तर पुष्कळ ठेवले आहे. परंतु असार सोडून सार घ्यावे हे त्यांच्या सर्व लिखाणाचे सार आहे. किंबहुना ही त्यांची आज्ञा आहे. तदनुसार त्यांचे लिखाण चाळून पाहता त्यातला पुष्कळ अंश सहजच गळून पडणारा आहे."[१]

आचार्यांचे हे म्हणणे कुणाला पटो न पटो, समर्थांच्या विचारविश्वात शिरून त्यातील उक्तिविशेषांचा आजच्या संदर्भात शोधबोध घेण्यासारखा आहे.

**तारुण्यींच उठाउठी !**

संतांना टाळकुटे आणि पलायनवादी ठरविणारे लोक प्राय: हे विसरतात की, बहुतेक संतसत्पुरुष योगाबरोबर उद्योगही करणारे होते. सावता माळी होते. गोरोबा कुंभार होते. नरहरी सोनार, नामदेव शिंपी, तर सेना न्हावी होते. एखादाच विरळा संत केवळ कीर्तनकार होता. बहुतेक संत प्रापंचिकही होते. प्रपंच आणि परमार्थ यांची सांगड त्यांनी आपल्या जीवनात घालून दाखविली आणि प्रपंचातील सुखदु:खांचा सहजपणे स्वीकार केला. संतांनी संन्यास मार्गाचा कधीच पुरस्कार केला नाही.

आज आपण काय पाहतो ? संतसाहित्याकडे कोण बरे वळतात ? बहुधा निवृत्त मंडळी संतांचे वाङ्मय वाचतात. श्रवण करतात. नव्या पिढीला संतवाणीविषयी फारशी आस्था दिसत नाही. संतांनी मात्र दंतपंक्ती वाजायला लागल्यानंतर निवृत्तीच्या काळातील विरंगुळा म्हणून परमार्थमार्गाचे अनुसरण केले नाही. ज्ञानदेवादी भावंडांनी तर पंचविशीच्या आतच वैश्विक प्रपंच करून जगाचा निरोप घेतला. संत नामदेव, संत एकनाथ, संत तुकारामदेखील ऐन तारुण्यातच अलौकिकाचा वेध घेतात आणि ''आकाशाएवढे'' होतात. समर्थ रामदासही बालपणापासून ''चिंता करितो विश्वाची'' असा ध्यास घेतात. त्यांची सांगी आहे :

*देहयाचा भर्वसा नाहीं । तारुण्य चळतें जनीं ।*
*वृधापीं विटंबे काया । रुप विद्रूप होतसे ॥*

एकीकडे अशाप्रकारे स्वच्छ शब्दात देहाची अखण्ड नश्वरता समर्थांनी स्पष्ट केली आणि साऱ्यांसाठी संदेश दिला :

*ऐसे हे दु:ख वृधापीं । कळलें पाहिजे जना ।*
*परत्र साधणें आधी । तारुणींच उठाउठी ॥*

- जी काही परमार्थसाधना वा सेवा करावयाची ती निम्म्या गोवऱ्या गेल्यानंतर करू नये. तरुणपणीच सदाचरण अंगी बाणले पाहिजे आणि काही स्वत:बरोबर आपण दुसऱ्यासाठीही जगले पाहिजे.

तारुणींच'' म्हणजे उमेदीच्या काळातच, ''उठाउठी'' - अर्थात ध्येयमार्गाकडे वाटचाल करायला हवी.

संतांनी संन्यासाश्रमापेक्षा गृहस्थाश्रमाची प्रतिष्ठा मोठी मानली. समर्थांनी तर प्रवृत्तिमार्ग अधिक महत्त्वाचा हे सांगून नरदेहप्राप्तीची महतीही स्पष्ट केली :

*नाना सुकृताचे फळ । तो हा नरदेह केवळ ।*
*त्याही मध्ये भाग्य सकळ । तरीच सन्मार्ग लागे ॥*

मोठ्या भाग्याने मिळणाऱ्या मानवजन्मात सन्मार्गरत राहणे कसे आवश्यक हे समर्थांनी नानाप्रकारे ठसविले आहे. प्रत्येकाने काया वाचा मनेकरून समर्पित भावाने कर्तव्ये पूर्ण

करावीत असा समर्थांचा आदेश आहे. ते म्हणतात,

*काया, वाचा आणि मनें। पत्रे, पुष्पे, फळे जीवनें।*
*ईश्वरी अर्पूनियां मनें। सार्थक करावे॥*

समर्थांचा हा संदेश ज्यांनी आपल्या वृत्तीत बाणविला त्यांनी शिवरायांच्या हिंदवी स्वराज्याच्या जडणघडणीत महत्त्वाची भूमिका बजाविली.

**जीवसृष्टी विवेके चाले!**

समर्थांचा बराच भर व्यवस्थेवर आहे. त्यांना सृष्टीच्या सर्व व्यापारात संगती दिसते. ते सतत प्रबंध अथवा योजकतेचे महत्त्व सांगतात.

कधी अतिशय साधे उदाहरण देऊन जनांना भानावर आणण्याची समर्थांची हातोटी तर विलक्षण आहे:

*पर्णाळी पाहोनि उचले। जीवसृष्टी विवेकें चाले।*
*आणि पुरुष होऊनि भ्रमले। यासी काय म्हणावे॥*

लहानशी अळी असते. ती पाने खाते. पण कशी? प्रथम ती पानावर अगदी अलगद आरुढ होते. सतत अंदाज घेत मोठ्या योजनेने ती हळुहळू पण निश्चित दिशेने जात राहते. माणसे मात्र कसेतरी वागतात. ''पुरुषार्थ'' विसरतात. भ्रमल्यासारखे करतात. भांबावून जातात. गोंधळतात. याला काय म्हणावे?

हा नित्य व्यवहारातील असा चपखल दाखला दिल्यानंतर आणि परखड शब्दात दोषदिग्दर्शन केल्यावर समर्थ विज्ञानाचा एक महान सिद्धान्त सांगतात: ''जीवसृष्टी विवेकें चाले!'' सृष्टीतील लहानसहान जीव सुद्धा विवेकी आहे. विचारी आहे. कसेतरी, काहीतरी, केव्हातरी सृष्टीत घडत नाही. म्हणून ''विवेक'' हाच जीवसृष्टीतील प्रत्येकाचा आदर्श असायला हवा. ''जनामध्ये सार्थकता विचारेचि होये'' हे आपण निरंतर ध्यानात ठेवायला हवे.

**प्रपंच नि परमार्थ विवेक**

दासबोधाच्या बाराव्या दशकातील पहिला समास विवेक-वैराग्य लक्षणांचा आहे. समर्थ युगापर्यंत संतांनी प्रपंचापेक्षा परमार्थावर अधिक भर दिलेला दिसतो. समर्थांनी स्वत: प्रपंच केला नाही. त्यांनी परमार्थच पूर्णपणे केला. पण परमार्थ काय नि प्रपंच काय दोन्ही मध्ये ''विवेक'' हाच सर्वात महत्त्वाचा असतो हे त्यांचे सतत प्रतिपादन राहिलेले आहे.

प्रपंच आणि परमार्थ हे एकमेकांना पूरक ठरू शकतात. प्रपंचासाठी लागणारे गुण परमार्थसाधनेतही उपयुक्त ठरतात, असा एक आगळाच विश्वास समर्थांनी समाजात जागविण्याचा प्रयत्न केला. आपल्या थोर संतमहात्म्यांच्या परंपरेत राहून समर्थांनी हे जे ''काही नवेच'' केले, सांगितले, ते त्यांचे वेगळेपण नि द्रष्टेपण सिद्ध करणारे आहे.

विवेकाने दूरदृष्टी मिळते. सावधपण येते. यातून प्रपंचही सुकर होतो. परमार्थाकडे वाटचालही सहज वाटू लागते. हे प्रपंच परमार्थाचे ''विमळ लक्षण'' सांगतांना समर्थ म्हणतात:

*आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका ।*
*येथे आळस करूं नका । विवेकी हो ॥*
*प्रपंच सोडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल ।*
*प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ॥*
*प्रपंच सोडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला ।*
*मग तया करंट्याला । परमार्थ कैचा ॥*
*परमार्थ सांडूनि प्रपंच करिसी । तरी तू यमयातना भोगिसी ।*
*अंती परम कष्टी होसी । यमयातना भोगिता ॥*

(दा. १२.१.१-४)

माणसाने आधी आपला प्रपंच व्यवस्थितपणे कसा केला जाईल ते पाहावे. अर्थात विवेकाने प्रपंचातील कर्तव्ये पूर्ण करावीत. नंतरच आपल्या विवेकाला परमार्थाकडे वळवावे. असे करतांना आळस करू नये. चूक करू नये. जर प्रपंच टाळून परमार्थाकडे तुम्ही वाटचाल केलीत तर तुम्ही दुःखी व्हाल. पण जर का प्रपंच अन् परमार्थ दोन्ही योग्य रीतीने चालविलेत, तरच तुम्हाला खरे विवेकी म्हणता येईल.

क्षणिक विरक्ती वाटू लागली म्हणून परमार्थाचा मार्ग स्वीकारावा तर "अन्न मिळेना खायाला" अशी दुरावस्था होईल आणि प्रपंचाप्रमाणे परमार्थाचाही वैताग वाटेल. असेही सांगायला समर्थ मागेपुढे पाहात नाहीत.

परमार्थाचा अजिबात विचार सोडून फक्त प्रपंचच आवडला तरी काही खरे नाही. एकेक यमयातना भोगण्याचा प्रसंग येतो! पण परमार्थसाधन हे साऱ्यांचे काम नाही असेही समर्थांना ठामपणे वाटते:

*नाना वेश नाना आश्रय । सर्वांचे मूळ गृहस्थाश्रम ।*
*जेथे पावती विश्राम । त्रैलोक्यवासी ॥*

(दा. १४.७.१)

बहुतेक सारे सामान्यजन, गृहस्थाश्रमाचा आनंद अनुभवणारे असतात. त्यांचा हा मार्गही सुखाचा व्हावा असे समर्थांना वाटते. म्हणून "उपासनेला दृढ चालवावे", "सन्मार्ग तो जीवीं धरणे", "अवमार्गाचा त्याग करणे" अर्थात् सर्वतोपरी सदाचरणावर भर देणे, हे प्रापंचिकांचेही प्राथमिक कर्तव्य आहे असे समर्थांना वाटते.

*प्रपंच सुखें करावा । परी परमार्थ वाढवावा ।*
*परमार्थ अवघाचि बुडवावा । हे विहित नव्हे ॥*

(दा. ५.३.१०३)

असेही बजावावयास समर्थ विसरत नाहीत. आळशीपणा झटकून टाकून, प्रयत्नवादाची सतत कास धरून, विवेकाने आणि चिकाटीने प्रपंच प्रथम, मग परमार्थ साधण्याची सवय केली तर आपला आणि आपल्याशी संबंधित सर्वांचा - म्हणजे पर्यायाने साऱ्या समाजाचाच

उद्धार होतो, प्रगती होते. ''उभय लोक संतुष्ट होतो'' असा समर्थांचा सुस्पष्ट सांगावा आहे.

**''मोकळी वृत्ती असिली पाहिजे!''**

संसार हा मुळातच नासका आहे. अर्थात् सुखदु:खाने भरलेला आहे. तो केव्हा उघडा पडेल, याचा नेम सांगता येत नाही. असा समर्थांचा अनुभव आहे. ते सांगतात :

*संसार नासका आहे। विटंबे भलते सवा।*
*मन तें सांवरेना कीं। उभाउभी खडाखडी॥*

संसारापासून सामान्य माणसांचे मन काही सुटत नाही. नित्य त्यातच बुडून बसते. पण त्यातील संघर्ष दु:ख कमी करण्याचा एक नामी उपाय असतो. आपली वृत्ती मोकळी ठेवणे, हा तो उपाय होय! समर्थ म्हणतात :

*यालागीं मोकळी वृत्ती। असिली पाहिजे सदा।*
*धन्य ते जाणती ज्ञानी। उदास गिरिकंदरीं॥*

जे वास्तव आहे ते स्वीकारून, जे कटु होईल ते मान्य करीत संसार रेटावा लागतो. गिरिकुहरात राहून विरक्त जीवन जगणारे ज्ञानी हे सत्य जाणतात. ते योगी-ज्ञानी पुरुष ''न लिंपे असता जनीं'' - अशा अलिप्त वृत्तीने कुठेही जनात वा वनात समाधानीच असतात. सांसारिकानेही त्यांच्यापासून बोध घ्यावा. मोकळ्या मनाने निसर्गातील बरेवाईट पाहून त्याबद्दल त्रागा न करता, ''चित्तीं समाधान'' असू द्यावे.

**काही मेळवी मग जेवी**

आजच नाही तर, अनंत काळापासून आपल्याकडे आळशी मंडळींची संख्या बरीच मोठी आहे. कितीतरी एकत्र कुटुंबात एकाने मिळवायचे आणि इतरांनी फक्त खायचे असे चित्र दिसते. समाजातही सारे काही नेत्याने करावे, नागरिकांनी केवळ बोलावे, तक्रारी कराव्यात अशी वृत्ती आढळते. यातून नेत्यांमध्येही दादागिरी येते. आणि सामान्यजन कळतनकळत विभूतिपूजक होत जातात. बऱ्याच वेळा परिस्थितीच्या चक्रात भरडूनही निघतात.

आपल्या वेळोवेळच्या राजकीय गुलामगिरीमागेही हेच आलस्याचे दुर्दैव दिसून येईल. आपण उद्योगात कमी पडतो. ज्यांची उद्यमशीलता जास्त ते फिरंगी-व्यापारी आपल्याला सहज 'दास'' बनवू शकतात. या साऱ्या पार्श्वभूमीवर समर्थांचे हे वचन किती महत्त्वाचे ठरते, पाहा :

*कांहीं मेळवी मग जेवी। गुंतल्या लोकांस उगवी।*
*शरीर कारणीं लावी। कांहीतरी॥*

माणसाने नियमाने कष्ट करावे. काही मिळवावे तरच भोजनाचा अधिकार आहे असे मानावे. यासाठी जे निरंतर क्रियाशील असतात, त्यांचे अनुसरण करायला हवे. शारीरिक शक्ती सुयोग्य कारणी लावावयास हवी. ''आधी कष्ट मग फळ। कष्ट नाही ते निर्फळ।'' अशी दृष्टी ठेवावी.

तुलसीदासांची अशीच सांगी आहे: "दैव दैव आलसी पुकारा!" नशिबाचा आधार घेत कामाची कुचराई, केवळ ज्यांना उद्योग अप्रिय, ते करतात. "कलियुगा" चे निमित्त बव्हंशी कामटाळू मंडळी करतात. पण कलियुगाला जे कृतियुग मानतात, त्यांना दुःख-दारिद्र्यावर सहज मात करता येते. समर्थ आपल्याला सांगतात:

*"प्रेत्नेवीण राहू नये। आळस दृष्टी आणू नये।"*

सदा सर्वकाळ प्रयत्नशील राहावे. "आळस म्हणजे उदास नागवणे" हे विसरू नये. दुश्चितपणाचा अर्थात् विकृतविचारांचा उगम आळसात आहे, हे ध्यानी ठेवावे.

"केल्याने होत आहे रे आधी केलेचि पाहिजे।" हा समर्थांचा प्रेरक उद्‌गार "काही मेळवी मग जेवी" या आज्ञेशी संवादीच आहे. समर्थांना प्रारब्धवाद मान्य नव्हता. केवळ दैवावर भिस्त ठेवणारे आळशी आणि करंटे असतात, हे सांगत त्यांनी सदैव प्रयत्नवादाची गौरवगाथा गायिली, प्रयत्नांची प्रतिष्ठा मांडतांना समर्थ त्याला साक्षात् "परमेश्वर" मानतात:

*केल्याने होत आहे रे। आधीं केलेचि पाहिजे।*
*यत्न तो देव जाणावा। अंतरीं धरिता बरें॥*

जो अविश्रांतपणे परिश्रम करतो त्यालाच भाग्यश्री माळ घालते. इतकेच नाही तर "भाग्य" असे नसतेच. असलेच तर ते प्रयत्नापाठोपाठ येणारे असते:

*भाग्यासी काय उणे रे। यत्नावांचूनि राहिले।*

पण यत्न कसा करावा याचीच समजूत येणे मात्र अवघड असते. म्हणून ती विवेकपूर्वक प्रथम मिळवायला हवी.

*यत्न तो करावा कैसा। हेचि आधी कळेचिना।*
*यत्नाचा साक्षेपी प्राणी। तो येक भाग्य मेळवी।*
*यत्नाचा लोक भाग्याचा। यत्नेवीण दरिद्रता॥*

कुटुंबनियोजन ?

दासबोधाचा तिसरा दशक स्वगुणपरीक्षेचा अर्थात् मानवी जीवनात सुख कसे मिळवावे या विषयावरील आहे. ज्या व्यक्तीला स्वत्वाच्या जाणिवेबरोबर काळाचे भान असते आणि ईश्वराविषयींची ओढ राहते तोच स्वार्थ सोडून जगावर प्रीती करू शकतो, हे आपले तत्वज्ञान, समर्थांनी व्यावहारिक जीवनातील अनेक प्रकारच्या अडीअडचणींची उदाहरणे देत वारंवार स्पष्ट केलेले आहे. मुलाबाळांनी फार भरलेल्या घराचे चित्र उभे करतांना ते लिहितात:

*लेकुरें उदंड झाली। तंव ते लक्ष्मी निघोन गेली।*
*बापुडी भिकेस लागली। काही खावयासि मिळेना।*
*लेकुरे खेळती धाकुटी। एक रांगती एक पाठीं।*
*ऐशी घरभरी झाली दाटी। कन्या आणि पुत्रांची॥*

(दा. ३.४.१-२)

समर्थांची मांडणी अतिशय तर्कपूर्ण आहे. आरंभी जन्म दुःख निरुपण करीत ते म्हणतात:

*"जन्म दुःखाचा अंकुर । जन्म कुविद्येचे फळ ।*
*जन्म काळाची जाचणी । नीचनवी ॥"*

जीव स्वरूपाला विसरतो तेव्हा तो ईश्वरापासून वेगळा होऊन अपूर्ण बनतो. त्यातून त्याच्या अंगी वासना उत्पन्न होते. जीवाच्या गर्भवासापासूनच त्याच्या दुःखाला खरा आरंभ होतो, इतके सूक्ष्म वर्णन समर्थ करतात.

समर्थांनी आपल्या काळातील संसारी बहुजनांची दुःस्थिती दृष्टीपुढे ठेवून प्रापंचिक व्याधींबद्दल वर्णन केले आहे. यात, एके काळी अत्यंत आज्ञाधारक असणारा मुलगा लग्नानंतर एकदम कसा बदलतो, दुसरी बायको केल्यावर कटकटी किती होतात, व्यसनामुळे कुटुंबाची कशी दैना होते, म्हातारपणी कितीप्रकारे हाल होतात, रोगोपचाराच्या नाना पद्धती नि अपुरा पैसा यांमुळे कोणती वंचना पदरी येते हे सारे समर्थांनी बारकाईने सांगितले आहे. त्यातून त्यांचा प्रपंचसंसाराचा सूक्ष्म अभ्यासच प्रकट होतो.

एक स्वतंत्र समास लिहून समर्थ प्रापंचिकांची विषयासक्ती, स्त्रीसुखाची चटक, त्यातून येणारी बाहेरख्याली वृत्ती, व्यसनीपणा, पुढे घाणेरडे गुप्तरोग, मग नवससायास हा सारा विपरीत जीवनक्रमही कसा घडत जाऊ शकतो त्याचे वर्णन केले आहे.

या सर्व वर्णनानंतर एका समासात तथाकथित सुखी परिवाराचे, मुलाबाळांनी भरलेल्या घराचे वर्णन आले आहे. लेंकुरें उदण्ड झाल्यामुळे लक्ष्मी कशी निघून जाते. मुलेबा... भिकेला लागण्याची पाळी कशी येते, हे सांगतांना मोठ्या बहारीने एकेक गुंता त्यांनी स्पष्ट केला आहे:

"घर वात वाढली, खातीं तोंडें मिळाली की उद्वेगाची काळजी उत्पन्न होते. कन्या उपवरी झाल्या, पुत्रांस नोवऱ्या आल्या आणि तिथं प्रतिष्ठा-मान नाही राहिला की, "मुले तैसींच राहिलीं, तरी पुन्हां लोकलाज आली!" मग जमली लग्ने तर ऋणभार वाढतो. उद्वेगाचे आभाळ कोसळते. सर्वकाळ चिंतातुर होऊन "आपण खातों अन्नासी की, अन्न खातें आपणासी" असे होऊन जाते। सारी पत संपते. "वस्तभाव गहाण" पडते. काही "ताडामोडा करीत" घरचा "पाडारेडा विकीत" "वडिलांचे नाव राखले" तरी विदेशी निघून जाण्याचा प्रसंग येतो. तरीही दुष्टचक्र संपत नाही. अखेर आपण अविचाराने, अविवेकाने वागून प्रपंच नियोजन न केल्याची परिणती मृत्यूत होते.

आज सुखी परिवाराच्या नि कुटुंबनियोजनाच्या युगात समर्थांचे हे जनावलोकन फारच महत्त्वाचे ठरू शकेल.

**वेवाद हा खोटा!**

समर्थांनी अकारण वादंगासाठी मजेदार शब्द वापरला, "गलबला!" हा गलबला बुद्धी भ्रष्टविते - असे ते बजावतात. संवाद वेवाद होतां। वेवादें युद्ध होतसे।

अशी अति टाळणे आणि योग्य सुसंवाद साधून अथवा जुळवून घेऊन राहताच येत

नसेल एखाद्याला, तर त्याने "लोक सोडावे" आणि "अरण्य धरितां बरें!" असेही समर्थ सुनावतात. पण हा उपाय कुणालाच परवडण्यासारखा नाही. म्हणून,

*गलबला होंचि नेदावा । गलबला बुद्धि भ्रष्टवी ।*
*मुळींच नेणतें व्हावें । जाणत्यानेणत्यामधें ॥*

वादविवादापासून नेहमी अलिप्त राहावे. आपले अगदी न पटण्याची वेळ येईल इतपत कुणीच ताणू नये. एकदा का गलबल्यांचा अतिरेक झाला अथवा आपण होऊ दिला तर बुद्धी भ्रष्ट व्हायला वेळ लागत नाही. आणि बुद्धी जर चळली तर गलबलाच वाढतो. म्हणून जाणीवपूर्वक व्यवहार करावा. जाणत्यानेणत्यांचे अनुसरण करीत असावे. योग्य वेळीच आपण "नेणते" व्हावे. अन्यथा आयुष्य वाया जाते.

**त्याचा कार्यभाग बुडाला!**

नानाप्रकारच्या मतमतांतरांचा गलबला राजकारणात आपल्याला दिसतो. समर्थांनी राजकारणाचे निरुपण करतांना वाचाळांपुढे वाचाळच असावे असे म्हटले आहे. "नष्टासी नष्ट योजावे" म्हणून "कांटीने कांटी काढावी" अशी युक्ती सांगितली आहे. ते सांगतात:

*हुंब्यास हुंबा लाऊन द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा ।*
*लौंदास पुढे उभा करावा । दुसरा लौंद ॥*

असे थोडे विनोदाने सांगून, जेव्हा जैशास तैसा भेटें। तेव्हा "मज्यालसी" थाटे। असा इशारा समर्थांनी दिला आहे. म्हणून धटाशी धटपणा, खटाशी खटपणा अगत्य करावा. पण असे करतांना सुद्धा एक सावधगिरी बाळगावी. "आपणावरी विकल्पाचे गोवे" पडू नये - असे आणि तितकेच पाहावे. "कळो नेदावे" अशा रीतीने ठोशास ठोसा द्यावा. "काका काक बरा, बका बक बरा" हे मुख्य सूत्र राखावे. तरीही आपण स्वत: कष्टत असावे. दुसऱ्याला पुढे करीत राहू नये. राजकारणामध्ये स्वत: जातीने काही करण्याचे महत्त्व आहेच. मग व्यवहारात तर आहेच आहे. यासाठी समर्थनीती अशी:

*जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ।*
*जो आपणचि कष्टत गेला । तोचि भला ॥*

**राखावे बहुतांचे अंतर!**

राजकारण काय नि सामान्य व्यवहार काय एकमेकांशी चांगला संवाद असणे हितावह ठरतेच.

समर्थांनी दासबोधाच्या बाराव्या दशकात उत्तम पुरुषाची लक्षणे स्पष्ट करतांना म्हटले आहे: गुणसंपन्न माणसाने "शरीर परोपकारीं लावावे। बहुतांच्या कार्यास जावे।" कुणाचेही "आडले जाकसले" म्हणजे गांजणूक ओळखावी आणि "यथाशक्ती कामास यावे." असे करताना "मृदुवचनें बोलत जावें." "बऱ्या शब्दे प्राणीमात्रांस मेळवून घ्यावे।" "दुसऱ्याचे अंतर जाणावे." "शब्द निवडून बोलावा."

एखाद्या उत्तम अध्यापकाप्रमाणे समर्थ समजावितात: "आपणास चिमोटा घेतला। तेणें

कासाविस जाला। आपणावरून दुसऱ्याला। राखत जावें।"

असे बहुतांचे अंतर कसकसे राखावे याची राजविद्या देणारे समर्थ कधी भगवद् भजनाची व्याख्या करतांना सहजपणे म्हणून जातात :

*कोणी एक भेटो नर। राखावे तयाचे अंतर।*
*त्या नाव भजन॥*

तुलसीदासांनी तर धर्म म्हणजेच जनसेवा असे मानले आहे: परहित सरिस धरम नहिं भाई। परपीडा सम नहिं अधमाई॥

समर्थ आपल्या महंतांना या संदर्भात अशी आज्ञा करतात :

*दुःख दुसऱ्याचे जाणावे। जाणोन तरी वाटोन घ्यावे।*
*बरे वाईट सोसावे। समुदायाचे॥*

आजच्या लोकशाही युगात ज्यांना ज्यांना म्हणून पदप्रतिष्ठा मिळाली, समुदायाचे भलेबुरे पाहण्याचे अधिकार चालून आले त्यांचे चालणे बोलणे कसे हे आपण हरघडी अनुभवतो. मनात येते, समर्थ यांना भेटतील तर... ?

**''समुदायाचा हव्यास''**

समर्थांचा भर भक्ती-विरक्तीबरोबर प्रयत्नवाद अन् विवेक यांच्यावर दिसतो. त्यांना समाजाचे संघटन हवे आहे. त्यासाठी ते ''समुदायाचा हव्यास'' धरण्याची भाषा वापरतात. हव्यास हा शब्द आजकाल तितकासा चांगला मानला जात नाही. हव्यास धरू नये - आसक्ती असू नये असे समर्थही म्हणतातच. पण ''समुदायाचा हव्यास'' त्यांना महत्त्वाचा वाटतो. इथे त्यांनी ''हव्यास'' हा शब्द चांगल्या अर्थानेच योजिला आहे.

*ज्ञानी आणि दास, समुदायाचा हव्यास।*
*तेणें अखंड सावकाश एकांत सेवावा॥*

ज्ञानवंतांनीही समाजाची चिंता वाहायला हवी. साधुसंतांनीदेखील समाजास विसरून चालणार नाही. एकांत अथवा व्यासंग आणि सत्संग यांचे नाते असायलाच हवे. त्यासाठी काही कर्तव्यभावनेने योजना हवी.

समर्थांनी सामूहिक साधनेच्या दिशेने वाटचाल केली. वारकरी संतांनी ती वाट अधिक प्रशस्त करण्याचे सामर्थ्य दाखविले. आजमात्र प्रत्येकाचा आपापला रस्ता होतो आहे. समुदायाचा वा समाजाचा विचार मागे पडून संकुचित पंथसंप्रदायांचाच ''हव्यास'' धरला जातो की काय अशी भीती दिसते आहे.

**सोवळा ब्राह्मण कोण ?**

भगवद्भजनाच्या आनंदात असणारे संतसज्जन उच्चनीच अन् शुद्ध अशुद्ध या कल्पनांना थारा देत नाहीत. धूर्त माणसं मात्र देतात. त्यांच्या सोवळ्या ओवळ्याच्या कल्पना फार चमत्कारिक असतात. त्यामागे अस्वच्छतेपेक्षा बऱ्याचवेळा मनातील कोतेपणाचा भाग अधिक

दिसून येतो.

समर्थांचा सफाईवर, आरोग्य रक्षणावर, बलोपासनेवर भर अवश्य आहे. त्यांना ब्रह्मकर्मही प्रिय दिसते. पण त्यांचा "ब्राह्मण" हा केवळ ब्राह्मणापोटी जन्म घेणाराच आहे, असे म्हणणे जरा धारिष्ट्याचे वाटते. त्याचबरोबर एक वस्तुस्थितीही मान्य केली पाहिजे. समर्थांचा शिष्यवर्ग प्राधान्याने ब्राह्मण वर्गातील होता. स्वत: समर्थांवरील संस्कार ब्राह्मण्याचे होते. त्याकाळी धर्मकारणाशी सर्वतोपरी ब्राह्मणांचा संबंध असायचा. त्यांची समाजात नि राजकारणात प्रतिष्ठाही मोठी असे. अशावेळी या "प्रतिष्ठित" वर्गाला शिवछत्रपतींच्या स्वराज्याकार्याकडे आणणे हे समर्थांनी अंगिकारलेले कार्य मोठे होते. त्यांनी या उदात्त ध्येयाकरिता "ब्राह्मण" शब्दातही उदात्त आशय भरण्याचा प्रांजळ प्रयत्न केल्याचे काही वचनात निश्चितपणे दिसून येते. कधी ते म्हणतात :

*देवाकडे मन लागता उन्मन ।*
*सोवळा ब्राह्मण तोचि एक ॥*

जो सृष्टीतील प्रत्येक वस्तूत भरून राहिलेल्या देवाशी एकरूप होऊन राहतो तो खरा सोवळा, शुद्ध ब्राह्मण! याआधीच्या समर्थांच्या ओळी तर फारच बोलक्या आहेत :

*हाडामासांच्या सगट मोळ्या ।*
*पाणिव सोवळ्या होती कैशा ?*

इथूनतिथून सारा देह हाडामासांचा, रक्ताचा. कुणीही याला अपवाद नाही. धूतवस्त्र अथवा सोवळे परिधान करण्याने अस्थिचर्ममय देहाला पावित्र्य थोडेच येते? ते तर मानवी शुद्धता आणि आचरणाचे पावित्र्य यांवरच अवलंबून असते.

**प्रौढ शिक्षण**

लोकशाहीयुगात लोकशिक्षणाचे महत्त्व फार मोठे. संतांनी परमार्थ मार्गाचे महत्त्व मांडत लोकशिक्षण केले. जनमन जागरण केले.

आपल्या देशाची ज्ञानपरंपरा जगातील सर्वात जुनी नि थोर मानली जाते. आपल्या देशात जितके ज्ञानी पंडित, शास्त्री प्रवचनकार आणि लोकशिक्षक संतसत्पुरुष झाले तितके अन्य कुठल्याही देशात झाल्याचे इतिहासाला ज्ञात नाही. तरी देखील आपल्याकडे अशिक्षित, अज्ञानी जनांची संख्या उदंड आहे. कदाचित त्याही बाबतीत जगात आपला क्रमांक पहिलाच लागेल. या दु:स्थितीचे कारण काय? समर्थांच्या भाषेत याचे एक उत्तर असे देता येईल :

*जे जे आपणासी ठावे । ते इतरांसी शिकवावे ।*
*शहाणे करुनि सोडावे । सकळ जन ॥*

असे आपल्याकडील सुशिक्षितांचे ठरलेले नाही! आपले शिक्षित असावेत तितके सुसंस्कृत नाहीत. बरे जे जनांना शिकवितात "बहुजन हिताय बहुजन सुखाय" मोठमोठ्या संस्था चालवितात ते क़ाय काय करतात? बहुधा शासकीय सुविधा अनुदानांचा उत्तमप्रकारे [illegible]साठी वा स्वहित-साधनासाठीच अधिक वापर करतात. त्यामुळे योजना कागदावर

राहतात. जर जनशिक्षण खरोखरीच यशस्वी करायचे असेल तर -

*मुलाच्या चालीने चालावे । मुलाच्या मनोगते बोलावे ।*
*तैसे जनांसि शिकवावे ॥ हळुहळू ॥*

(दा. १३.१०.१५)

समर्थांची दासबोधाच्या ''नामरुप'' नामक तेराव्या दशकात, इतरांचे अंत:करण सांभाळून वागणाऱ्या जनहितदक्ष शिक्षक-महंताची महती विवरून सांगितली आहे. या महंताला ''मनुष्य आणि गधडे। राजहंस आणि कोंबडे। राजे आणि माकडें। एक कैसीं'' याची एक दृष्टी आलेली असते. पण ''वेड्यास वेडें म्हणों नये। वर्म कदापि बोलों नये।'' हे तो जाणतो. त्याचा ''वर्तायाचा विवेक'' त्याला सांगत असतो :

*मनोगत राखोन जातां । परस्परें होय अवस्ता ।*
*मनोगत तोडितां वेवस्ता । बरी नाहीं ॥*
*याकारणें मनोगत । राखेल तो मोठा महंत ।*
*मनोगत राखतां समस्त । वोढोन येती ॥*

(दा. १३.१०.२८-२९)

- इतरांचे मनात काय आहे ते ओळखून, थोडे सांभाळूनही वागले तर आपापसातील एकरुपता वाढत राहते. इतरांचे मनोगत जर भंग पावले तर आपापसात विसंवाद उत्पन्न होतो. अशा स्थितीत शिक्षण अर्थशून्य होते. म्हणून दुसऱ्याचे अंत:करण न दुखवता वागणारा अध्यापक खरोखरीच आदर्श ठरतो. ज्याला इतरांचे मनोगत सांभाळून आपले मनोगत स्नेहपूर्वक व्यक्त करता येते. त्याच्याकडे सर्व लोक आपोआप आकर्षिले जातात.

''शिक्षकत्व'' हे केवळ वेतनाश्रित कार्य नसते. तो फक्त व्यवसाय नाही. ते एक ''मिशन'' आहे. मिशनरी अर्थात् सेवाभावी वृत्तीनेच ते करायचे असते. त्यासाठी शिक्षकत्वाबरोबर अशी भक्तसज्जनाची वृत्तीही ठेवणे औचित्याचे ठरते :

*शहाणे करावे जन । पतित करावे पावन ।*
*सृष्टीमध्ये भगवद्भजन । वाढवावे ॥*

(दा. १४.६.३३)

समर्थांची जीवनसरणी अशी ध्येयवादी आहे. कथाकीर्तन प्रवचन करीत फक्त ब्रह्ममायानिरुपण अथवा अध्यात्मचर्चा करण्यापेक्षा सर्वविषयीं सावधपण ठेवण्याचे शहाणपण सर्व जनांना शिकवावे, आणि त्यायोगे पतितांना पावन करावे - असे करणे म्हणजे भगवद्भजन सर्वत्र वाढविणे होय, भक्तिपंथाने वाटचाल करण्याऱ्या संतजनांचे नि सज्जनांचे संघटित सामर्थ्य वाढविणे होय !

**नित्य नूतन हिंडावे !**

ब्राह्मण शब्दाचा शब्दश: अर्थ ब्रह्मविद्येचा उपासक असा घ्यायला हवा. हा ब्राह्मण कसा असावा ?

"ब्राह्मणु हिंडता बरा" - हे तत्व जाणून आणि "हिंडता शाहाणे होतें" हे मनीं धरुन समर्थ अन् त्यांचे महंत सतत हिंडत असतात. या हिंडण्याचे एक तत्वज्ञानच समर्थ रामदास मांडतात:

*"हिंडतां पारखी लोकां। कार्यकर्ता जिवीं धरी।"*
*"प्रत्यहीं मागणें भिक्षा। मिळाली न मिळे तरी।*
*नित्य नूतन हिंडावे। धुंडावे भक्त प्रेमळ॥"*

स्वतः समर्थांनी अशा पद्धतीने देशात परिभ्रमण करून उत्तम गुणी कार्यकर्त्यांची निवड केली. मठस्थापना केली. कार्यकर्त्यांचे संघटन उभारले.

प्रवासाची महती आज अनुकूल साधने पुष्कळ होऊनही आपण फारशी ध्यानी घेत नाही. "पर्वतीं उदकापासी" राहिले आणि "येकांत सेवन" केले की, "अभ्यास नित्य नूतन" सहज होऊन जातो. शिवाय, "साहावीं सीतउष्णादि। पाहावीं रम्यसीं स्थळें" हा संतोष मिळतो, तो वेगळाच.

समर्थ अशीच निसर्गसौंदर्याशी जवळीक साधीत शिवथरघळीत जाऊन पोहोचले. तिथे "दासबोधा" सारखी श्रेष्ठ रचना जन्माला आली. उत्तम साहित्यलेखन करावयासाठी सुद्धा रम्यस्थळे गवसणे आवश्यक ठरते.

प्रवासात सहज परिचय होऊन जातात. समर्थ आपल्याला हे देखील सांगतात: "वोळखी कराव्या दाटा।" आणि यासाठी प्रवाशाने "उद्धट बोलणें खोटें। बोलावीं मृदुउत्तरें।" आणि "वादवेवाद तो खोटा। दाटावा मदमच्छर।" हे पथ्य ध्यानी ठेवावे. अशा व्यावहारिक सूचना देण्याचे समर्थ विसरत नाहीत.

**"दास डोंगरी राहतो, यात्रा देवाची पाहातो!"**

ज्ञानोपासकाने नित्य यात्रा करावी आणि त्यायोगे आपले व्यक्तिमत्त्व समर्थ-समृद्ध करावे. पण ताटस्थ्याचे महत्त्वही जाणावे. "दास डोंगरी राहतो। यात्रा देवाची पाहातो।" हे समर्थ-वचन केवळ विरक्तिसूचक नाही. यामागे एक विलक्षण आनंदस्थितीही आहे. सामाजिक जागरण-संघटनासाठी सदैव यत्नशील असणारे समर्थ रामदास, जितके जनात आनंदी असत, तितकेच ते वनातही उत्फुल्ल असत. कारण प्रसन्नता त्यांच्या मनातच होती.

तुकोबारायांच्या जीवनात "रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग" अशी स्थिती आली पण बाह्यापेक्षा आंतरजगाशी त्यांनी संवाद साधला. "मन करा रे प्रसन्न सर्व सिद्धींचे कारण" हे त्यांच्या ध्यानीं आले. आणि मग देहू शेजारच्या भंडाऱ्याच्या उघड्याबागड्या डोंगरात देखील "वृक्षवल्ली आम्हा सोयरी वनचरे". अशी आनंदावस्था अगदी आपोआप त्यांना अनुभवता आली.

*"दास डोंगरी राहतो। यात्रा देवाची पाहातो।"*

- या वचनामागचा भाव तुकोबारायांसारखेच मनोमन आनंदी समाधानी असण्याचा आहे. निसर्गाच्या प्रत्येक लहरीशी लय साधण्याचा आहे.

आज आपण कधीकाळी सहलीला डोंगरमाथ्यावर गेलो तर शेगड्या पेटवून खोलीत शेक घेतो. उत्तमोत्तम सामिष पदार्थांचे भोजन अथवा अन्यप्रकारे जिभेचे चोचले पुरवितो.

समर्थांसारखे सदैव रामदास्य अनुभवणारे समाजपुरुष सर्वत्र भगवंताचे सामर्थ्य पाहतात. त्याच्याशी समरस होतात. आणि काही "सेवितो हा रस वाटितो अनेंका" अशा औदार्याने "अवघे धरु सुपंथ" म्हणतात.

**कवित्व सोपे असावे !**

जनांना सुपंथावर ठेवण्यासाठी भक्तिसाधना सांगणारे संतसज्जन काव्यात बोलतात. पण काव्यापेक्षा कार्याची महती ते मानतात.

जगात जर कवींचा समाज नसता तर जगाचा उद्धारच व्हायचा राहिला असता असे रामदासांचे मत आहे. त्यांच्या दृष्टीने धीट, पाठ आणि धीट-पाठ अर्थात प्रासादिक, असे काव्याचे तीन प्रकार कवी करतात.

"धीट" म्हणजे धीटपणे बोले। जें जें आपुल्या मनास आलें। बळेंचि कवित्व रचिलें। त्या नांव धीट बोलिजे॥ अशा धीट कविकाव्याबद्दल अर्थातच स्वामींचे मत चांगले नाही.

दुसरी एक रीती पाठांतराची. कशी ?

*पाठ म्हणिजे पाठांतर । बहु पाहिले ग्रंथांतर ।*
*तयासारिखे उत्तर । आपणही केले ॥*

पाठ काव्याची ही पद्धतीही स्वामींना फार पसंत नाही.

काही रचनाकार कामिक, शृंगारिक लिहितात. काही वीररसयुक्त वा हास्यरसयुक्त लिहितात. पण आदर्श काव्य असे एकांतिक नसावे. ते अल्पाक्षरमणीय तर असावेच पण चरणबद्ध नि सोपेही असायला हवे. नाना "धाटी-मुद्रा" अर्थात रीती-पद्धती कवीला ज्ञात असाव्यात. "नाना वाक्ये शास्त्राधारे" ठाऊक असावीत. पण हे सारे "ज्ञान" कशाकरिता ? तर "तुटे संशयो निधारे। निर्धारितां॥" यासाठी !

*नाना धोके देहबुद्धीचे । नाना किंत संदेहांचे ।*
*नाना उद्वेग संसाराचे । नासती श्रवणे ॥*

श्रेष्ठ कवितेमुळे मनाचे अनेकानेक संदेह फिटतात. अनुताप निर्माण होतो. उद्वेग दूर होतो. ज्ञानविवेक प्रबळ होतो !

*वाचे बरवें कवित्व । कवित्वी रसिकत्व ।*
*रसिकत्वी परतत्व । स्पर्शू जैसा ॥*

- या ज्ञानदेवांच्या वचनाचे स्मरण व्हावे असाच कवित्वाचा अंतिम उद्देश समर्थांनीही आरंभी सोप्या कवित्वाचे विश्लेषण केल्यानंतर अखेरीस व्यक्त केलेला आहे.

**अमर विचारांची खाणी**

समर्थ रामदासांचे वाङ्मयविश्व विशाल आहे. अद्यापी त्या साऱ्या साहित्याचे संकलन

संपादन-प्रकाशन पूर्ण स्वरुपात झालेले नाही. जे झाले आहे ते बरेच स्वातंत्र्यपूर्व काळात एका विशिष्ट प्रकारच्या ध्येयवादी व्यक्तींनी श्रद्धापूर्वक केले आहे.

समर्थ संप्रदायाच्या वाङ्मयाचा विस्तार किती नि कशा प्रकारचा आहे, अन्य संत परंपरेच्या तुलनेने पाहता समर्थ वाङ्मय-कार्याचे महत्त्व कोणते, मर्यादा कशा स्वरूपाच्या याची देखील चर्चा पुरेशी आणि निर्णायक स्वरूपाची झालेली नाही.

प्रस्तुत लेखात एकच प्रयत्न आहे: समर्थ साहित्यात शाश्वत संदर्भ कशाप्रकारे येतात? वस्तुतः समर्थ वाङ्मयात जागोजाग सुविचार आहेत. सुवचने आली आहेत. "प्रत्ययेसी बोले तेचि ते बोलणे" असेच ते काव्य असल्याने "होय पुण्यशील साधुसंगे" अशी त्याची मातब्बरी आहे.

"विवेकाचा मार्ग संतसंगे कळे" अशी ही अमृतविचारांची खाणी आहे. त्यात प्रयत्नवादावर सतत भर देण्यात आला आहे:

*– यत्नाचा लोक भाग्याचा । यत्नेवीण दरिद्रता ॥*
*– यत्नाचा साक्षेपी प्राणी । तो येक भाग्य मेळवी ॥*
*– आळसे मनुष्यपणाच्या । खुणा नष्ट होती ॥*

या वाणीत परोपरीने ज्ञानाचे विलक्षण सामर्थ्य सांगण्यात आले आहे. विवेक अथवा विचार हा समर्थांचा परवलीचा शब्द आहे.

*– ज्ञानेवीण जी जी कळा। ती ती जाणावी अवकळा ॥*

हे जाणून समर्थ ज्ञानाची अतिशय सोपी, सुटसुटीत व्याख्या करतात:

*"एक ज्ञानाचे लक्षण । ज्ञान म्हणजे आत्मज्ञान ।*
*पाहावे आपणासी आपण । या नाव ज्ञान ।"*

असे ज्ञान आपल्यापुरतेच असत नाही. निदान असू नये. ज्ञानी व्यक्तीने "शहाणे करावे जन। पतित करावे पावन". आणि त्यासाठी "सृष्टीमध्ये भगवद्भजन। वाढवावे" असा उपाय कथन करण्यात आला आहे.

इथे चळवळीचे महत्त्व ठसविले आहे. चांगले काही करावे म्हणून सुद्धा चळवळच आवश्यक ठरते असा समर्थांचा सांगावा आहे.

*– सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जो करील तयाचे ॥*
*– वन्ही तो चेतवावा रे । चेतविताचि चेततो ॥*
*– केल्याने होत आहे रे । आधी केलेचि पाहिजे ॥*
*– जन्मा आलियाचे फळ । काही करावे सकळ ॥*

धटाशी धट असावे. उद्धटाशी उद्धटच व्हायला पाहिजे. उत्कटभव्य ते घ्यायला हवे. मळमळित टाकायला हवे. अशी अनंतप्रकारे जीवनव्यवहाराची सुबोध शिकवण समर्थ वाणीत आहे.

संत-साहित्य हे सज्जनांचे सामर्थ्य वाढविणारे आणि दुष्टदुर्जनांना धाक निर्माण करणारेही कसे आहे, अगदी आजच्या युगात आपल्या काही समस्यांवरही त्यात तोडगा कसा सापडतो, हे समर्थांच्या वाङ्मयाच्या अवगाहनानेही ध्यानी येऊ शकेल.



१. प्रस्तावना : ''रामदासांची भजनें'' परंधाम प्रकाशन, पवनार १९७३ पृ.५



# दासबोधाची अनन्यता १५

---

**प्रपंच नेटाने आणि नेटका कसा करावा, आणि तो करता करता परमार्थ कसा साधावा, हे सोप्या आणि जोरकस भाषेत मांडणारा आद्य मराठी ग्रंथ म्हणजे दासबोध. हा ग्रंथ कोणत्याही पूर्वप्रसिद्ध ग्रंथावर आधारित नाही. ही स्वतंत्र मराठी कृती जीवनबोधासाठी अनन्य ठरावी अशीच आहे.**

**आज परमार्थाचा व्यावसायिक पसारा मांडणारे आणि आपापल्या महात्मतेचे देव्हारे माजविणारे अनेक महाराज आहेत. स्वार्थपरायण अभिजन प्रवचनकार आहेत. त्याहून जास्त असे त्यांचे भोंगळ अनुयायी आहेत. सर्वांना समर्थांचा दासबोध हा ''गुरुग्रंथासाहिबा'' प्रमाणे पथदर्शक ठरेल आणि अंतमुर्ख करील असे वाटते.**

---

**''दासबोध'' हेच समर्थ चरित्र!**

समर्थभक्त शंकर श्रीकृष्ण देव यांनी म्हटले आहे : ''श्रीसमर्थांचे आत्मचरित्र म्हणजे श्रीमत् दासबोध हा ग्रंथ होय.'' हे त्यांनी अनेक दाखले देऊन स्पष्टही केले आहे.

समर्थ अल्पवयात विरक्त झाले, बोहल्यावरून पळाले. याचे कारण, ''देवाच्या सख्यत्वासाठी। पडाव्या जिवलगांसी तुटी। सर्व हि अर्पावें सेवटीं। प्राण तोहि वेचावा।'' (४.८.८) अथवा ''जयास वाटे सुखचि असावें। तेणें रघुनाथ भजनीं लागावें। स्वजन सकळही त्यागावें। दुःखमूळ जे। (३.१०.६३) या समर्थांच्या ध्येयनिष्ठ वृत्तीत शोधण्यासारखे आहे.

जांब सोडून समर्थ टाकळीला गोदातटाकी येऊन राहिले. मानवी गुरुपेक्षा पुरश्चरणाने प्रत्यक्ष परमेश्वरालाच वश करावे असे त्यांनी ठरविले. ''जिथे दिसती विशेषगुण। ते सद्‌गुरुचे अधिष्ठान।'' या विशिष्ट दृष्टीने ते साधना करीत गेले. ''आमुचे कुळी रघुनाथ। रघुनाथें आमुचा परमार्थ'' ही त्यांनी श्रद्धा होती. ''रघुनाथ भजनें ज्ञान झाले। रघुनाथ भजनें महत्त्व वाढलें'' असा त्यांना अनुभव आला. ''मनीं धरावें तें होतें। विघ्न अवघेंचि नासोन जातें। कृपा केलियां रघुनाथें। प्रचीत येते।। (६.७.३०) अशी त्यांची खातरजमा झाली. आणि मग समर्थ वैराग्यबळाच्या योगाने, '' नाना सामर्थ्ये वाढावी'' या निश्चित उद्दिष्टाने, ''नाना तीर्थाटणें फिरावी'' असे म्हणाले. तब्बल चोवीस वर्षे रामकृपेसाठी खडतर तप आचरल्यानंतर समर्थ कृष्णाकाठच्या दरीखोऱ्यात पुन्हा बारा वर्षे वावरले. कसे? ''जनांस दिसे हा दुश्चित।

परी तो आहे सावचित। अखंड जयाचें चित्त। परमेश्वरीं॥ (१४.७.१५) अशा रीतीने "राजकारण बहुत करावे। परंतु कळोंच नेदावें" अशी समर्थांची सरणी होती.

"दास डोंगरीं राहतो। यात्रा देवाची पाहातो" या उत्कट भावनेने समर्थांनी दगडाधोंड्यांचा महाराष्ट्र पाहिला. मग "हरिकथा निरुपण। नेमस्तपणें राजकारण। वर्तायाचें लक्षण। तेंही असावें। (११.६.४.) हे पक्के ध्यानी धरून "कष्टेंविण फळ नाहीं। कष्टेंविण राज्य नाहीं। केल्याविण होत नाहीं। साध्य जनीं।" (१८.७.३) या विचाराचा प्रचार सुरू केला. "आहे तरी सर्वां ठाईं। पाहो जातां कोठेचिं नाहीं" (११.६.१५) अशा विरक्त महंतांची एक प्रबळ संघटना उभारली. "सामर्थ्य आहे चळवळीचे। जो जो करील तयाचे" अशा विजीगीषु वृत्तीने महंतांचा दासपंथ उभा केला. त्याला निस्पृहता, निरंतर उद्योग आणि सर्वात महत्त्वाची अशी विचार करण्याची वृत्ती इत्यादी गुणांची शिकवण दिली.

त्यांनी "अभ्यासानेच प्रकट व्हावे"अन्यथा "झांकोनि असावे" अशी ताकीद दिली. त्यांचा परवलीचा शब्द होता, विवेक! ते म्हणतात :

*विवेकामध्ये सांपडेना। ऐसें तों काहींच असेना॥*
*येकांती विवेक अनुमाना। आणून सोडी॥*

"विवेक" हाच दासबोधाचा सर्वथोर विशेष होय. प्रयत्नवाद आणि विवेक जागरणाचे उद्दिष्ट समोर ठेवून समर्थांनी या महाग्रंथाच्या आधारे समर्थसंघटन केले. सज्जनांना उत्तम पौरुषाचे आवाहन केले. जनांना वास्तव नि आदर्श यांचे प्रेरक भान घडविण्यासाठी आपले व्रतस्थ जीवन कारणीं लावले.

**समर्थांची भूमिका**

समर्थांनी आपल्या महाग्रंथाला एक सारगर्भ प्रस्तावना जोडली आहे. ते सांगतात: (१.१.१-३८)

दासबोध हा मूळ गुरुशिष्यसंवाद. तो भक्तिमार्ग स्पष्ट करणारा आहे. नवविधा भक्तीबरोबरच ज्ञान, वैराग्य, आणि अध्यात्म यांचे निरुपण येथे मिळेल. भक्ती, शुद्धज्ञान, आत्मस्थिती, मोक्षप्राप्ती, विदेहावस्था इत्यादींचे विवेचन करून आपण कोण, देव कोण, भक्त कसा असावा, उपासना कशी करावी, कवित्व आणि चातुर्य यांची लक्षणे कोणती, पंच महाभूते आणि माया यांचे स्वरूप कसे, याबद्दलचे शंकानिरसन येथे मिळेल. यात पुष्कळ ग्रंथातील मते आत्मप्रचीतीसह स्वीकारली आहेत. भर मात्र अनुभवावरच आहे.

जो कोणी हा ग्रंथ पूर्णपणे अभ्यासल्याशिवाय याला नावे ठेवील त्याला केवळ मत्सरीच म्हणावे लागेल. गर्वातून मत्सर, पुढे त्यातून तिरस्कार आणि नंतर क्रोध उत्पन्न होऊ शकतो. कामक्रोधादी दुष्ट गुणांनी माणूस बिघडतो हे सर्वज्ञात आहे.

अखेरीला समर्थ आपल्याला अशी ग्वाही देतात: या ग्रंथाने आचरण बदलेल. दुर्गम साधना न करता संशयनिरसन होईल. सायुज्यमुक्तीचा मार्ग सुलभ वाटेल. अंगी वैराग्य बाणून अज्ञान भ्रांती जातील. माणूस धूर्त, तर्कपटु, विचक्षण अन् सुलक्षणी बनेल! आळशी

कामाला लागतील. पापी पश्चाताप पावतील. मूर्ख शहाणे होतील. पतित पावन होतील. निंदावृत्ती नष्ट होईल. समर्थ हेही बजावतात : आपापल्या अधिकाराप्रमाणे या ग्रंथाने फलप्राप्ती झाली तरी अभिमान मात्र धरू नये!

समर्थांचा संप्रदाय या दासबोधावरच अधिष्ठित आहे. तो संप्रदाय व्यक्तिप्रधान असला तरी त्याची बैठक भगवद्भक्ती आणि वेदान्ती तत्त्वज्ञान यांचीच आहे. मानवी ऐहिक जीवनात आणि एकूण देशाच्या पुनरुत्थानाला उपयुक्त ठरावी, अशी पुष्कळ शिदोरी त्यांनी माय मराठीतून पुरविली. त्यांच्या अनेक विचारांचा संदर्भ चिरंतन आहे. मानवी ऐहिक वैभवाला, सदाचरणाधिष्ठित जीवनप्रवासाला तो उपयोगी पडेल असा आहे.

**समाजाच्या अधोगतीचे मूळ**

आपल्या समाजाच्या विपन्नावस्थेची प्रमुख कारणे अलिकडे अनेक सुधारकांनी आणि पूर्वी काही संतांनी अचूकपणे हेरली. बहुतेकांनी आपल्यातील जातिभेद, पंथभेद, आराध्यभेद इत्यादीतून आपल्यात संकुचित अभिनिवेश बळावल्याचे निदान केलेले दिसते.

याबाबतीत समर्थांची दृष्टी अभिनव वाटावी अशीच आहे. ते सांगतात :

आपल्या अवनतीचे खरे कारण आपल्या करंटेपणात आहे. आपण कुठल्याही गोष्टीचा मुळात जाऊन विचार करीत नाही. आपण खोलात शिरून विचार करावा आणि विचार करण्याची कुवत असणाऱ्या ज्ञानीजनांना मान द्यावा.

समर्थांना समाजाचा दुसरा खटकणारा दोष, अभ्यासाचा अभाव हा होय. आपण चित्त वा मन एकाग्र करू शकत नाही. आपले मन प्राय: आपल्याशी फार संबद्ध नसणाऱ्या गोष्टीतूनच गुंतून पडते. व्यग्र राहते. त्यामुळे फारच शक्तिक्षय होतो. यासाठी सतत अभ्यास हवा. निरंतर प्रयत्न हवा. त्यायोगे मनाला एक शिस्त लागते. अनुशानप्रिय मन अनेकानेक सुप्त शक्तींना जागृत करू शकते. असे झाले तरच नर नारायणपदापर्यंत पोहोचू शकतो.

आळस हा आपला तिसरा आणि खरा शत्रू. या दुर्गुणामुळे अनेकांना उभा जन्म फुका घालविण्याची तमा राहात नाही. माणसाचा जन्म मिळाल्यावर उदंड कष्ट करून काही मिळवायला हवे. निष्काम वृत्तीने कार्य करणे, हीच भगवद्भक्ती मानली पाहिजे.

अविचारीपणा, चंचलपणा, आळशीपणा हे त्रिदोष आपल्या समाजाच्या अवनतीचे खरे कारण. ते जावेत आणि समाजामध्ये "कल्याण" अर्थात नवजीवनाची पहाट अवतरावी यासाठी समर्थांनी दासबोधाची रचना केली.

"मुक्त करीन सज्जन!" ही समर्थांची प्रतिज्ञा होती. जो सज्जनांना सामर्थ्य देतो तोच खरा पावन राघवभक्त होय असे ते म्हणत. ही त्यांची कळकळ व्यक्तिगत मुक्ती वा मोक्षसुख बाजूला सारून समाजप्रबोधन करणाऱ्या श्रेष्ठ चिंतकाची आहे. समाजनेत्याची आहे. त्यांचा दासबोध एका अर्थाने सर्वांसाठी असणारा "समाजबोध"च आहे.

**प्रपंचविज्ञान**

समर्थांनी चार माणसे करतात तसा अथवा संत सत्पुरुष करतात तसाही "प्रपंच" केला

नाही. त्यांना संसाराची चीड नव्हती. संन्यासाचीही ओढ नव्हती. प्रत्येकाने प्रपंच अवश्य करावा पण त्यापायी भगवंताला विसरू नये. संसार मुळीच नासका। विवेकें करावा नेटका॥ नेटका करितां फिका । होत जातो॥ (१९.१०.२८) संसार जरी नासका वाटला तरी तो विवेकाने शाश्वत होऊ शकतो. तो नीटपणे करण्यातच त्याची आसक्ती क्षीण होऊन माणूस आनंदी राहतो, यासाठी प्रपंच देखील ईश्वरदत्त आहे असे मानून तो करावा, म्हणजे स्वार्थावर सारा भर राहात नाही. काही लोकोपयागी करण्याचीही प्रवृत्ती राहते, असे त्यांना वाटे.

प्रपंचातील उपाधी आणि कटकटी टाळता येत नाहीत. उलट त्या सांभाळूनच जो दिव्य जीवन प्राप्त करून घेतो, त्याच्या सहवासाने इतरेजनांच्याही जीवनात सहज परिवर्तन होत जाते अशी समर्थांची श्रद्धा आहे. ते म्हणतात :

*प्रपंच करावा नेमक । पाहावा परमार्थविवेक ।*
*जेणेंकरिता उभय लोक । संतुष्ट होती ॥ (११.३.२)*

प्रपंच अगदी व्यवस्थितपणे करावा. पण त्याबरोबर परमार्थाचाही अभ्यास असावा. अशानेच इहलोक अथवा परलोक दोहोत यश मिळते.

"काही मेळवी मग जेवी। गुंतल्या लोकांस उगवीं॥" स्वत: कष्टाचे खावे आणि अडीअडचणीला इतरांना उपयोगी पडावे. "आहे तितुके देवाचे" अशी निरंहकारी वृत्ती असली तर प्रपंच परमार्थमय होऊ शकतो. "कर्म उपासना आणि ज्ञान। येणें राहे समाधान" - भक्ती, ज्ञान आणि कर्म यांच्या समन्वयानेच शाश्वत संतोष मिळून आत्मसाक्षात्कारही घडतो.

"माथां प्रपंचाचे ओझें घेऊन म्हणे माझे माझें" असे लोक समर्थांना दिसले. "बुडतांही न सोडी फुंजे। कुळाभिमानें।" (३.१०.६) असेही लोक भेटले. अशांना त्यांनी मृत्यूची थोरवी सांगून समजाविले : "असो ऐसे सकळही गेले। परंतु येकचि राहिले। जे स्वरूपाकार जाले। आत्मज्ञानी।" (३.९.५९) पण यासाठी मार्ग प्रपंचाचा धरावा हेही ते ठासून सांगतात. नरजन्माचे सार्थकच त्यांना अशा प्रपंचात दिसते :

*हाट धरला संसाराचा । नफा पाहावा देवाचा ।*
*तरीच या कष्टाचा । परिहार होतो ॥ (१२.८.३४)*

- जन्म मिळाल्यापासून मरणापर्यंत अनेक प्रकारची दु:खे वाढून ठेविलेली असतात. आपल्या दु:खांबरोबर जिवलगांचीही दु:खे सांभाळावी लागतात. शारीरिक व्याधींचीही सोबत राहते. या साऱ्या "दु:खबाजारात" आपल्या बाजूने जमा एकच होऊ शकते, तो म्हणजे देवाचा नफा. यासाठी "आळस सोडून विवेकबळे देवाचा खेळ ओळखावा।" (२०.५.२७) आणि "चालता बोलतां धंदा करितां। खांता जेवितां सुखी होतां। नाना उपभोग भोगितां। नाम विसरों नये॥" (४.३.७)

... दासबोधात ठाई ठाई असे प्रपंचविज्ञान भरलेले आहे. त्याचे सारच जणू पुढील प्रसिद्ध ओव्यात अवतरले आहे :

*आधीं प्रपंच करावा नेटका। मग ध्यावें परमार्थविवेका।*
*येथें आळस करू नका। विवेकी हो।*
*प्रपंची जो सावधान। तोचि परमार्थ करील जाण।*
*प्रपंची जो अप्रमाण। तो परमार्थी खोटा॥ (१२.१.१-९)*

**ज्ञानपीठांचा अभ्यासग्रंथ**

नाथांप्रमाणे 'जनीजनार्दन' पाहणे हे समर्थांचेही सूत्र होते. पण हे केवळ आध्यात्मिक पातळीवर नव्हते. मर्यादा पुरुषोत्तम धनुर्धारी राम आणि त्याचा अनन्य भक्त हनुमान ही समर्थांची आराध्य दैवते होती. पण त्यांची केवळ पूजाअर्चा करीत रामलीलागायन करणे किंवा हनुमानाच्या प्रतापाच्या कथा सांगणे हे त्यांचे ध्येय नव्हते. रामराज्याचे स्वप्न त्यांनी सतत पाहिले, पण, ते प्रत्यक्षात यावे यासाठी पराक्रम, पुरुषार्थ, बलोपासना यांची कास धरली. नीतिप्रिय समाज निर्माण करून जनशक्ती उभारावी अशी जिद्द धरली. धर्मकारणही केले आणि लोककारणही केले.

"दासबोध" हे समर्थांच्या अशा लोकविलक्षण जीवनसाधनेचे फलित आहे. त्यांनी उभारलेल्या शक्तिशाली ज्ञानपीठांचा तो अभ्यासग्रंथ आहे. त्यात व्यक्तीच्या नि समूहाच्या मनोव्यापारांचा शोधबोध आहे.

ज्या काळात समाज दिशाहीन होता, दीनवाणे जिणे जगत होता, जुलूम जबरदस्ती सहन करीत होता, समाजाचे नेतृत्त्व करणारे धर्ममार्तंड कर्मकांडात बुडालेले होते, साधु-संत केवळ भक्तिसौख्यात आनंद मानीत होते, त्या काळात समर्थांनी आपला वेगळाच स्वर प्रकट केला. केवळ हरिकथा निरुपण नको, त्याबरोबर व्यवहार हवा. दैवाधीनतेपेक्षा प्रयत्नवाद मोठा मानायला हवा. ज्ञानप्रसार करीत समाज संघटन करायला हवे.

*- जव नाहीं ज्ञानप्राप्ती। तव चुकेना यातायाती॥ (५.१.३५)*
*- पाहावे आपणासी आपण। या नांव ज्ञान॥ (५.६.१)*
*- उत्तम गुण अभ्यासावें। नाना प्रयत्नें॥ (१७.१०.३०)*
*- आधी राखावा आचार। मग पाहावा विचार।*
*आचारविचारें पैलपार। पाविजेतो॥ (१७.१०.२५)*

दासबोध या साऱ्या नवतेसह तेजाचे तत्त्वज्ञान मांडणारा आध्यात्मिक ग्रंथ आहे.

**संतजन आणि सज्जन**

यादवयुगात ज्ञानदेव-नामदेवांनी, पुढे यावनीयुगात एकनाथांनी आणि समर्थांच्याच काळात त्यांच्या काही वर्षे आधी तुकारामांनी, वारकरी सांप्रदायाला विराट जनबळ मिळवून दिले होते. या संतांचा मुख्य भर हरिकथा निरुपणावर तर राहिलाच पण त्याचबरोबर ईश्वरनिष्ठांची मांदियाळी सर्वत्र निर्माण व्हावी, ती साऱ्या भूतमात्रास सोयरी ठरावी यासाठी त्यांनी नानाप्रकारे प्रयत्न केले. वेद तिहीं वर्णांचे कानी लागला म्हणून गीतेची कास धरून ज्ञान, कर्म आणि भक्ती यांचा मेळ ज्ञानदेवांच्या भावार्थदीपिकेतून घालण्यात आला. "नाचू कीर्तनाचे रंगीं।

ज्ञानदीप लावूं जगीं'' या वृत्तीने संत नामदेवांच्या देशयात्रा झाल्या. ''सगुणचरित्रे परमपवित्रे सादर वर्णावी आणि जनीं जनार्दन पाहात आपापला प्रपंच अलौकिक आनंदाचा करावा हे नाथांकडून ठसविण्यात आले. मुक्तीपेक्षा भक्ती भली आणि तीच जनांची खरी भक्ती हे वारंवार सांगण्यात आले. या साऱ्या संतबोधाला समर्थांनी एक वेगळेच परिमाण देण्याचा परखड प्रयत्न केला.

समर्थांनी संतत्त्वापेक्षा सज्जनत्वावर भर दिला. हरिकथा निरुपणाबरोबर काळाची आव्हाने ध्यानी घेऊन राजकारण, व्यवहाराकडे वळले पाहिजे हे सांगितले. ब्रह्मज्ञानी - आत्मज्ञानी व्यक्तींनीही आपापले समाजकर्तव्य करण्याकडेच प्रवृत्त व्हायला हवे हे आवर्जून मांडले. ज्ञानदेवांनी म्हटले होते :

*देखे परमार्थ जाहले । जे निष्कामना पावले ॥*
*तयाहि कर्तव्य असे उरले । लोकी लागी ॥ ज्ञाने. (३.१५५)*

हा सिद्धान्त समर्थांनी अधिक स्पष्ट केला. अनुसरला. ''नित्य नूतन हिंडावे। उदंड देशाटण करावे'' पण ''सावधपणे ज्याला त्याला भेटी द्यावी'' हे सांगितले. ''येकें ठायीं बैसोन राहिला तरी मग व्यापचि बुडाला।'' याची जाणीव करून दिली. ''ज्ञानी आणि उदास'' यांनीही ''समुदायाचा हव्यास धरावा'' असे म्हटले. कशासाठी ? समर्थ म्हणतात : ''मुख्य सूत्र हातीं घ्यावें। करणें तें लोकांकरवी करवावें।''

ब्रह्मज्ञानी पण यत्नवादी, विवेकी, चातुर्यगुणी महंत जर समाजाचे सखेसोयरे झाले तर खळांची व्यंकटी सांडू शकेल, नाठाळांचे माथा काठ्या हाणता येतील, ''जो जे वांछील तो ते लाहो प्राणिजात'' या प्रार्थनेला अर्थ प्राप्त होईल अशी समर्थांची निश्चित धारणा दिसते. दासबोध ही एकप्रकारे क्रियाशील समाजसंघटक संत संज्जनांच्या जडणघडणीसाठी तयार केलेली आचारविचार संहिता आहे.

**देह हेच देवमंदिर !**

समर्थ, मर्यादापुरुषोत्तम प्रभु रामचंद्राचे निस्सीम उपासक आहेत. रामोपासक हनुमंताचेही ते अनन्य भक्त आहेत.

दासबोधातील ठिकठिकाणी व्यक्त झालेली भक्तिकल्पना अत्यंत व्यापक आहे. ''पृथ्वीमध्ये जितुकी शरीरे। तितुकी भगवंताची घरें॥'' अर्थात प्रत्येक जीव हे ईश्वराचे मंदिर मानावे अशी विशाल ईश्वरानुभूती समर्थ सहज सांगून जातात.

माणूस कोणत्याही जमातीचा असो, त्याची भाषा वा प्रांत कोणताही असो, त्याच्या हृदयांतरी असणाऱ्या ईश्वराकडे आपण पाहावे. अशाने प्रेमादर शक्य होतो. माणुसकीचे वागणे जमते असे समर्थांना वाटते.

अध्यात्मविद्येशी निगडीत कोणतीही गोष्ट स्पष्ट करतांना समर्थ जनांबरोबर सज्जनांना विसरत नाहीत. किंबहुना, सज्जन मनांना उद्देशूनच ते सारा विवेक - प्रयत्नांचा प्रपंच करतात.

*जनीं जनार्दन आहे । परि तो सज्जनीं वसे ।*

*जना आणि सज्जनाला । एकचि करता न ये ॥*

हा एक परखड विचार हे दासबोधातील अंत:सूत्रच आहे.

*नरदेह हा स्वाधेन । सहसा नव्हे पराधेन ।*
*परंतु हा परोपकारी झिजऊन । कीर्ति रुपें उरवावा ॥* (१.१०)

नरदेहाच्या योगानेच परमार्थसिद्धी होते. अगदी तीर्थयात्रा, पुरश्चरण, तपजप, योगसाधना, नामस्मरण अथवा वेदाध्ययन जरी करायचे तरी ते नरदेहानेच करावे लागते. आजवर जे जे मानवाने साध्य केले ते नरदेहाच्या सहाय्यानेच केले. साधुसंत सुद्धा नरदेहासहच सारे ईश्वरीकार्य करून गेले. तात्पर्य, नरदेह सर्वोपरी आहे. तो स्वतंत्र आहे. पशूंपाशी तो नसतो म्हणून ते परतंत्र होतात. यासाठी मानवाने नरदेहाचा सदुपयोग करून आत्मोद्धार साधावा आणि देह दुसऱ्यासाठीही झिजवून तो कीर्तिरुपे उरवावा. असे केले तरच यमयातनांतून मुक्ती मिळते.

**भिक्षा विचार**

दासबोधातील काही सिद्धान्ताविषयी कमालीचे अपसमज झाल्याचे दिसून येते. यांपैकी काही समज आकलन न झाल्यामुळे तर काही विकृत टीकावृतीतून आहेत. समर्थांनी सार्वजनिक कार्यसिद्धीसाठी भिक्षेची महती मानली आणि आपल्या महंतांना भिक्षा हे व्रत म्हणूनच सांगितले. 'ब्राह्मणाची मुख्य दीक्षा। मागितली पाहिजे भिक्षा। असे ते म्हणाले. कशासाठी ? 'ठाई ठाई शोध घ्यावा। मग ग्रामी प्रवेश करावा। प्राणीमात्र बोलवावा। आप्तपणें।। (१९.२.१७) भिक्षेचे हे खरे प्रयोजन त्यांना अभिप्रेत आहे. कोणत्याही गावातील लोक कसे आहेत - धर्मनिष्ठ किती, धर्मभ्रष्ट किती, काम करणारे कोण, आळशी कोण, कार्यकर्ते कोण, वाचाळ कोण - हे सारे भिक्षेच्या निमित्ताने कळते. 'सज्जना परीस आळवावे। महत्त्व देऊनी' हे समजते. 'भिक्षामिसें लहानथोरें। परीक्षून सोडावी।।' कशी हे कळते.

आपल्या अन्न, वस्त्र, निवारा या अगदी प्राथमिक स्वरूपाच्या गरजा पूर्ण करण्याकरिताही महंत कार्यकर्त्यांनी फारसा वेळ घालवू नये आणि ज्या समाजाची सेवा करायची त्याकडे, आपल्या उदरनिर्वाहासाठी हात पसरण्यास संकोचही करू नये अशी समर्थांची विचारसरणी दिसते. समाज पुरुषाकडून भिक्षा घेतली तर कार्यकर्त्यावर बंधने न येता त्याचे विचार नि कार्य स्वातंत्र्य अबाधित राहते हे समर्थांनी ओळखले होते.

*"भिक्षापात्र अवलंबिणे। जळो जिणे लाजिरवाणे"*

असा एक तुकाराम महाराजांचा उद्गार प्रसिद्ध आहे. त्याची आणि समर्थविचाराची तुलना करून काही निष्कर्षही काढण्यात आले आहेत. वस्तुत: तुकाराम महाराजांचा रोख भिक्षेपेक्षा, कष्ट न करण्याकडे आणि केवळ भीक मागून ऐदीपणे पोट भरण्यावर आहे. हे जर ध्यानी घेतले तर मतभेदाला फार जागा उरू नये.

**दासबोधाची अद्वितीयता**

ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास हे महाराष्ट्राचे मुख्य संतपंचायतन.

विवेकसिंधु, लीळाचरित्र, ज्ञानेश्वरी, नामदेवगाथा, नाथ भागवत आणि भावार्थ रामायण, तुकाराम गाथा आणि दासबोध हे जुन्या मराठीतील श्रेष्ठ ग्रंथ. त्यातही भाषेच्या दृष्टीने सर्वात जोरकस आणि तरीही सोपा असा एकमेव बृहद् ग्रंथ म्हणजे दासबोध. यादव काळापासून मराठी संतांना प्रिय वाटणारा ओवी छंदच समर्थांनी आपल्या ग्रंथासाठी स्वीकारला. त्याची ओवी संख्या सात हजार सातशे एकावन्न अशी प्रचंड आहे. पण बहुतेक सर्व ओव्या साध्या, सरळ नि सोप्या आहेत. त्या पद्यापेक्षाही गद्यानुकूल अशाच असून विचार प्रदर्शनासाठी त्या प्रभावी ठरतात.

प्रपंच सोडू नये. केवळ तो पत्करूही नये. प्रपंचही विवेकाने करावा आणि परमार्थही विवेकानेच करावा. किंबहुना विवेकयुक्त प्रपंच केला तरच परमार्थही खऱ्या अर्थाने साध्य करता येतो. हे सर्व संतांपेक्षा वेगळे प्रतिपादन असणारा ग्रंथ म्हणजे दासबोध.

''दासबोध'' हा कोणत्याही पूर्वप्रसिद्ध ग्रंथाशी संबद्ध नाही. ती मराठीतील एकप्रकारे पहिली स्वतंत्र कृती आहे. एकूणच भारतीय भक्तिसाहित्यात दासबोधाशी बरोबरी करता येईल असा दुसरा व्यावहारिक उपदेशाचा ग्रंथ दाखविता येणार नाही. परमार्थाचा व्यावसायिक पसारा मांडणारे आज बरेच दिसून येतात. आपल्याच महात्मतेचे देव्हारे माजवून जनसामान्यांच्या श्रद्धाभावनेचा अनुचित लाभ घेणारे महाराजही कमी नाहीत. स्वार्थपरायण अभिजन प्रवचनप्रकार आणि त्यांचे भोंगळ अनुयायीही अनेक दिसतात. या सर्वांना ''दासबोध'' हा गुरुग्रंथसाहिब ठरावा.

*मीपणापासून सुटला । तोचि एक मुक्त जाला ।*
*मुका अथवा बोलिला । तरी तो मुक्त ॥* (७.६.५५)
*जया अंतरीं भगवंत । अचळ राहिला निवांत ।*
*तो स्वभावें जे बोलत । ते ब्रह्मनिरुपण ॥*

अशी स्पष्टपणे ग्वाही देणे ही दासबोधाची खरी अनन्यता म्हणायला हवी.

~

शं.श्री. देव : ''दासबोधाची प्रस्तावना'', सत्कार्योत्तेजक सभा. धुळे १९११
श्री.के.वि. बेलसरे : ''श्रीमत् दासबोध'', समर्थसेवा मंडळ, सज्जनगड. १९७५
प्रा.गं.बा. सरदार : ''संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती'' पुणे. तिसरी आवृत्ती १९७०
डॉ.शं.दा. पेंडसे : ''राजगुरु समर्थ रामदास'', कॉंटिनेंटल, पुणे. १९७४
दि.अ. घैसास : ''समर्थांची बोधसुधा'', के.भि. ढवळे, मुंबई १९८५
के.वि. बेलसरे : ''श्रीमत् दासबोध प्रवचन पारिजात'', श्रीसमर्थ सेवा मंडळ, सज्जनगड. १९८६
डॉ.श्री.द. देशमुख : ''दासबोध चिंतनिका'', शिल्पा प्रकाशन, पुणे. १९९१

~ ~

# पूर्वप्रकाशन

समर्थांचे विचार विश्व / प्रसाद जाने ८७
गुरु गोरखनाथ आणि समर्थ / कालीमठसंदेश नोव्हे ८९
समर्थांची विठ्ठलभक्ती / नामदेवांची रामभक्ती
संत नामदेव आणि समर्थ रामदास यांचा मनोबोध / तरुण भारत सोलापूर १८.६.८९
महात्मा कबीरदास आणि समर्थ रामदास / सज्जनगड - दासनवमी विशेषांक मार्च ८९
गोस्वामी तुलसीदास आणि समर्थ रामदास / गोमंतक पणजी, २४.३.९१
कीर्तनपरंपरा : वारकरी आणि समर्थसंप्रदायीक / गोमंतक पणजी
समर्थ रामदास आणि संत तुकाराम
समर्थ आणि छत्रपती शिवराय / प्रसाद, मार्च ९१
भूषण कविराय आणि समर्थ रामदास
समर्थांचे आनंदवनभुवनाचे स्वप्न / प्रसाद, सप्टेंबर ८९
मराठी भारुड परंपरा आणि समर्थांची रचना / सज्जनगड, जुलै ९०
समर्थांची हिंदी काव्यरचना / प्रसाद, एप्रिल ८६
समर्थवाणीतील काही उक्तिविशेष / प्रसाद, एप्रिल ९०
दासबोधाची अनन्यता



सर्व प्रकारचे अभिनिवेश हिरीरीनं
मांडले जाण्याच्या आजच्या काळात
'साधू दिसती वेगळाले। परि ते स्वरुपी मिळालें ॥'
या समर्थोक्तीचा पुनरूच्चार जोरकसपणानं करणं
आम्हाला जरुरीचं वाटतं.
किंबहुना अशा विशिष्ट सामाजिक आवश्यकतेचं
भान ठेवूनच आम्ही हे पुस्तक
प्रकाशित करत आहोत.

गोकुळ मासिक प्रकाशन
११९४, सदाशिव पेठ, पुणे ३०.